# परागंदा.

## भारतीय समाजाची सरहद्द.

[ विद्यासेवक मासिकांत प्रसिद्ध झालेली कादंबरी. ]

जीवने शासने भेदाः
परजातिसमागमः
विविधा भौतिका भावाः
उपसंस्कृतिकारकाः ॥


लेखक

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर एम. ए. पीएच्. डी.

गोंडवनांतील प्रियंवदा या कादंबरीचे कर्ते.

संपादक महाराष्ट्रीय ज्ञानकोश.



मुद्रक व प्रकाशक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, ज्ञानकोश छापखाना'

८४१ सदाशिव,

पुणें शहर.

१९२६

**विद्यासेवक**—महाराष्ट्रीय उच्च दर्जाच्या मासिकांत या मासिकाचें अग्रेसरत्व कोणी नाकारील असें वाटत नाहीं.



या मासिकांत राजकारण, वाङ्मय, व्यापार, इतिहास इत्यादि क्षेत्रांतील विषयांवर जे लेख येतात त्यांत दिसून येणाऱ्या नवीनतेमुळें हें मासिक लोकांस विशेष आदरणीय झालें आहे. तिसऱ्या वर्षाची वर्गणी ट. ख. सह४रु.

वार्षिक पृष्ठसंख्या ७६८ वर (गोंडवनांतील प्रियंवदा व परागंदा या कादंबऱ्या या मासिकांतूनच बाहेर पडल्या.)

---

**महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि**—(किंमत रुपये १५) प्रती फारच थोड्या उरल्या आहे. या पुस्तकांत १८१० पासून १९१७ पर्यंत प्रसिद्ध झालेल्या १० हजार मराठी पुस्तकांची ५०० नियतकालिकांची आणि सुमारें ४०००० लेखांची यादी आली आहे. त्या यादींत वर्गीकरण विषयवार केलें आहे म्हणजे सर्व मराठी वाङ्मय १२०० विषयांत विभागलेलें यांत सांपडेल. तसेंच सुमारें ४५०० लेखकांचीं नावें यांत दिलीं आहेत व त्या लेखकांनीं लिहिलेलें वाङ्मय दाखविलें आहे.

या सूचीस डॉ. केतकर यांच्या हातची एक प्रस्तावना जोडली आहे त्या प्रस्तावनेंत वाङ्मयाचा विकास अगर संकोच कशानें होत आहे हें दाखविलें आहे.

---

**महाराष्ट्रीय ज्ञानकोश**—(भाग १-२०) याच्या प्रती थोड्याच उरल्या आहेत किंमतीसाठीं चौकशी करावी.

पत्ता—ज्ञानकोश कचेरी, पुणें.

# प्रस्तावना.

गोंडवनांतील प्रियंवदेचें महाराष्ट्रानें जें स्वागत केलें तें प्रस्तुत कथा लिहिण्यास कांहीं अंशीं कारण झालें असेल, परंतु ज्याप्रमाणें एखादे कार्य अनेक कारणांचा परिणाम असूं शकतें त्याप्रमाणे प्रस्तुत कथाप्रसिद्धीचीहि गोष्ट आहे. कथा लवकर तयार होऊन बाहेर पडली याचे श्रेय बऱ्याच अंशीं खिळे जुळविणाऱ्या कंत्राटदाराकडे आहे. असल्या कत्राटदाराने "कॉपी पाहिजे" म्हणून मागे नेट लावला म्हणजे लेखकाच्या लेखणीला स्फूर्ति मिळून वाङ्मय कसें बाहेर पडतें याची कल्पना पुष्कळ लेखकांस असेल. तथापि आपण लिहिलेले तें छापखानदारानें नेट लावला म्हणून नव्हे तर स्फूर्तीमुळेंच होय, असें सांगण्याचा कविसंप्रदाय असल्यामुळें, पुष्कळशा वाङ्मयाच्या प्रसिद्धीचे श्रेय कंपाझिटरांच्या सघास न देतां सामाजिक प्रश्नांस देण्यांत येते. लेखकाने लिहिलें कां तर अमुक सामाजिक प्रश्नाकडे त्याचे लक्ष लागले होतें म्हणून असे सांगणे हे पुष्कळ चांगलें दिसतें. पुष्कळ अवलोकन झाले आहे अशा प्रत्येक व्यक्तीच्या मनांत हजारों विचार येतात, पण ते बहुधा मनांतल्या मनांतच राहातात, आणि छापखानदाराने म्हणजे त्याच्या पाठीमागें असलेल्या खिळे जुळणीच्या ठेकेदाराने नेट लावला म्हणजेच ते विचार कागदावर उठतात, तर ग्रंथरचनेचें श्रेय त्यांस द्यावयास काय हरकत आहे.

लेखक लिहूं लागला म्हणजे त्यास परिचित अशा विषयांची स्मृति जागृत होऊन अनेक देखावे दिसूं लागतात, आणि ते स्वाभाविकपणे कथानकात उतरतात. जगांत जे व्यक्तींचे संबंध लेखक पहातो ते संबंध कथानकाचे अंश होत. त्यांची एकमेकांशी जुळणी झाली म्हणजे कथानक तयार होतें या साध्या नियमानें प्रस्तुत गोष्ट तयार झाली आहे. एखाद्या ग्रामाचा किंवा मनुष्यसमूहाचा आयुष्यक्रम सागणाऱ्या यूरोपीय वाङ्मयात ज्या कादंबऱ्या आहेत त्यांमध्ये कथानकाची गुंतागुंत बरीच कमी असते. एक मोठा वृक्ष व त्याची अनेक बांडगुळें व त्यांस वेष्टिणाऱ्या पण एकमेकांत गुंतलेल्या अशा अनेक वेली, अशा वनस्पतीसमुच्चयांशी त्या कादंबऱ्या तुल्य नसून एकमेकांशीं ज्यांच्या फांद्या अडकल्या आहेत अशा स्वतंत्र बुधांच्या वृक्षराजीशी त्या तुल्य असतात. या प्रकारच्या कादंबऱ्यांशीं ज्यांस परिचय नाहीं त्यांस प्रियंवदा ही कादंबरी "शास्त्रीय नियमांनीं" तयार झालेली नाहीं असें वाटलें. तथापि ती कादबरी कांहीं निराळ्या प्रकारचीच आहे हें कांहीं मार्मिक लेखकांनीं ओळखलेंच. या एका गोष्टात प्रियंवदा आणि परागंदा या दोन्ही कादंबऱ्यांत साम्य आहे. दोहोंमध्यें स्त्रीपुरुषांच्या तीन जोडया आलेल्या आहेत व त्यांपैकीं एक जोडी विवाहित आहे तर दोन जोडयांचे विवाह कथाप्रसंगास कारण झालेले आहेत.

प्रस्तुत कादंबरींत अमेरिकेंतील भारतीयांच्या परिस्थितीचें वर्णन आलें आहे पण तें पूर्णांशानें आलें नाहीं. अधिक धडपड करणारा अमेरिकेंतील भारतीय समाज आणि त्यांच्या मनांत येणारे विचार यांचें दिग्दर्शन यांत आहे. येथें अमेरिकेतील ईशान्य भाग हें जरी कथाप्रसंगाचे क्रीडास्थान आहे, तरी तेथील सृष्टिवर्णनहि फारसे आलें नाहीं, किंवा कांहीं काळ्या वर्णाच्या भारतीयांस जे अपमानाचे प्रसंग मधून मधून येतात त्यांचेंहि वर्णन आलें नाहीं, तसेंच जे लोक अमेरिकेंत येऊन केवळ भटके बनतात त्यांच्याहि आयुष्यक्रमाचे वर्णन नाहीं. व त्याचप्रमाणें एशियांतून आलेल्या लोकांविरुद्ध चाललेल्या मजूर वर्गाच्या चळवळीचेंहि वर्णन यांत नाहीं. भारतीयांच्या अमेरिकेंतील अनुभवाचें हें पूर्ण चित्र नाहीं. तथापि अमेरिकेत गेलेला व तेथें कायम झालेला किंवा कायम होऊं पाहणारा जो सुशिक्षित भारतीयांचा वर्ग आहे त्याच्या विचारौघाची निदर्शक ही कादंबरी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

श्री. व्यं. केतकर

# परागंदा.

आणि

## भारतीय समाजाची सरहद्द.

### ( सामाजिक कादंबरी ).

अनुक्रमणिका. पृष्ठ

# परागंदा.

आणि

# भारतीय [illegible]ची सरहद्द.

( सामाजिक कादंबरी ).

## प्रकरण १ लें

## हिंदी अमेरिकन कुटुंब.

"तुमची जन्मभूमि हिंदुस्थान असेल, पण आमची जन्मभूमि अमेरिका आहे."

"पण हिंदुस्थानाला तुम्ही विसरता कामा नये."

"आम्ही कां विसरूं नये—आम्ही अमेरिकन लोकांनीं इंग्रजांना चोप दिला आणि इंग्रज लोकांनी तुम्हाला चोप दिला."

वरील संभाषण कोणी अमेरिकन गृहस्थ व कोणी हिंदुस्थानी गृहस्थ यांमध्ये चालले असेल असे कोणास वाटेल, आणि ते कांही अशीं खरेंहि आहे. पण अमेरिकेचा अभिमान धरणारे हे अमेरिकन गृहस्थ कोण, आणि हिंदुस्थानी गृहस्थ कोण, आणि त्या दोघांमध्यें संबंध काय होता, हे कदाचित् पुष्कळांच्या लक्षांत चटकन येणार नाहीं; म्हणून प्रथमच सांगितले पाहिजे कीं, हें संभाषण बापलेकांत चालले होते.

अमेरिकेंत जुलैच्या चौथ्या तारखेस स्वातंत्र्याचा दिवस म्हणून सण पाळला जातो. त्या दिवशीं, स्वदेशाभिमानोत्तेजक व्याख्यानें होतात, लहान मुलांच्या शर्यती लागतात, लहान मुलानां फटाके उडवायला मिळतात. अशा एका दिवशीं सुंदरने आपल्या बापापाशीं फटाक्यांसाठीं पैसे मागितले. मुलानें पैसे मागितले ते रीतीप्रमाणें देणे अवश्यच होतें, पण ते देतांना आज सण कसला आहे त्याची आणि त्या सणाच्या मुळाशीं देशाचा अभिमान ही गोष्ट आहे याची जाणीव सुंदरला आहे किंवा नाहीं, असल्यास कितपत आहे, हें पाहण्यासाठीं मि. कामत यांनीं आपल्या लहानग्या सुंदरला प्रश्न केले. त्याचीं उत्तरें लहानग्या सुंदरकडून बरोबर मिळाली. जे इंग्रज देशावर दादागिरी करीत होते त्या इंग्रज लोकांनां हुबेहुब अमेरिकन मुलांप्रमाणे शिव्या सुंदरने दिल्या त्या सर्व ऐकून खूष झाल्यानंतर त्यांच्या मनांत हिंदुस्थानावर प्रेम करण्याचें कर्तव्य आपल्या मुलाच्या मनावर बिंबविण्यासाठीं व्याख्यान द्यावयाचे होतें व ते त्यांनी देण्यास प्रारंभहि केला, व ज्याप्रमाणे अमेरिकन लोकांत स्वातंत्र्यप्रेम आहे त्याप्रमाणे हिंदूंमध्ये देखील स्वातंत्र्यप्रेम पाहिजे, व आपणां हिंदूंना हिंदुस्थानवर प्रेमहि ठेवले पाहिजे, शक्य झाल्यास देशास स्वातंत्र्य मिळवून देणे आपलें कर्तव्य आहे इत्यादि कल्पना लहानग्या सुंदरच्या मनांत भरवून देण्याचा मि. कामत प्रयत्न करीत होते. अशा प्रसंगीं ओघाने झालेले संभाषण वर दिलें आहे.

पीटर हार्वे आणि कंपनीचें नांव मुंबईंत सुमारें तीस वर्षांपूर्वी सर्वविश्रुत होते, या कंपनीनें अमेरिकेतील माल हिंदुस्थानांत पाठवून हिंदुस्थानी

माल-विशेषेकरून कातडीं-अमेरिकेंत खपविण्याचा व्यापार चालविला होता. गोविंदराव कामत या कंपनींत प्रथम कारकून होते, आणि या कंपनीचा मालक पीटर हार्वे हा जेव्हां अमेरिकेस परत गेला तेव्हां तो आपल्याबरोबर एक कारकून अमेरिकेस घेऊन गेला, तेच गोविंदराव कामत होत. गोविंदराव कामत अमेरिकेस गेले आणि त्यांनीं तेथेच कायमची वस्ती केली. ते गेले ते सहकुटुंब गेले. हिंदुस्थानांत ते परत एकदांच आले होते. त्या वेळेस देखील ते एकटे आले होते आणि त्यांचा मुक्काम एक महिन्यापेक्षां कमीच होता. त्यांनां मुलें [illegible], आणि त्यांचें सर्व शिक्षणहि अमेरिकेंतच झालें होतें.

गोविंदराव कामत हे अमेरिकेत गेल्यानंतर कांहीं वर्षांनीं पीटर हार्वे मृत्यु पावला, आणि त्याच्यामागून त्याचे दोघे मुलगे त्या व्यापारी कंपनीचे मालक झाले. त्यांनीं गोविंदराव कामत यांस काढून टाकले आणि दुसरी मंडळी नेमली. गोविंदराव कामत यांनी नंतर कांही काळ दुसऱ्या एका व्यापारी कंपनींत नोकरी पत्करली, पण पुढें तीहि नोकरी सोडून ते स्वतंत्रपणे धंदा करूं लागले. या धंद्यांत त्यांनां बऱ्या प्रकारचें यश आलें आणि सुमारें दीड लाख डालर किंमतीची त्यांनीं स्थावर इस्टेट व बॉंड्स ही खरेदी करून ठेवली होती. त्यांचे वार्षिक उत्पन्न दहा हजार डालर होतें, म्हणजे न्यूयार्कमध्यें साधारण मध्यम प्रतीच्या लोकांत त्यांची गणना [illegible] होती व भोंवतालच्या कांही धर्मकृत्यांस ते मदतहि करीत व त्यामुळें ते कांहीं वर्गांमध्ये लोकप्रिय झाले होते.

त्यांची बायको, शांताबाई ही मुंबईच्या बारघऱ्या शेणव्यांपैकीं होती. मुंबईच्या बारघऱ्या शेणव्यांस आपल्या लहानशा पोटजातीच्या पोटविभागाबद्दल जो अभिमान वाटतो तो अभिमान तिच्यांत उतरला होता. ती स्वतःला मोठ्या घराण्यांतील समजे. ती लहान असतां छानछोकीची आवड असलेली म्हणून शेणव्यांच्या कांदेवाडींत प्रसिद्ध होती. ही तिची प्रसिद्धि, जेव्हां ती सोळा-सतरा वर्षांची होती आणि सौंदर्य आणि तारुण्य तिच्या अंगांत मुसमुसत होते तेव्हां झाली. तिला शिक्षण फारसें असणें शक्यच नव्हतें. कां कीं, तिचें लग्न अकराव्या वर्षी झालें होतें. तिची छानछोकीची आवड पाहून लोकांस नेहमीं असें वाटे कीं, इतक्या छानछोकीची आवड असलेली ही मुलगी, व नवऱ्याला पगार इतका थोडा, सारा २९ च रुपये, तेव्हां ही आपल्या नवऱ्याच्या घरी कशी नांदेल! नवऱ्याला ही बया पुष्कळ नाचवील. रोजची वेणी नवीन पाहिजे, नव्या नव्या तऱ्हेचीं पोलकीं पाहिजेत, घरांत भारी किंमतीचें फर्निचर पाहिजे, नाटकाला वारंवार जायला पाहिजे. या सर्व गोष्टी तिला आवडत असत, आणि नवऱ्याजवळ पैसा नसे, तेव्हां अनेक प्रकारच्या हौशी ती माहेरच्या पैशानें पुरवून घेई. माहेरच्या मंडळीपाशीं पैसा होता, माहेरची मंडळी व्यापारांत श्रीमंत झालेली होती. या श्रीमंत सासऱ्याचा गरीब जांवई पाहून पुष्कळ लोकांनां प्रश्न असा पडे कीं असल्या श्रीमंत कुटुंबानें गोविंद कामतासारख्या गरीब घरच्या मुलाला आपली मुलगी दिली तरी कशी? पण या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठीं फार खोल जावयास नको होते. शांतीला मंगळ होता. तेव्हां मंगळाची मुलगी कोण करतो, म्हणून मंगळाचाच नवरा पाहून देणे अगदी अवश्य होते. तो श्रीमंतांत मिळाला नाहीं. मुंबईतल्या एका शाळामास्तराच्या भाच्यालाहि मंगळ होता. त्यामुळे हा लग्नाचा योग घडून आला. आणि ज्याअर्थी गोविंदरावांची कारकीर्द यशस्वी झाली, आणि त्यांचें उभयतांचें आयुष्य सुखांत गेलें त्याअर्थीं मंगळ पाहून लग्न ठरविण्याच्या पद्धतीचे किंबहुना संपूर्ण फलज्योतिषाचें गोविंदरावांच्या दृष्टीनें समर्थन झालें. आपल्याकडे

लग्नाच्या बाबतीत जात तर पाहायाचीच, पण आणखी दुसऱ्या गोष्टींकडे पाहण्याचीहि पद्धत आहे. ज्याप्रमाणें सर्व देशांत आणि लोकांत सांपत्तिक स्थिति आणि शिक्षण यामुळें जे वर्ग उत्पन्न होतात तसले निरनिराळे वर्ग प्रत्येक जातींत पडतात. आणि लग्नासाठीं स्थळ शोधतांनां जात तर बघायचीच पण त्याबरोबर द्रव्यमूलक भेदहि बघायचाच. असें होतां होतां लग्नाचे क्षेत्र अगदीं लहान होत जातें. "बरोबरीचे स्थळ," "तोलाचे स्थळ" इत्यादि कल्पनांनीं जी कमी पैसेवाल्याविषयीं घाण श्रीमंतांस उत्पन्न होते, त्यावेळेस मगळबुधाच्या कल्पनानीं श्रीमंतांस गरिबाकडेहि वळावे लागून त्यांच्या गरीबीची घाण श्रीमंतांस कमी येऊं लागते. अशा प्रसंगीं पृथ्वीग्रहावरचे श्रीमंत व गरीब यांस संयोजक जो आकाशस्थ मगल त्या ग्रहाचे आभार आमच्यांतील समतेच्या भोक्त्यांनी मानायाला नकोत काय? फलज्योतिषाच्या अनुपयुक्ततेविषयीं जर कोणी बोलायला लागेल तर आमचे गोविंदराव कामत त्याला खडखडीत विरुद्ध पुरावा देऊन चूप करतील. त्यांनां मंगळ होता, त्यांच्या बायकोला मंगळ होता, म्हणून तर दोघांचे लग्न झाले ना. आणि हे लग्न किती तरी सुखाचे झालें. दुसरी कुटुंबें आमच्याइतकी सुखी आहेत काय? नाहीत. मग फलज्योतिषावर विश्वास वाईट तो काय म्हणून म्हणतां, असें गोविंदराव म्हणत. गोविंदराव हे फलज्योतिषाची तरफदारी केवळ विनोदानें करीत होते अशांतला भाग नाहीं. सामान्य शिक्षणाच्या व्यापाऱ्यामध्ये जो ग्रहांवर विश्वास दिसून येतो तो गोविंदरावांच्याहि मनांत असे, व फलज्योतिषाचीं पुस्तके त्यांच्या लायब्ररीत पुष्कळ होतीं. जेव्हां आज माल घ्यावा की, घेऊं नये अशा तऱ्हेचा प्रश्न साधकबाधक प्रमाणांनीं सुटत नसे व कांहीं तरी कार्यनिश्चय करावा लागे, तेव्हां ते आपला निश्चय ग्रह पाहून करीत. येणेंप्रमाणे ग्रह पाहून आपल्या बिझिनेस पॉलिसीचा निकाल करण्याची त्यांनां संवय झाली होती, आणि त्यामुळे ते फलज्योतिषाचें वारंवार समर्थनहि करीत. ज्या लोकांनां त्यांचें हे मनोदौर्बल्य ठाऊक झाले होतें त्या लोकांनां गोविंदरावांनां खुष करून त्यांच्याकडून कांहीं काम करून घ्यावयाचें झाले म्हणजे ते प्रथम त्यांचा ज्योतिषविषयक सल्ला म्हणून विचारावयास येत, आणि या युक्तीनें त्या कामाविषयीं कळकळ उत्पन्न करीत. तेथील इंडोअमेरिकन असोसिएशनने संस्था कोणच्या वेळेस स्थापावी याविषयीं त्यांस मुहूर्त विचारून नंतर त्यांस संस्थेचें अध्यक्ष केले होते, व एक हजार डालर वर्गणी मिळविली होती.

शांताबाईला छानछोकीची आवड होती आणि ती आवड माहेरच्या मंडळीच्या प्रेमामुळे बरीच पूर्ण होई. शांता ही सदानंदराव दळव्यांच्या मुलींतली तिसरी, म्हणजे सर्वांत धाकटी. तिच्या आईबापांनां असें वाटे कीं, आपण आपल्या इतर मुलीनां श्रीमंतांची स्थळें पाहून दिलीं आहेत. हिला एकटीला मात्र गरीबाचें स्थळ पाहून दिलें. हिची हौस जर आपण पुरी करूं नये तर करावी तरी कोणी. हिच्या बहिणी चांगली लुगडीं घेतात, हिच्या नवऱ्याला तसलीं लुगडीं घेण्याची ऐपत नाहीं आणि त्यामुळे सणावाराच्या प्रसंगीं ही अगदी "लंकेची पार्वती" दिसली तर लोक कांहीं तिला दोष देणार नाहींत. तिच्या आईबापानांच देतील. या प्रकारच्या भावनेमुळें तिला तिच्या आईकडून बरीच मदत पोचत असे. दागिने तर तिला दिलेच होते. कारण कन्यादानच सालंकृत केले होतें. शांतीचे लग्न झालें त्यावेळेस नवरा १५ वर्षांचा होता. पुढे तो १८।१९ वर्षांचा झाला, तेव्हां त्याला नोकरी लागली. इतकीं वर्षे तो मामाकडेच होता. त्याचे आईबाप वारले होते. आणि मामा देखील गरीबच होता. त्यामुळें

त्यास शिक्षणक्रम अल्पवयांतच सोडून देऊन नोकरी करणें प्राप्त झालें. नोकरी लागल्या-नंतर गोविंदराव स्वतंत्रपणे राहूं लागला. तथापि लग्नानंतर सासूचा आग्रह फार होता की त्यानें सासूरवाडीसच येऊन रहावे. पण ते मामा व भाचा या दोघांपैकीं कोणासच पटले नाही, त्या-मुळे मुलीच्या आईस जरी थोडें वाईट वाटलें तरी जांवई बाणेदार आहे म्हणून तिला आनंदच झाला. सदानदराव दळवींहि म्हणत "आहे, पोरा-मध्यें पाणी आहे." आणि शांतेच्या बहिणीसहि प्रथम तसेंच वाटले.

शांताबाईला आपल्या माहेराकडून पोचणारी मदत फार दिवस टिकली नाही, व ती न टिक-ण्यास तिचे सौंदर्य कारण झाले. शांता तारुण्यात येऊन जसजशी खुलून दिसूं लागली तसतशी ती मत्सराचे स्थान होऊं लागली. शांतेच्या बहि-णीस, आईचे आपल्यापेक्षां आपल्या धाकटया बहिणीवर प्रेम विशेष आहे असें वाटे. केवळ मातृ-स्नेहामुळे सर्वांत गरीब मुलीवर ती जास्त प्रेम करते अशी भावना त्यांच्या मनांत न येतां आईचे आपल्या पेक्षां या बहिणीवर प्रेम अधिक ते ती अधिक स्वरू-पवान म्हणून आहे अशी समजूत होऊन धाकटया बहिणीचा तीव्र मत्सर होऊ लागला; व तो मत्सर जास्त वाटण्याचे आणि शांतेला राग येण्याचें मुख्य कारण असे कीं शांतेला माहेरून मिळालेल्या कपडयांत शाता प्रसंगीं आपल्या बहिणीपेक्षां अधिक खुलून दिसत असे. मत्सर जागृत झाल्या-बरोबर त्या काय बोलत असतील याची कल्पना आमच्या स्त्रीवाचकानां सहज असेल. टोचून बोलण्याची कला आमच्या महाराष्ट्रीय मुलीना कोठें शिकावी लागली आहे काय? प्रथ-मत: " आईबापाची लाडकी " म्हणूनच टीका होऊं लागली. पुढे, लाडक्या मुलीला आणि जांव-याला देऊन जे उरेल ते तुम्हांला मिळणार म्हणून त्यांच्या भावाना चिथावणी होऊं लागली. पुढे नव-ऱ्यावर त्याच्या कारकुनीपणाच्या भीतभीत वागणी-वर व कपडयांवर टीका होऊं लागली. त्या म्हणत, "नवऱ्याच्या पाणीदारपणाविषयीं लौकिक गावयाचा कां तर नवरा घरी येऊन रहात नाहीं म्हणून. नवरा कशाला येऊन राहील? दूर राहिलें म्हणजे स्वतंत्रतेने रहातां येतें व सासूसासऱ्यांकडून जे मिळायचें तें तर मिळतेंच आहे." अशी टीका होई. रमा रेगे व सावित्री खोटे, या दोघी बहिणीनी एकमेकींशींच असें बोलायला लागावे की, ते बोलणे शांतीस झोंबावे. एक दुसरीला म्हणते "पहा बरे तुझ्या नवऱ्याने पैसे मिळवीत एकसारखे राहिलेच पाहिजे, तुझ्या नवऱ्याला जर गरिबी आली तर मात्र तू अगदी बुडालीस असे समज, तू कांहीं आईबापांची लाडकी नाहीस, आणि तुझा नवरा काहीं लाडका जांवई नाही." या रमा रेगेच्या बोल-ण्याला सावित्री खोटे उत्तर करते, "वा, ग, वा! तुला कांहीच समजत नाहीं. मुलगी गरीब असली किंवा झाली म्हणजे तिचा हक्क माहेरच्या माणसांवर लागू झालाच. जांवई मिळवता असला तर त्याची किमत कमी होईल पण तो भिकेला लागला म्हणजे तोहि बाणेदार ठरलाच." असे शांतेकडे पहात पहात बोलून दोघींनीं मोठयाने हंसावे. या तऱ्हेची टीका पुष्कळदां आईस ऐकावी लागे, एवढेच नव्हे तर प्रत्यक्ष शांतेस ऐकावी लागे. हे दोघी बहिणींचे आपापसांतले बोलणे, शांतीला ऐकू जाईलसें करीत आणि ती मध्ये बोलाव-याला आली म्हणजे तू मध्ये तोंड कां घालतोस असे म्हणून तिला गप्प करीत. अशा प्रसंगीं शांतेस आईकडे तक्रार न्यावी लागे, त्यामुळे पुष्कळदां आईस असे वाटे आणि ती म्हणूनहि दाखवी की, "या कारटयांनां सणावाराच्या प्रसंगीं न बोलवावे हेच उत्तम." या दोघी वडील बहिणींनां आई आपल्या धाकटया गरीब बहि-णीस मदत करते याबद्दल आनंद न वाटतां वाईटच कां वाटतें याचें पुष्कळशा शेजाऱ्यांनां

कोडे पडे. पण ते कोडे सोडवणे फारसें कठिण नव्हतें. शांता इतर दोघींपेक्षां अधिक देखणी होती, नीटनेटकेपणाने वागणारी होती, सुंदर पोषाख तिच्या अंगावर जितका चांगला खुले तितका तिच्या बहिणींच्या अंगावर खुलत नसे, त्यामुळे ती जशी थोरामोठ्याची सून किंवा बायको दिसे तितक्या तिच्या बहिणी दिसत नसत. बहिणींना दुःख होण्याचें कारण एवढेच नव्हतें तर त्या बहिणीचे नवरेहि तिची तारीफ करीत असत. दोघींचेहि नवरे सणावाराच्या दिवशीं मुद्दाम सासुरवाडीला येऊन शांतेशी बोलण्याचा प्रयत्न करीत. दळव्यांचे दुसरे दोघे जांवई रेगे आणि खोटे यांची आपल्या धाकटया मेहुणीशी आणि साडूशी वागणूक जराशी भिन्न होती. धाकटी मेहुणी देखणी असल्यामुळे दोघेहि तिचे कौतुक करीत, आणि तिची खुशामतहि करीत, तिला आपण आवडते व्हावे यासाठी प्रयत्न करीत, आणि तिच्या नवऱ्याचा उघडपणे अपमान करीत नसत, तरी खालच्या पदवीच्या मनुष्याबरोबर जसे लोक वागतात त्याप्रमाणे ते गोविंदरावांशी वागत असत. तिच्या हितासबंधाने कळवळ दाखवीत, आणि तिला असें भासविण्याचा प्रयत्न करीत की, तिच्या नवऱ्यापेक्षां तिच्या सुखाची कळकळ मेहुण्यांसच अधिक आहे. तिला दिवाळीच्या प्रसंगी किंवा भाऊबिजेच्या निमित्ताने अशा मोठया किंमतीच्या भेटी पाठवीत की तिच्या नवऱ्याला तसल्या किंमतवान वस्तू परतभेट म्हणून देण्याची ऐपतहि नसावी. या तऱ्हेच्या वागणुकीच्या योगाने दोन तऱ्हेचे परिणाम होत; शांतेच्या बहिणींच्या मनांत धाकट्या बहिणीबद्दल मत्सर वाटे, व शांतेच्या नवऱ्यालाहि राग येई. पण नवऱ्याला त्याबद्दल राग कसा व्यक्त करावा हे समजत नसे; कां कीं, त्यांच्या देणग्या "धाकटया" मेहुणीस येत असल्यामुळें त्या स्वाभाविक दिसत; आणि जर राग व्यक्त केला तर आपल्या बायकोस त्या रागाचे कारण काय सांगावे हे त्यास समजत नसे. त्यामुळें त्याला आपला राग गिळून बसावें लागे. यामुळें गोविंदरावास आपणांस श्रीमंत घराण्यांतील मुलगी मिळाली हे बरें झालें नाहीं असेंहि वाटूं लागले होतें, व कांहीं तरी निमित्तानें मुलीचा माहेरशीं संबंध तुटला आणि आपणांस दोघां साडूंपासून अगदीं दूर कोठें तरी रहातां येईल तर बरें होईल असे वाटूं लागले.

गोविंदरावांस जे पाहिजे होते तें प्रसंगानुरूप उत्पन्न झालेच. आणि तें बायकोविषयी तिच्या दोघी बहिणीनां जो मत्सर उत्पन्न होई त्यामुळे उत्पन्न झाले. शांता देखील भांडणे भांडण्यांत अगदींच कमी होती अशांतला भाग नाहीं. तिचे दोघे श्रीमंत मेहुणे आपल्या बायकावर संतुष्ट नसून त्यांची प्रेमपात्रे गांवांत आहेत असा तिला सुगावा लागला होता, व कांहीं दिवसांनीं, या गोष्टी तिच्या बहिणींच्या तोंडूनच निघाल्या. कां कीं, तिघी बहिणी नेहमीं भांडतच असत असें नाहीं. कधी कधी प्रेमांतहि येत असत. आणि आपल्या नवऱ्याविषयीं गाऱ्हाणी एकमेकींनां सांगत असत. अशाच एका प्रसंगीं रमा, व सावित्री या दोघींनी सर्व बहिणी माहेरीं कांही कार्यपरत्वे जमल्या असता आपले नवरे कसे आहेत तें त्यावेळच्या अघळपघळ बोलण्यांत बोलून टाकलें. त्यानंतर दुसऱ्या एका प्रसंगीं दोघी बहिणी शांतेविरुद्ध बोलायला लागल्या आणि तिच्या नवऱ्याच्या गरीबीचा उपहास करायला लागल्या, त्यावेळेस मात्र शांता म्हणाली कीं नवरा गरीब असलेलाच बरा. तो इकडे तिकडे भटकण्याचें भयच नाहीं. शांता आणखी म्हणाली की, नवरा श्रीमंत असला तरी बायकोला त्याचा काय उपयोग. तो आपल्या ठेवलेल्या बाईचीं लुगडी आपल्या बायकोला धुवावयास लावील, आणि घरांतले दागिने ठेवलेलीला नेऊन देईल. शांता असें बोलल्यानंतर जो कडकडाट झाला त्याची बातमी शेणव्यांच्या

कांदेवाडींत प्रत्येक घरांत पसरली. शांतेला जरी आपण भांडणांत विजयी झालें असें वाटलें तरी या दोन बहिणींच्या मत्सरामुळें आपण फारसें माहेरीं येऊं नये असेंच तिला वाटूं लागलें. तरी कायमची फारकत अजून झाली नव्हती; पण ती देखील पुढच्या तीन चार महिन्यांत झाली. एके दिवशीं कांहीं कारणामुळे जेव्हां तिघी बहिणी एकत्र आल्या तेव्हां शांतेस राग येण्यासाठीं रेगी व खोटी या दोघीजणी एकमेकींच्या नवऱ्याची तारीफ करूं लागल्या आणि मुख्य तारीफ करण्याचा विषय काय तर ते सासऱ्याच्या कृपेवर अवलंबून नाहींत, आपल्या बायकोस लुगडेंचोळी घेण्यास पूर्णपणे समर्थ आहेत. शांतेने तेव्हां अशी प्रतिज्ञा केली कीं, तुमचा श्रीमंतीचा डौल इतका कशाला पाहिजे, तुमच्या नवऱ्यांनां वडिलांची दौलत मिळाली आहे. त्यांनां स्वतःला दमडी मिळवायची अक्कल आहे काय? तुम्हीं नवऱ्यांच्या गुणामुळें भिकेला लागून आमच्याकडे तुकडा मागायला येण्याचा दिवस तुमच्यावर न येवो म्हणजे झालें. याच वेळेस शांतीने आईला सांगितले की, मी इतःपर माहेरच्या एका सुतळीच्या तोडयाला देखील हात लावणार नाहीं. माझा नवरा मला पाहिजे तें द्यावयाला समर्थ आहे.

हें सर्व शांतेच्या तोंडूनच निघावयास त्या दोघी बहिणीनां पाहिजे होतें आपल्या नवऱ्याविषयीं तिरस्काराचे शब्द शांतेच्या तोंडातून काढवून ते आपल्या नवऱ्याच्या कानीं परस्पर जातील हें त्यांस पाहिजे होतें अर्थात् त्यांचे काम झालें.

शांताबाईच्या नवऱ्याची स्थिति येणेप्रमाणे होती-१८।१९ व्या वर्षी नोकरी लागली १५ रुपयांची: पुढें शांती जशी १६।१७ वर्षांची झाली आणि गोविंदराव कामत २२।२३ वर्षांचे झाले तेव्हां त्यांच्या पगाराची वाढ २५ रुपयांपर्यंत झाली. शांतेचें बहिणीशीं भांडण याच सुमारास झालें. तसेच आतां आपण माहेरच्या दमडीची अपेक्षा न करतां संसार चालविला पाहिजे असा तिचा निश्चय झाला, तो इतक्या अल्पवयांतच झाला, आणि त्या निश्चयाबद्दल गोविंदरावांस मोठें कौतुक वाटले व आनंदहि झाला. या निश्चयाचा एक परिणाम असा झाला कीं, दोघा नवराबायकोंचा एकमेकांशीं एकत्वाचा भाव वृद्धिंगत होऊं लागला. दोघांच्याहि मनांत अशी ईर्ष्या उत्पन्न झाली कीं, आपण श्रीमंत झालेच पाहिजे आणि आपणांस चांगले डौलानें रहातां येऊन दुसऱ्या दोघी बहिणींनां आणि साडूंनां आपल्याविषयीं हेवा वाटेल अशा स्थितीला आपण पोचले पाहिजे. व या तऱ्हेची महात्वाकांक्षा दोघांमध्ये उत्पन्न झाल्यामुळें दोघेहि दोन पैसे अधिक मिळविण्यासाठीं काय करावें याचा विचार करूं लागलीं, व त्यांनां उपायहि सुचूं लागले. गोविंदराव ज्या कंपनींत नोकरी करीत होते त्या कंपनीचे मुख्य काम कातडीं विकत घेऊन अमेरिकेत पाठविण्याचे होतें. कातडीं दररोज बाजारभावाने खरेदी केलीं जात आणि तीं कातडीं पुढें रवाना केलीं जात. कातडी कंपनीस बाजारभावाप्रमाणें पुरविण्याचे काम कित्येक मुसुलमान व्यापारीहि करीत. गोविंदरावांनां असेहि दिसून आलें कीं, या व्यापारी मंडळीपैकीं कांहीं जणांस ऑफिसांतले जे कारकून तुच्छतेने वागवीत तेच कारकून त्यांच्या दोन तीन वर्षांनंतरच मोठया अदबीनें वागवूं लागले. गोविंदराव जेव्हां या धंद्यासंबंधानें अधिक तपास करूं लागले तेव्हां त्यांस असें आढळून आलें कीं, ही कातडीं पुरविणारी मंडळी त्यांच्या कातडीं पुरविण्यावरच श्रीमंत झाली आहे. त्यांच्यापाशीं देखील प्रारंभी फारसे भांडवल नव्हतें. जेव्हां ही व्यापारी मंडळी कातडीं खरेदी करतात तेव्हां त्यांनां जे रुपये लागतात ते महिन्या दीड महिन्यांतच त्यांनां तो माल कंपनीला विकतां यऊन परत मिळतात, आणि ज्याअर्थी ते

पैसे कंपनीकडून पुन्हां परत मिळणार हें ठरल्यासारखेच होतें त्या अर्थी त्यांनां कातडीं विकत घेण्यास दुसऱ्याकडून पैसेहि मिळत; हें जेव्हां त्यास दिसून आलें तेव्हां तसल्या गोष्टी आपणहि कां करूं नयेत असें त्यांस वाटूं लागलें. आणि त्यानीं आपली ही इच्छा आपल्या वरिष्ठास कळविली. तेव्हां वरिष्ठ त्यांनां म्हणाला कीं तूं स्वतःच्या पैशानें जर कातडीं विकत घेऊन आम्हाला विकीत जाशील तर आम्ही तुझ्यापासूनहि तीं विकत घेऊं. तूं दोन पैसे मिळवावे याच्या विरुद्ध आम्ही मुळीच नाहीं. अरे, व्यापारांत मनुष्य पडणार तो पैसे मिळवण्यासाठीच ना पडणार आणि आज जो मनुष्य व्यापारी नोकर आहे, तो उद्यां मुख्य व्यापारीच व्हायचा. शिवाय जो स्वतः व्यापार करून दोन पैसे मिळवितो तोच कंपनीचा अधिक मोलाचा नोकर होतो. तूं माल स्वतः करतां खरेदी करूं लागशील तरच तुला मालाची पारख बरोबर करतां येईल, आणि तो कोणत्या भावानें खरेदी करावा हें तुला समजेल. पण हेंहि लक्षांत ठेव कीं तूं आमच्याकडचा मनुष्य म्हणून तुझा माल आम्ही पसंत करणार नाहीं. याप्रमाणें वरिष्ठाकडून उत्तेजन मिळतांच कांहीं माल स्वतःच्या जबाबदारीवर खरेदी करून तो पुढें आपल्या किंवा दुसऱ्या कोणत्या तरी कंपनीला विकण्याला गोविंदरावानें सुरवात केली. तो करतां करतां माल मुंबई बाजारांत येण्यापूर्वी कितीकांच्या हातांतून जातो वगैरे गोष्टी त्यास दिसून येऊन तो माल जास्त किफायतीनें कसा खरेदी करीत जावा इत्यादि गोष्टींमध्यें त्याचें डोकें चालूं लागलें; आणि याप्रमाणें त्याला व्यापाराची सर्व प्रकारची माहिती जेव्हां अधिकाधिक होऊं लागली तेव्हां त्याची त्या कंपनीच्या आफीसामध्यें देखील किंमत वाढूं लागली आणि पुढें, एक जबाबदार पण तरुण कारकून अशा तऱ्हेनें त्याचे वरिष्ठ त्याच्याकडे पाहूं लागले. पुष्कळ दिवस त्याचा पगार ६० रुपयांच्या खालींच होता, पण त्याची माल विकत घेऊन कंपनीस पुरविण्याच्या क्रियेंतील प्राप्ति बरीच मोठी होती. तथापि त्या वेळेस दोघांनींहि फारसा खर्च करावयाचा नाहीं, काटकसरीनेंच रहावयाचें आणि ज्या दिवशीं मोठया चांगल्या बंगल्यांत रहाण्याची ऐपत येईल त्यादिवशीं घर बदलावयाचें; तोंपर्यंत चाळींतच रहावयाचें, इत्यादि गोष्टी त्यांनीं योजल्या होत्या. पण त्यांनां मोठया बंगल्यांत रहावयाचे दिवसच आले नाहींत. मध्येंच त्या कुटुंबानें अमेरिकेस प्रयाण केलें. १९।२० हजार रुपये जमले; पण ते खर्चासाठीं लावण्याची सोय नव्हती. ते सर्व व्यापाराला हवे होते, आणि त्यामुळें आपल्या श्रीमंतीनें आपल्या बहिणींचा नक्षा उतरविण्याची शांताबाईची इच्छा पुरी झाली नाहीं.

कांहीं दिवसांनीं पीटर हार्वे हा परत जावयाला निघाला तेव्हां त्यानें गोविंदरावाला माझ्याबरोबर अमेरिकेस येतोस का? म्हणून विचारलें. गोविंदरावांनींहि कांहीं पुंजी जमविली होती, व अमेरिकेस आपण गेलों तर तेथेहि आपण चांगला व्यापार करूं, व्यापाराची तिकडची बाजूहि आपणांस समजेल असें मनांत धरून गोविंदरावांनीं तिकडे जावयाचें ठरविलें आणि शांताबाईचीहि त्या विचाराला पूर्ण संमति मिळाली. ही संमति देण्यांत त्यांचे त्यांत अनेक हेतू होते. शांताबाईच्या बऱ्याचशा श्रीमंत आप्तांत कांहीं लोक इंग्लंडला वगैरे गेले होते, व जे जाऊन आले ते अशा तोऱ्यानें वागत कीं, हिंदुस्थानांतले लोक म्हणजे काय अगदीं जंगली; तेव्हां शांतेला असें वाटे कीं, विलायतेअमेरिकेला आपणहि जावें आणि परत आल्या नंतर आपल्या दोघी बहिणींनां त्यांच्या जंगलीपणाबद्दल खिजवायला सांपडावें.

प्रस्तुत बापलेकांच्या संभाषणाचा काल म्हटला म्हणजे १९२० साल होय. या सालीं गोविंदराव कामत यांस पंचावन्नावें वर्ष पुरें झालें होतें. ते आपल्या वयाच्या ३०व्या वर्षी म्हणजे १८९५च्या

सुमारास अमेरिकेंत आले होते, आणि अमेरिकेंतील अत्यंत जुन्या हिंदी रहिवाशांमध्ये हे मोडत असल्यामुळे तेथील हिंदी मंडळींचे ते एका दृष्टीने सामाजिक पुढारी झाले होते. पश्चिम हिंदुस्थानांतून आलेली अनेक मंडळी एक दोन दिवस तरी याच्याकडे उतरली होती, आणि कोणी अमेरिकेस आलेला तरुण मनुष्य एलिस बेटांत इमिग्रेशनखात्याच्या नियमामुळें अडकला आहे असे कळतांच त्यांनीं त्यास सोडवून आणले होतें. असे त्यांचे अनेक हिंदुस्थानी मंडळींवर उपकार झाले होते. मि. कामन यांनां मात्र आपण कोणावर "उपकार" करीत आहों असे वाटत नव्हते. हिंदुस्थानांत कांहीं माल पाठवावयाचा, किंवा हिंदुस्थानी मालाला आर्डर द्यावयाची हे जसे नित्य व्यवहाराचें काम त्याप्रमाणें कोणी हिंदी मनुष्य एलिस आयलंडमध्यें अडकला आहे असें कळलें म्हणजे त्याला मदत करावयाची हेंहि नित्य व्यवहाराचें काम. त्यांत उपकार कसले व कसले काय? पुष्कळदां तर त्यांनी ज्यांस सोडविलें त्यांचीं नांवे देखील ते विसरून जात. आणि जेव्हां वर्षाच्या शेवटीं जमाखर्चाचा खर्डा तयार करतांना "बॅड डेट्स" ची यादी तयार होई तेव्हां मात्र त्यांची आठवण येई. हिशोबाच्या वहीचे पान उलटेपर्यंत ती आठवण त्यांस राही. कधीं कधीं त्या "बॅड डेट्स" पैकीं रक्कम कोणीं आणून दिली म्हणजे मात्र त्यांस आल्हाद होई. ते म्हणत पैसे कोणाला नको आहेत असें नाहीं; पैसे परत मिळाले म्हणून आनंद होणे स्वाभाविकच आहे, तथापि, हिंदी मनुष्य पैसे परत करण्याची आठवण ठेवतो ही विशेषच आनंदाची गोष्ट आहे. पैसे परत करणाऱ्या मनुष्यास घरीं जेवायला बोलवायला ते कधींच विसरत नसत.

मि. कामत जरी अमेरिकेस गेले होते, आणि आपला व्यापार कसा वाढवावा इत्यादि गोष्टींत त्यांचें एकसारखें मन असे, तरी आयुष्यभर त्यांच्या महत्त्वाकांक्षा हिंदुस्थानींच राहिल्या होत्या. मंगेशच्या किंवा शांतादुर्गेच्या देवळाच्या सुधारणेसाठीं कांहीं रक्कम द्यावी, तेथें आपल्या नांवाचा संगमरवरी दगडाचा फलक कोठें तरी बसावा, तेथील लोकांस आपल्या सुस्थितीची माहिती व्हावी इत्यादि गोष्टी त्यांच्या मनांत नेहेमी असत. शांताबाईच्या मनांत तर ज्या कित्येक महत्त्वाकांक्षा होत्या त्यांत आपल्या बहिणींना आपल्या सुस्थितीबद्दल हेवा वाटावा, त्यांनींच आपुली मदत मागावी, व आपण ती करावी, व त्यांनीं आपल्या लहानपणीं आपल्या नवऱ्याच्या गरीबीबद्दल जे आपल्या मनाला लागेल असें केले त्याबद्दल त्यांनीं पूर्णपणे खजील व्हावें व आपण उलट आपणांला जणूं काय त्यांनीं श्रीमंतीच्या तोऱ्यांत केलेल्या अपमानाची आठवणच नाहीं असें दाखवावें असे वाटत असे. पण ही त्यांची इच्छा पूर्ण झाली नाहीं. त्या अमेरिकेला आल्या त्यावेळेस पचवीस एक वर्षाच्या होत्या, आणि त्यांनां त्यांच्या वयाच्या चाळीसाव्या वर्षापर्यंत फारशी श्रीमंती उपभोगावयास सांपडलीच नाहीं, आणि त्यांची श्रीमती चांगली स्थापित होईपर्यंत त्यांचे नटण्यामुरडण्याचे दिवस संपत आले, एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानांत त्यांच्या दोघीहि बहिणींचे नवरे मरून गेले होते व बहिणी विधवा झाल्या होत्या. हे वर्तमान समजल्यानंतर त्यांनां लाजवावयाची इच्छाहि शांताबाईच्या मनांत जिरून गेली, आणि साधारणपणे जगाचा अनुभव अधिक आल्यामुळे व गरीबांस जगांत कठोरपणानें कसें वागविलें जाते याविषयींचा अनेकांचा अनुभव त्यांस कळल्यामुळें त्यांनां आपल्यावर जे जे अपमानकारक दुःखाचे प्रसंग आले त्यांचेंहि वाईट वाटेनासें झाले होतें. त्यांनीं स्वतःसाठीं एक घर जरी अमेरिकेत विकत घेतलें होतें, तरी त्यांच्या डोळ्यासमोर मलबार हिलवरील एखाद्या बंगल्यांत आपण रहात आहोंत आणि मोठमोठ्या शेणवीं, गुजराथी व पारशी मंडळींकडे भेटायला जात आहोंत किंवा

त्यांनां आपल्याकडे चहाला बोलावलें आहे, व आपण आपल्या अमेरिकेंतल्या अनुभवाच्या गोष्टी त्यांनां सांगत आहोंत या प्रकारचें चित्रच त्यांच्या मनांत नेहमीं असे. या प्रकारचे कल्पनाचित्र मनांत ठेवतां ठेवतां बरींच वर्षें निघून गेलीं. त्यांची एकामागून एक आप्तमंडळी कालवश झाली तेव्हां आपलें कायमचें निवासस्थान हिंदुस्थान कीं अमेरिका याचा त्यांनां संदेह पडूं लागला. आणि त्याचें एक कारण त्यांच्या अपत्यांची वृत्ति होय, ती वृत्ति त्यांस सर्वतोपरी इष्ट वाटत नव्हती.

गोविंदराव कामत अमेरिकेला गेले, अमेरिकेत त्यांनीं पैसा मिळविला, तथापि त्यांनां जन्मभर आपण कांहीं तरी अनिष्ट स्थितींत आहोंत असेंच वाटे. त्यांनां पैसा मिळविणें हें सोपें होतें पण कुटुंब वाढविणें हें कठिण वाटत होतें. अमेरिकेसारख्या देशांत मुले वाढणार, तरी त्यांनीं भाषेने अमेरिकन व्हावें हें त्यांनां आवडत नव्हतें. शांताबाई मुद्दाम बाहेर जाण्याच्या प्रसंगीं हिंदुस्थानी तऱ्हेचे उंची कपडे वापरीत, व हिंदुस्थानीपणा पुसूं न देण्याचा प्रयत्न करीत. घरांत मुद्दाम मराठी बोलत, पण मुलांनां लहानपणापासून आपण इतरांपेक्षां निराळे कां हे समजाविणें कठिण होते. आणि पुष्कळ प्रसंगीं त्यांनां निराळेपणा राखतांहि आला नाहीं. नाताळाच्या दिवशीं गोविंदरावांच्या मनांत नाताळाचा सण मुळींच पाळावयाचा नव्हता. धंद्याच्या कारणानें ज्या ओळखी होत त्या ओळखीच्या गृहस्थांच्या मुलांनां देणग्या पाठविणें हें योग्य आहे, तो धंद्याचा भाग आहे असें ते धरीत, व देणग्याहि पाठवीत, पण घरीं हा सण पाळण्याचें कारण नाहीं असेंहि समजत. पण तीहि वृत्ति फार दिवस टिकली नाहीं. शांताबाईंच्या ओळखीच्या ज्या बायका होत्या त्यांच्या मुलांनां देणगी दिल्याशिवाय शांताबाईंनांहि गत्यंतर नव्हतें, आणि पुढे त्यांनां मुलें झालीं तेव्हां शेजारी व स्नेही त्यांच्या मुलांनांहि देणग्या पाठवीत त्याहि नाकारणें शक्य नव्हतें. आपल्या घरांत नाताळचा सण पाळावयाचा नाहीं असें त्यांनीं योजिलें होतें पण तेंहि तुटकपणा किंवा भोंवतालच्या समाजापासून निराळेपणा त्यांस ठेवतां आला नाहीं. अमेरिकेतील मुलांनां "सांटा क्लास" म्हणजे "फादर ख्रिस्तमस्" ठाऊक आहे. तो मुलांनीं निजायला जातांना म्हटलेल्या इच्छा ऐकतो आणि त्यांनीं मागितलेल्या जिन्नसा तो पैदा करतो आणि मुलें निजलीं असतां चिमणींतून उतरून किंवा खिडकींतून उडी मारून मुलांनां पसंत केलेली देणगी आणून देतो, कोणाला खेळाचे जिन्नस देतो, तर कोणाला खाऊचा पुडा आणून देतो, या "सांठा क्लास"वर मुलांचा दृढ विश्वास असतो. खरी गोष्ट म्हणजे आईबाप मुलांस देणग्या देतात. त्या देणग्या मुलांच्या बिछान्याच्या खांबाला बांधून ठेवतात किंवा "ख्रिस्तमस्चे झाड" जें घरांत आणावयाचें त्याला बांधून ठेवतात. व या देणग्या सांटाक्लासनेच आणल्या अशी मुलांची समजूत करून देतात. नंतर मुले आपणांस सांटाक्लासनें काय आणून दिलें तें एकमेकांस दाखवितात. गोविंदरावांनीं घरीं नाताळचें झाड एक वर्ष आणले नाहीं, किंवा सांटाक्लासला आकाशांतून येऊन आपल्या घराच्या चिमणींतून उतरून मुलासाठीं देणग्या ठेवूं दिल्या नाहींत, तेव्हां दुसऱ्या दिवशीं मुलगा आईला विचारूं लागला कीं, आपल्या घरी तेवढा "सांटाक्लास" कसा आला नाहीं, दुसऱ्यांच्या घरीं कां येतो? मुलगा लहान, त्याला ख्रिस्ती किंवा हिंदु हें काय कळतें? त्याला एवढेंच कळे कीं आपल्याकडे सांटाक्लास कांहीं आला नाहीं. आईला त्यास असें सांगावें लागलें कीं तूं कांहीं तरी खोडी केली असशील म्हणून सांटाक्लास कांहीं आला नाहीं. एक दोन दिवसांनीं गोविंदरावांनीं आपल्या यहुदी मित्रांस विचारलें आणि त्याच सुमाराला इंग्लड येथें रहात असलेलें पारशीं कुटुंब अमेरिका बघण्यास आलें होतें

त्यानांहि त्यांनीं विचारलें. दोघांनींहि उत्तर दिलें कीं आम्ही ख्रिस्तमस देशाचार म्हणून पाळतों पण त्याला धार्मिक महत्त्व देत नाहीं. मुलांनां देणग्या देतो, ख्रिस्तमसचे पुडिंग खातो, त्या दिवशी इतर लोकांप्रमाणे टर्की झोडतो पण ख्रिस्त्यांप्रमाणे प्रार्थनेला जात नाहीं. तेव्हां गोविंद-रावांनीं आपल्या घरीं ख्रिस्तमस पुडिंग खावयास आणि मुलांसाठीं देणग्या आणावयास सुरवात केली, व हा त्यांच्या क्रम अव्याहत चालू राहिला.

गोविंदराव कामत यांच्या दिनचर्येत हिंदुस्थानी-पणा थोडाच राहिला होता. पोषाख अमेरिकन, घरांतलें जेवण अमेरिकन पद्धतीचेंच, व मुलांची निगा ठेवण्याची पद्धतहि अमेरिकन, आठवड्यांतून एखाद्या वेळेस वरणभात करीत, आणि कधीं प्रसगविशेषीं सामाजिक प्रसगास जातांना शांता-बाई हिंदुस्थानी पोशाख करीत असे, तेवढ्यावरून त्या कुटुंबाचा हिंदुस्थानीपणा लोकांस स्पष्ट करून दाखवितां येई. नेहमीं बाजारहाट करण्यासाठीं जातांना, घरांत वावरतांना शांताबाईस अमेरिकन पोषाखच केलेला आवडे, कां कीं, तोच सोइ-स्कर होत असे; शेजारणीकडे जाऊन बसायचे झालें तर ते अमेरिकन पोषाखांतच जाणे होई.

जसा देश तसा वेश या न्यायाने हे सर्व ठीक झाले. पण गोविंदरावांस काळजी मोठी पडली होती ती ही कीं, आपलीं मुलें अमेरिकन म्हणूनच वाढतील काय? अमेरिकन भाषा, अमेरिकन पोषाख आणि अमेरिकन जेवण आणि अमेरिकन नागरिकता यांनीं बध्द झालेली मुले हिंदुस्था-नशी संबध्द कशीं रहाणार, आणि त्यानां हिंदु-स्थानविषयीं आपलेपणा कसा वाटणार, त्यांच्या-ठायीं हिंदुत्व कसें राहील, इत्यादि प्रश्न त्यांच्या मनांत डांचत होते. आपली मुलें धर्माशिवाय वाढतील अशी भीति त्यांच्या मनांत येई. मुलांनीं ख्रिस्ती होऊं नये म्हणून दोघांची इच्छा, पण हिंदुत्व अमेरिकेंत राखावयाचे कसे? गोविंदरावांच्या मनांत मुलांच्या ठायीं हिंदुत्व रहावें एवढेंच नव्हे तर महाराष्ट्रीयत्वहि रहावें असे होत. आपल्याला जे संस्कार झाले ते सर्व मुलाला व्हावेत, या तऱ्हेचे मोह त्यांनां होते. ते ईश्वरवादी होते किंवा निरीश्वरवादी होते हें सांगता येत नाहीं, पण निरीश्वरवादी जरी असले तरी त्यांनां राम हवा होता, कृष्ण हवा होता, गणपतीची आरती हवी होती आणि मंडळींनां जमवून "यज्ञेन यज्ञ-मयजंत देवाः" असें मोठ्यानें मंत्रपुष्प गायलाहि हवे होते. त्यांनां धार्मिक नित्यकर्म नको होतें पण नैमित्तिक हवे होतें. निदान आपल्या मुलाला हिंदुत्वाची जाणीव उत्पन्न व्हावी इतपत तरी हवें होतें.

गोविंदराव आपल्या घरांत होतांहोईतों मराठींत बोलत. आणि त्यांनी आपल्या मुलांनां मराठी लिहावयास आणि वाचावयास थोडेसें शिकविले होते. त्यानां ती भोंवतालची भाषा नसल्यानें आई-बाप आपणांवर कांही निराळीच भाषा विनाकारण लादीत आहेत असेंच वाटे आणि आम्ही मरा-ठींत बोलणार नाही असाहि हट्ट मुले धरीत व व तो हट्ट व्यक्त करतांना मराठी भाषेस कांहीं शेलक्या शिव्याहि ती मुले देत. या शिव्या ऐकून आईबापांनां राग येई व त्याबद्दल मुलांनां थोडा मारहि खावा लागे. गणपत्युत्सव एकदोनदां गोविंदरावांनीं केला. पण तो मुलांनां पूज्य भाव-नेचा प्रकार मुळीच न होतां हास्याचा प्रकार होई. नथुरामशेटकडे शिमग्यांत मारवाडी ज्या भावनेने पहात त्याच भावनेने मुले गणपतीकडे पाहूं लागली; गणपती हा पूज्यबुद्धीचा विषय न रहातां आपल्या नैमित्तिक विनोदोत्सवाचा एक अवश्य भाग या दृष्टीनें मुलें त्यांकडे पहात. "गॉड बिलिकीन" ज्याप्रमाणें लोकप्रिय झाला त्या-प्रमाणेंच गणराज गोविंदरावांच्या गृहांत प्रिय झाले! शांताबाईस हें बरे वाटेना! ती म्हणे, जर गणपतीवर मुलांची श्रद्धा जडत नाहीं

गणपती जर थट्टेचा विषय होता -तर गणपती घरीं आणावा तरी कशाला. गणपती अनेक महिने अगोदर मुंबईला मागणी देऊन करवावयाचा, त्याला काळजीपूर्वक तो करायला सांगायचें आणि नंतर अमेरिकेंत यायचा, आणि मुलांनां तो आदराचा विषय न होतां थट्टेचा विषय होतो. हा दैवताचा उलटा अपमान नव्हे काय ? ती विघ्नदेवता आहे; तिचा अपमान झाला तर देवता विघ्नें आपल्या घरांत आणील. गोविंदराव म्हणत वेडी आहेस तू, पूज्य देवता या नात्यानें जरी आपल्या मुलांस गणपतीची ओळख राहिली नाही तरी विनोदाचें आश्रयस्थान या नात्यानें तरी गणपतीची ओळख राहूं दे. गणपतीचा अपमान झाला असला तर गणपती आपली अडचण ओळखून अ[illegible] क्षमाच करील. मुलांना शंकराविषयीं भक्ति नसली तर नसो, त्यांनां भोळ्या शंकराच्या कांही आख्यायिका पुरत, इत्यादि गोष्टी ते बोलत. त्यांच्या या प्रकारच्या अजब धार्मिक वृत्तीचें कारण शांताबाईस नेहमी कळे की नाहीं कोण जाणे !

गोविंदरावांस तीन अपत्यें होती. सर्वांत थोरलें अपत्य म्हटलें म्हणजे मुलगा होता. त्याचें नाव रघुनंदन. तथापि हे लांबलचक नांव वापरण्यांत क्वचितच येत असे, आणि त्याऐवजीं रघु असें संक्षिप्तरूप वापरण्यांत येई, व या "रघु" चेंहि पुढें "रागी" किंवा "रेगी" असें अपभ्रंश झाले होते. रघुनाथ हा गोविंदराव अमेरिकेंत आले त्यानंतर वर्षाच्या आंतच झाला. दुसरें अपत्य मुलगी; तिचें नांव त्यांनां असें ठेवायचें होतें की, जें इंग्रजी नांवहि दिसेल किंवा हिंदी नांवहि वाटेल; निदान अमेरिकन लोकांस तें नांव सहज उच्चारतां येईल. याप्रकारचे अनेक वादविवाद होऊन शेवटीं "लीला" हे नांव निश्चित करण्यांत आलें. लीला ही रघूपेक्षां दोनच वर्षांनीं लहान होती, सर्वांत धाकटें अपत्य "सुंदर" नांवाचा मुलगा होता. लीला आणि सुंदर यांमध्यें दहा वर्षांचें अंतर होतें. कथानकाच्या वर्षी रघुनाथ २४ वर्षांचा होता, आणि तो कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या 'पोष्ट ग्राज्युएट स्कूल' मध्यें अभ्यास करीत होता. मुलगी देखील नुकतीच बी. ए. झाली होती आणि सुंदर हा प्राथमिक शाळेतच होता. रघु हा पोषाखांत व उच्चारांत आणि हावभावांत पक्का अमेरिकन झाला होता, एवढेंच नव्हे तर तो "हसलर" बनला होता. "हसलर" म्हणजे जो काम झटपट करतो असा मनुष्य; जो, काम अमुक करावयाचें ठरलें म्हणजे पुन्हां काल्पनिक संदेहांनीं ते पार पाडणें दूर टाकीत नाहीं, ज्याच्या हालचाली झपाट्याच्या असतात, जो कामांत रेंगाळत नाहीं, पावलें भराभर उचलतो, प्रत्येक काम झटपट करतो, आणि ज्याच्या एका दिवसाच्या हिशोबाला बरेचसें काम मांडतां येईल असा मनुष्य.

रघूचा एकंदर स्वभाव पाहिला म्हणजे तो हिंदु मुलगा नसून अमेरिकन मुलगा आहे असेंच वाटे. त्याला हिंदुस्थानाबद्दल जिज्ञासा होती पण त्याचें सर्व लक्ष, आपण अमेरिकेंतच आपलें आयुष्य घालवावें, अमेरिकन मुलीशींच लग्न करावें, अमेरिकेतच प्रसिद्धीस यावें आणि आपलें लहानपणापासून जे अमेरिकन मित्र झाले त्यांचीच मान्यता मिळवावी या गोष्टींकडे होतें. हिंदुस्थानांतून आपल्या आप्तांच्या आलेल्या फोटोमधील पोशाख पाहून चांगल्या मनुष्यानीं रंगभूमीवर येण्यासाठीं हा वेडा वांकडा पोषाख मुद्दाम केला आहे काय अशी त्याची भावना होई. सामान्य पोषाख म्हणजे अमेरिकन पोषाख, खरी साधी भाषा म्हणजे इंग्रजी भाषा; अशी त्याची भावना अल्पवयांतच झाली. तो मराठींत बोलूं शके, आणि तो जेव्हां आईबापाबरोबर सार्वजनिक ठिकाणी जाई आणि दुसऱ्या कोणास समजूं नये असें जेव्हां आपआपसांमध्यें भाषण बोलावें लागे तेव्हां

मात्र तें मराठींत बोले. तेव्हां जणूं काय मराठी ही एखाद्या गुप्त राजकीय मंडळाचीच भाषा आहे काय अशी भावना त्यास वारवार होई, सुसंस्कृत अमेरिका देश आपला होय हे त्यास इतकें वाटत होते कीं, जेव्हां कधी कधी त्यास हिंदुस्थानाबद्दल प्रेमाचे उमाळे येत व आपण हिंदुस्थानांत जाऊन कांही तरी करावें असे वाटे तेव्हां देखील त्याची कर्तव्यभावना अमेरिकन होती. आपण अमेरिकन मित्रांच्या लोकमतास जबाबदार आहो, आणि आपल्या हिंदुस्थानांतील पराक्रमांची वर्णने अमेरिकन मित्रांच्या कानी पडून आपला गौरव अमेरिकन लोकांनीं करावा ही भावना त्याच्या मनांत प्रदीप्त होई. काम हिंदुस्थानांत करावें पण त्याबद्दल जी प्रशंसा मिळवावयाची ती हिंदू लोकांची मिळविण्याच्या एवजी अमेरिकन लोकांची मिळवावी या तऱ्हेच्या भावनेमुळे त्याच्या राजकीय विचारासहि निराळी गति लागली होती. व जेव्हां अमेरिकेतल्या, हिंदुस्थानास स्वातंत्र्यासाठीं स्थापन झालेल्या संघाची व्याख्याने होत असत, तेव्हां त्याचे विचार इतर हिंदुस्थानी मंडळीपेक्षां व त्याप्रमाणेच उदारमतवादी अमेरिकन लोकांपेक्षां निराळ्या तऱ्हेचे आहेत असे दिसून येई. आणि ते विचार अनेक अमेरिकन मुत्सद्दी पत्रकर्ते आणि व्यापारी यांच्या दृष्टीस आल्याशिवाय राहिले नाहींत. तो म्हणे:—युद्धोत्तर जग आतां केवळ अमेरिकेचे ऋणको आहे. आजच्या यूरोपास आपले स्थानिक कारभार करण्यासाठीं देखील अमेरिकेच्या मदतीची अपेक्षा आहे. आज यूरोपांतल्या कित्येक हावऱ्या राष्ट्रानीं मोठमोठाले भूभाग आपल्या हातांत ठेवले आहेत आणि त्या भूभागांचा विकास करण्यासाठीं मात्र त्यांच्यापाशी पैसा नाहीं ! याशिवाय जिंकलेल्या लोकांस आपल्या बरोबरीचे करून आपण त्यांच्याशीं व्यवहार ठेवावा आणि दोघांचें हित साधावें ही अमेरिकन भावना यूरोपांतील मुत्सद्यांस अजून पटली नाहीं. पटली तरी परिणाम असा होईल कीं, जर इंग्लंड, फ्रान्स सारखीं जेतीं राष्ट्रें—जी अगोदरच आपलीं देणेंदार झाली आहेत तीं राष्ट्रें जर कमी प्रगत प्रदेशाचा विकास करण्यासाठीं तेथे पैसा ओतूं लागतील तर त्यांस स्थानिक विकासालाच पैसा कमी पडेल जर ते विकास करूं इच्छिणार नाहींत तर त्यांच्या हाती अप्रगत राष्ट्र ठेवण्याचे समर्थन होत नाहीं.

ज्याप्रमाणें एखादा ऋणको गैर फायदेशीर धंदा करून बुडावयाच्या पथास लागला तर त्यास सल्ला देण्याचा सावकारास अधिकार आहे त्याचप्रमाणे आपले ऋणको जीं युरोपीयन राष्ट्रें त्यांनी विनाकारण मोठया प्रदेशाची जबाबदारी आपल्यावर घ्यावी हे योग्य नाहीं. त्यांत त्यांचेच नुकसान आहे, वगैरे गोष्टी सांगण्याचा अमेरिकेस अधिकार आहे. तुर्कस्तानसारख्या कमी श्रीमंत राष्ट्रापासून अरबस्तान स्वतंत्र झाल्यामुळे त्यावर खर्च करावयाच्या जबाबदारीतून अंगोरा सरकार मोकळें झाल्यामुळें त्याचा फायदाच होणार आहे. त्याप्रमाणेंच ज्या यूरोपीयन राष्ट्रांपाशी पैसा नाहीं त्यांच्या ताब्यांत मोठाले मुलुख ठेवणे हें जिंकलेल्या व जिंकणाऱ्या अशा दोन्ही राष्ट्रांच्या दृष्टीनें गैरहिताचे आहे. हिंदुस्थानाच्या विकासासाठीं पैसा खर्च करणें, लोकांनां शिक्षण देणें व त्यांची खर्च करण्याची शक्ति वाढविणें या सर्व क्रिया करून मागसलेल्या राष्ट्रांची उन्नति करण्यास इंग्लंडपेक्षां अमेरिकाच अधिक समर्थ आहे, व यासाठी अमेरिकेने हिंदुस्थानाच्या प्रश्नाकडे लक्ष देणे अधिक अवश्य आहे. सर्व राष्ट्रांच्या लोकांनां उद्योगास उत्तेजन देणें, आणि अत्यंत कठिण व मोठ्या भांडवलाच्या लोकांसच शक्य असले उत्पादन आपण करणें आणि सर्व जगाची याप्रमाणें प्रगति करणें येणेंप्रमाणे इतर जग आणि अमेरिका यांतील उद्योगविषयक संबंधाची पुनर्घटना करणें हा अमेरिकेचा पहिला कार्यक्रम आहे

संपत्तीचे उत्पादन मनुष्यपरिश्रमानें होतें आणि जमीन आणि इतर प्रकारचे भांडवल हे केवळ सहाय्यक होतें, हें जें तत्त्व सोशालिस्टांनी पुढें मांडलें आहे त्यांतील सत्य आपण ओळखलें पाहिजे. नवीन खाणी शोधण्याचा प्रयत्न जसा भांडवलवाल्यांकडून होतो त्याचप्रमाणे मोठ्या भांडवलाच्या राष्ट्रांकडून मागसलेल्या मनुष्यसमूहांस उत्पादनदृष्ट्या महत्त्वाचे स्थान मिळावे यासाठीं खटपट झाली पाहिजे. कमी प्रगत लोकांची खर्च करण्याची आणि काम करण्याची शक्ति वाढविण्यासाठीं त्यांस शिक्षण देणे ही नवी खाण किंवा यांत्रिक युक्तिशोधण्या इतकीच महत्त्वाची गोष्ट आहे हें तत्त्व प्रगमनशील राष्ट्रांतील लोकांनी ओखळलें पाहिजे. जगांतील मुख्य मनुष्यविभाग म्हणजे हिंदुस्थान व चीन ही राष्ट्रें होत. ज्यामानाने या राष्ट्रांचा विकास झाला नाहीं त्यामानानें अधिक सुधारलेल्या राष्ट्रांची उत्पादनशक्ति खुंटली आहे असें समजावे. हिंदुस्थान देश आतां जागा झाला आहे. त्यास आपला विकास झाला पाहिजे हें तत्त्व पटले आहे. शिक्षणासाठी लोकांचाच प्रयत्न अधिक आहे, पण सत्ता हातांत पकडून रहाणारें सरकार लोकाचा विकास फारसा होऊं देत नाहीं. अशा स्थितीत अमेरिकेची सहानुभूति प्रगतीच्या आग्रही वर्गाकडे राहिली पाहिजे. आणि जर आपल्या साम्राज्यातील महत्त्वाच्या प्रदेशाचा योग्य विकास होऊं देण्यासाठीं इंग्लंड पराकाष्ठा करीत नसेल तर इंग्लंडला, धनको अमेरिकेनें तसें करण्यास भाग पाडिले पाहिजे. इत्यादि.

रघुनंदनचीं या प्रकारची मते पाहून पुष्कळ हिंदुस्थानी मंडळीस मजा वाटली, व कांहीं मोठमोठ्या देशभक्तांस रागहि आला. राग कां आला, ते अमेरिकेतील निरनिराळ्या हिंदी समूहांचीं राजकीय मते काय होती हें समजलें असतांच समजेल. याविषयीं सविस्तर माहिती पुढें होईलच.

गोविंदरावांची मुलगी लीला ही अमेरिकन या भावनेनेंच वाढत होती. सामान्य मध्यम घराण्यांतील अमेरिकन मुलींचे गुण तिच्या अंगी चागलेच वृद्धिंगत होऊं लागले होते. अमेरिकन मुलीचे चापल्य, जगांत चाललेल्या सर्व प्रकारच्या चळवळीविषयी जिज्ञासा, निर्भयवृत्ति या सर्व गोष्टींमुळे तिच्या आईस जरी तिची सर्व प्रकारची वाढ पाहून आनंद होई तरी तिच्याबद्दल तिच्या आईस फारच काळजी वाटत होती. एखाद्या अमेरिकन तरुणाबरोबर लग्न करून तिनें अमेरिकेतच रहावे हे शांताबाईस नको होतें, उलट तिला असें वाटे की, लीलेचें लग्न तिच्या आप्तांपैकी कोणाशीं तरी व्हावें आपणांस आपलें द्रव्यार्जन सपवून वृद्धापकाळाचे दिवस काढावयास हिंदुस्थानांत जावयाचें आहे हेंच चित्र तिच्या डोळयासमोर असल्यामुळे इतक्या स्वतत्रतेने वाढलेली मुलगी हिंदुस्थानात वाढलेल्या मुलाबरोबर कशी नांदेल इत्यादि विचार तिच्या मनात उत्पन्न होत असत, आणि यामुळे लीलेच्या अंगांतले गुण ते दुर्गुण आहेत अशा तऱ्हेच्या भावनाहि तिच्या मनांत उत्पन्न होत. एकदां एक हिंदुस्थानांतून नवीन आलेला विद्यार्थी कामतांच्या कडे जेवणास आला होता; तेव्हां त्याच्या वेडयावांकडया इंग्रजी उच्चारांचे, आणि व्याकरण आणि भाषापद्धतिदृष्टीनीं चुकांचे, आणि त्याबरोबरच भाषणांत आलेल्या जाडया शब्दांचें परिहासयुक्त अनुकरण, तो विद्यार्थी गेल्यानंतर दोनचार दिवस लीला करीत होती. लीलेला इंग्रजी भाषा स्वभाषेसारखी झालेली आणि अमेरिकेस आलेल्या हिंदुस्थानी विद्यार्थ्यांस इंग्रजी ही परकी भाषा, यामुळे दोघांच्या भाषेंत अंतर रहाणारच, आणि हिंदुस्थानांतल्या हिंदु मडळीत मनुष्याची किंमत त्याच्या इंग्रजी भाषा बोलण्याच्या पटुत्वावर होते ही गोष्ट शांताबाईच्या मनांत पक्की राहिलेली. शांताबाईस वाटे की, नुसत्या इंग्रजी भाषेंत

अधिक नैपुण्यामुळे लीलेस नवऱ्याच्या इंग्रजीचे जर कधी हसूं आले तर हिंदुस्थानी नवरा नारसिंह रूप धारण करील. लीलेसहि आपला नवरा आपल्यापेक्षां कमी योग्यतेचा वाटेल वगैरे गोष्टी तिच्या मनांत येत. शिवाय हिंदुस्थानांतल्या रीतिरिवाजाकडे सामान्य अमेरिकन ज्याप्रमाणे परक्याचे मनोरंजक रिवाज म्हणून पाही त्याप्रमाण लीला व तिचा थोरला भाऊ ही दोघेहि पाहात, हे शांताबाईस दिसतच होते व यामुळे लीलेच्या भवितव्याविषयीं तिला फारच काळजी वाटे.

धार्मिक बाबतीत मुलांची मने कशी बनली होती हे पाहूं गेले असतां देखावा निराळाच दिसेल. गोविंदराव कामत यांनी कांही भक्तिपर अभंग मुलांकडून मुद्दाम पाठ करून घेतले होते व स्वत: ते म्हणत त्यावेळेस त्यांची मुलेहि त्यास साथ देत. पण त्या अभंगांपासून त्याच्या ठायी कोणत्या धार्मिक भावना जागृत होत हें सांगतां येत नसे. पण धार्मिक भावना नसतांहि आनंदानें धार्मिक पदे म्हणण्याच्या बाबतीत ही अमेरिकन मुले तेथल्या इतर हिंदूंमध्ये अपवाद दिसत नसत. तेथली बहुतेक हिंदु मंडळी ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं संशय बाळगणारी होती. ती मंडळी म्हणत की ईश्वर म्हणजे जर सर्व विश्व चालविणारी शक्ति असे म्हटले तर जड द्रव्यापासून ती निराळी व त्यावर राज्य चालविणारी वस्तु आहे असे होईल. व जड द्रव्यावर हुकमत चालविणारी शक्ति द्रव्यरूप नाही अभ ग ।, । ने कसे म्हणता येईल? ती द्रव्यरूप असो अगर नसो तिची खुशामत करण्याचे कारण काय? असे तात्त्विक वाद करणारी होती. पण ही सर्व मंडळी गोविंदराव जेव्हां ग ण प ० ु ० न करीत तेव्हां आनंदाने जमत. कां की, गणपती खरा असो अगर नसो पण मोदक तर खरे आहेत की नाहीत अशी पृच्छा ते करीत. भक्तीची पदे देखील ते म्हणत, कां कीं, पदें म्हणण्यास कांहीं तरी निमित्त हवे लागते. गणपतीचा उत्सव हा जर लोक जमण्याला, मराठी, हिंदुस्थानी पदे गाण्याला कारण झाला तर त्यांत बिघडले कोणतें? गणपतीच्या नांवाने लाडू खाल्ले तर ते कडू थोडेच लागतात! असें ते म्हणत. प्रथमत: हा गणपत्युत्सव गोविंदराव घरीं करीत असत. पण पुढे मंडळी जेव्हां बरीच जमू लागली आणि गाण्याचा शेजारच्या मंडळीस त्रास होतो अशी तक्रार जेव्हां आली तेव्हां ते एका हॉटेलमध्यें उत्सव करू लागले. मोदक तेवढे करविण्यासाठीं शांताबाई त्या दिवशी दुपारी (कां की, गणपतीच्या उत्सवाचे जेवण रात्रीच होई) हॉटेलात जाऊन देखरेख करीत असे.

रघुनंदन आणि लीला या धार्मिक प्रसंगाना मंडळींनां ` · · ।. गाण्यास व गोड खाण्यास संधि या दृष्टीनेच मान देत असत.

अमेरिकेत त्यांनां युरोपांतील निरनिराळीं राष्ट्रे दिसत, आणि ती बऱ्याच अंशी आपापसांतच दळण वळण ठेवून कशीं रहातात हेहि त्यास दिसे आणि त्यामुळे निरनिराळ्या जातींनी व्यापलेला हिंदुस्थान कसा असेल याची त्यांस कल्पना येई. हिंदुमुसलमानांच्या दुहीचा प्रश्न म्हणजे त्यांस फारच गूढ पडे; त्यांस असें वाटे कीं, हिंदी लोकांमध्ये आपण अन्न कोणतें खावे, ईश्वर पूजन कसे करावे आणि कोणती भाषा पवित्र समजावी याविषयी भिन्न कल्पना धारण करणारे आहेत आणि ते भिन्न कल्पना धारण करतात म्हणून एकमेकांपासून निराळे राहून एकमेकाचा द्वेष करतात. हा प्रकार त्यांस फार विचित्र वाटे.

हिंदुस्थानचा इतिहास त्यांनीं वाचला होता. तो इतिहास वाचल्यानतर त्यांनीं मुद्दाम हिंदूनी लिहिलेले इतिहास वाचले तेव्हा त्यांना कळून आले की कांही विशिष्ट पुरुषांबद्दल आणि त्यांच्या कृतीबद्दल हिंदु लोक फार अभिमान बाळगतात. तेव्हा त्यांस असा प्रश्न उद्भवे कीं शिवाजीचीच थोरवी का गावी? शिवाजी इंडियन, औरंगजेब

इंडियन; शिवाजीनें औरंगजेबाचें राज्य नष्ट करण्याचा जो प्रयत्न केला त्याच्या ऐवजीं ते राज्य वाढविलें असतें तर अधिक चांगले झाले नसतें काय? तसे झालें असते तर हिंदुस्थान एकसत्तेखालीं येऊन यूरोपीयांच्या तावडींत गेलें नसतें. आणि अशानें फरक काय झाला असता तर एवढाच कीं, लोक एकेश्वरी झाले असते. देवनागरीच्या ऐवजीं फारसी लिपी वापरली गेली असती आणि त्यांच्या खाण्याच्या पदार्थांत फरक झाला असता; आणि शिवाजीची कामगिरी काय तर त्याने दिल्लीच्या मुसुलमानाची लिपि व उपासनापद्धति सार्वत्रिक होण्याची आपत्ति टाळली.

एका जमीनींत वाढणाऱ्या झाडाचे बीं आपण अगदी भिन्न प्रकारच्या जमीनीत नेऊन लावले तर ज्याप्रमाणे तेंच झाड पण अगदीं निराळ्या प्रकारचे दिसूं लागते त्याप्रमाणे गोविंदराव कामत यांच्या मुलांची गोष्ट होती. स्वभाव, महत्त्वाकांक्षांची दिशा, धार्मिक कल्पना या सर्व बाबतींत त्यास निराळेपणा आला होता. मराठी भाषा मुलांची कायम रहावी म्हणून जो अटोकाट प्रयत्न आईबापाकडून झाला त्यामुळे मराठी भाषा कशीबशी राहिली खरी पण मुलांची त्या भाषेकडे दृष्टि ती आपली भाषा म्हणून मुळींच नव्हती. त्यांनां इंग्रजी ही आपली भाषा म्हणून वाटे आणि मराठी ही केवळ आपल्या घराण्यांतल्या मंडळींनां दुसऱ्यास न समजेल असें आपापसांत बोलावयास उपयोगी पडणारी भाषा वाटे. एखाद्या गुन्हेगार टोळीस आपले रहस्याचे बोलणे बोलण्यासाठी जशी मिताक्षरीसारखी भाषा उपयोगी आहे तशीच ती कोणाची तरी चेष्टा करण्यास उपयोगी म्हणून ते मराठी भाषेकडे पहात. या गोष्टी मागे सांगितल्याच आहेत. एखादा दुसरा महाराष्ट्रीय जेव्हां त्यास न्यूयार्कमध्ये भेटे तेव्हां त्यांस हा कोणी आपल्या रक्ताचा मनुष्य आला किंवा "आपली" भाषा बोलणारा मनुष्य आला असें न वाटतां "आपली गुप्त भाषा समजणारा मनुष्य" आला असें त्यास वाटे.

मुलांच्या बाबतींत पोषाखाची अडचणच नव्हती. सामान्य अमेरिकन पोषाख तोच त्याचा पोषाख झाला होता. कधी कधी बापानें मुलास आपल्या बरोबर पटका बांधून नेले होतें एवढेच. पण मुलीच्या पोषाखाच्या बाबतींत "राष्ट्रीयत्व" ठेवण्याचा आईबापांचा आग्रह असे. आणि त्याबद्दल मुलीस राग येत असे. तिला साधा पोषाख किंवा खरा पोषाख म्हणजे अमेरिकन पोषाख वाटे, आणि हिंदी पोषाख म्हणजे नाटकी धुंगट वाटे. रस्त्यावरून तर साडी नेसून लीला कधीच गेली नाही. साडी नेसून बाहेर पडण्याचा प्रसंग आला म्हणजे साडी ओव्हरकोटाखालीं लपविली गेलीच. टोपी चढविलेली असावयाचीच; कुंकु लावण्याचा आईनें आग्रह केलाच तर तिला फार राग येई. 'मी १६।१७ वर्षांची होईपर्यंत अमेरिकन मुलीचा पोषाख मला चालत असे व आताशांच माझ्यावर जगाविरुद्ध पोषाख करण्याचा जुलूम कां' असे ती म्हणे.

शांताबाई आणि गोविंदराव यांचे घरांत फारसे भांडण होत नव्हते, पण कित्येकदां कडाकडीचे भांडण झालें होतेंहि आणि तें लीलेमुळेंच झाले होतें, आणि त्या भांडणांत शांताबाईच्या म्हणण्याची सत्यता गोविंदरावांस अधिकाधिक पटूं लागली होती. मुले कशीं वाढवावीं यासंबंधाने आपण बायकोच्या म्हणण्याप्रमाणे चाललों असतो तर किती तरी बरे झालें असते! आपल्या मुलांनीं हिंदुस्थानला गेले पाहिजे हे गोविंदरावांस मान्य होते पण त्यांनीं केव्हां जावें याविषयीं शांताबाई आणि गोविंदराव यांत मतभेद उत्पन्न झाला होता. मुले दहाबारा वर्षांची असतांच त्यांनीं मुंबईला जावें असें शांताबाई म्हणे तर मुलांचे शिक्षण चांगलें झाल्यानंतर त्यांनीं मुंबईस जावे असे गोविंदराव म्हणत. गोविंदराव

मध्येंच एकदां हिंदुस्थानांत गेले तेव्हां ते यूरोपियन लोकांमध्ये न राहतां हिंदु मंडळीमध्ये रहात होते आणि, तेथें असताना त्यांनां हिंदुस्थानांतील आयुष्यक्रमाविषयी बराचसा कटाळा उत्पन्न झाला. तेथील प्लेग, मलेरिया इत्यादि गोष्टींच्या भीतींत नेहमीं रहावयाचें त्यांस दुःखप्रद वाटे, रक्तपिती झालेलीं माणसें रस्त्यांत भीक मागत खुशाल हिंडतात आणि भिक्षा मागायला अगदी जवळ येतात, हे पाहून त्यांनां रस्त्यांतून हिंडण्याची भीति वाटूं लागली होती. आपल्या आप्तांच्या घरीं त्यांनां असे दिसून आलें कीं, आप्तांच्या बायकांनां आणि मुलांनां हातरुमाल वापरण्याची संवय नाहीं, बायका पदरांनां नाकें पुसतात आणि कुंकवाचीं बोटें दारांनां किंवा भिंतीला पुसतात, मुलांनां धाडशीपणाचें शिक्षणच नाहीं, त्यांच्या महत्त्वाकांक्षा अगदी लहान, त्यांचे मत्सर देखील अत्यंत क्षुद्र गोष्टींबद्दल आणि आईबापांची प्रवृत्ति देखील मुलांनां धाडसास प्रवृत्त करील अशी मुळींच नाहीं. सुशिक्षित वर्गाशीं त्यांचा संबंध आला तेव्हां तर त्यास सुशिक्षित कसे म्हणावे हाच गोविंदरावांस प्रश्न वाटूं लागला. जगांत चाललेल्या मोठमोठ्या व्यवहारांची त्यांस कांहींच माहिती नाही. बऱ्याच सुशिक्षित वर्गास चेक म्हणजे काय चीज आहे हे ठाऊकच नाहीं असें ते म्हणत. हे पाहिल्यानंतर त्यांस प्रश्न पडूं लागला कीं, आपलीं मुलें येथें जर शिकावयास पाठविलीं तर तीं येथल्या मुलांचेंच किंवा त्यांच्या आईबापांचेंच अनुकरण करूं लागतील. मुलांची महत्त्वाकांक्षा लहान होणें म्हणजे कुटुंबवृक्षाची वाढ खुंटविणें होय. सामान्य सुशिक्षितांचीहि भावना अशी झालेली कीं, यूरोपीयन लोक म्हणजे आपल्यापेक्षां किती तरी उच्च दर्जाचे. यूरोपीयन लोकांनां राहण्यास चांगली जागा अवश्य आहे पण हिंदु मंडळींनां तशी जागा अवश्य नाहीं. ते बाहेर ठिकाणीं गेले म्हणजे ते यूरोपीयन हॉटेलांत उतरत तेव्हां त्यांचे आप्त म्हणत कीं, हे " साहेब बनले! यांनां नेटिव्ह मंडळीची घाण येते." साहेबाविषयीं तुच्छतेची भाषा वापरणारी ही मंडळी साहेबाविषयी मनांत तुच्छतेचा भाव धरणारी होती असे मुळींच नाहीं. सर्वांत श्रेष्ठ हिंदी मंडळींनां जो सन्मान मिळावयाचा त्यापेक्षां फाटक्या यूरोपीयनाला सन्मान आपल्या लोकांकडूनच अधिक मिळावयाचा. यूरोपीयननें वर असावें आणि त्याचा दुय्यमपणा हिंदूनें पत्करावा अशा तऱ्हेची भोंवतालची परिस्थिति असल्यामुळें या परिस्थितीत आपल्या मुलांनीं वाढावें हे त्यांस बरें वाटेना. त्यांच्या मनात रघूला हिंदुस्थानांत पाठवावयाचें होते पण रघूचें शिक्षण चांगलें झाल्यानंतर त्याला व्यवहारासाठी पाठवावयाचें होते, त्यांच्या मनांत लीलेला इतक्यांतच पाठवावयाचें नव्हतें, कां कीं, लीलेची अमेरिकन हवेत तयार झालेली वागणूक तेथील मंडळीस भयप्रद वाटेल. मुलीनीं कसें असावें यासंबधानें भोंवतालच्या लोकांच्या ज्या कल्पना होत्या, त्या कल्पनांनीं ते लीलेविषयी मत बनविणार आणि लीला फिरावयाला गेली आणि ज्याच्या बरोबर ती फिरावयाला जाईल त्याचा तिनें हात धरला म्हणजे तो मनुष्य बिचकणार, आणि भोंवतालची जनता लीलेला अनीतीनें वागणारी मुलगी समजणार.

लीलेसारख्या स्वतंत्र वृत्तीत वाढलेल्या मुलीस जग न पाहिलेल्या मुंबईतील आपल्या जातींतल्या लोकांनीं विनाकारण वाईट ठरवावें हें गोविंदरावांस इष्ट वाटत नसल्यामुळे पुढें त्यांस असे वाटूं लागले कीं, चांगल्या संवयी, शिक्षण, धाडस व कर्तृत्व इत्यादि गुणांनी हिच्या योग्यतेचा जो तरुण असेल त्याबरोबर हिचें लग्न व्हावें, मग तो कोणत्याहि जातीचा कां असेना. शांताबाईस हा विचार मुळींच पसंत नव्हता. शांताबाईस असें वाटे कीं, शिक्षण, धाडस व कर्तृत्व इत्यादि गोष्टींचा मुख्य उपयोग काय, पैसा मिळविणें हाच ना? तो पैसा आपल्या

जवळ आहेच आणि मुंबईत आपल्या जातीची पैसेवाली मडळी पुष्कळच आहेत, तर आपल्याला कांहीं तरी खटपट करून आपल्या जातींतलाच जांवई मिळविला पाहिजे. याप्रमाणें दोघांचे निरनिराळे विचार होते. आणि त्यामुळे नवराबायकोमध्यें जी घरांत भांडणें होत तीं मुलांच्या कानावर आल्याशिवाय राहिली नाहींत. एकदां असल्या प्रकारचा वादविवाद सुरू असतांच लीला म्हणाली कीं, मी लग्न कोणाशीं करावें हें तुम्हीं कोण ठरविणार. मला वाटेल तर मी निग्रोबरोबर लग्न करीन. मला तुमची जातच नको. मी हिंदुस्थानी नाहीं, मी अमेरिकन मुलगी आहे, आणि तुम्हीच माझ्या जातीचे नाहींत. तेव्हां माझ्या लग्नाच्या भानगडींत तुम्ही पडूं नका. तुम्हाला माझे लग्न ठरवायचा काय अखत्यार आहे ? तुम्ही मला धाक घालणार तो काय कीं मला तुम्ही कांहीं पैसे ठेवणार नाहीं एवढाच ना. मला तुमचा पैसाच नको आहे. मी स्टेनोटाइपिस्ट होईन किंवा वाटेल तो धदा करीन आणि वाटेल त्याच्याबरोबर लग्न करीन किंवा लग्नाशिवाय राहीन. या तऱ्हेचे बोलणे एकदां ऐकल्यावर आईबापांनीं आपलें यासंबंधाचें बोलणे एकीकडे असतानांच करावयाचे असें ठरविले. शांताबाईची आपली मुलगी आपल्या जातींतल्याच मुलाला द्यायची आकांक्षा कोणीकडेतरच गेली आणि जात राहूंद्या एका बाजूला; मुलगी हिंदूबरोबर लग्न करो म्हणजे मिळविली, असें उभयतांस वाटूं लागलें. आईबापांनीं आतां एवढेच योजिलें कीं, आतां आपल्या मुलीला तरुण हिंदुस्थानी विद्यार्थ्यांची संगत लावावी. एवढ्यासाठींच जो प्रयत्न करावयाचा तो केला पाहिजे, आणि तो प्रयत्न करतांनां हिंदूंची संगति आपण हिच्यावर लादतों अशी हिची कल्पना होतां कामा नये.

मि. कामत यांच्या या विचारामुळें त्यांचें घर हिंदुस्थानी मंडळींचें केंद्र होण्यास बरीच मदत झाली, आणि तरुण मंडळींनां लीलेच्या सहवासात राहू देण्याची मि. कामत यांची प्रवृत्ति अधिक वाढली, आणि यामुळें लीला, तेथील हिंदुस्थानीं मंडळीत ईर्ष्या, असूया इत्यादि भावनांच्या जोपासनेस कारण झाली.

त्यांनां महाराष्ट्रीयत्वाचा सस्कार थोडाबहुत होण्यास एकदोन व्यक्ती कारण झाल्या होत्या. गंगाधरपंत नांवाचे एक महाराष्ट्रीय मास्तर त्यांस मिळाले होते. गंगाधरपंत अमेरिकेत प्रथमतः गोविंदरावांकडे कांहीं काम मिळविण्यास मदत करा म्हणून विनंति करण्यास आले होते, आणि गोविंदरावांनीं, काम कसें मिळवावें यासंबंधानें कांहीं यशस्वी सूचना करून त्यांस मार्गास लाविलें होतें:-गोविंदरावानी त्यांस आपल्या मुलांनां मराठी शिकविण्याचे काम दिले होते. या गंगाधरपंतामुळें या हिंदी–अमेरिकन मुलांस हिंदुस्थानच्या वातावरणाची कल्पना आली. "इंग्रजांनीं १८१८ साली पेशव्यांचें राज्य घेतलें, आणि जर इंग्रज आडवे आले नसते तर सर्व हिंदुस्थान पेशव्यांच्या अंमलाखालीं आले असते, मराठी भाषेस सर्व हिंदुस्थानभर महत्त्व आले असते, महाराष्ट्रीय मंडळी चोहोंकडे प्रमुख असती, वाशिंग्टनला हिंदुस्थानचे वकील आले असते व ते महाराष्ट्रीय असते, इंग्रजांनीं महाराष्ट्रीयांचें राज्य घेतले तें त्यांनीं परत मिळविले पाहिजे. शिंदे, होळकर व गायकवाड हे तिघेहि आज निरुपयोगी झाले आहेत, होळकराने दगाबाजी केली नसती तर पानपत फसलें नसतें, पेशव्यांची सत्ता एकसारखी वाढत गेली असती, होळकरांनां पेशव्यांचीं धोत्रें बडवावीं लागतील कीं काय अशी भीति वाटत होती पण त्यांस आतां इंग्रजांचे बूट पुसावे लागतील. हे राजे लोक इंग्रजांविरुद्ध बंड करण्याच्या उपयोगी पडणार नाहींत. तरुण हिंदुस्थानी लोकांनीं आतां एकत्र जमलें पाहिजे आणि हिंदुस्थान

इंग्रजांच्या ताब्यांतून सोडविला पाहिजे." याप्रकारचे गंगाधरपंताचे व्याख्यान चालूं लागलें म्हणजे रघु मध्येंच बोलायचा " होय, दुसऱ्या लोकांनां आपल्या ताबडीत ठेवण्याची संवय इंग्रजास आहे खरी, इंग्रज या देशालाहि आपल्या ताबडींत ठेवून लुटींत होता, पण आम्ही अमेरिकन लोकांनी इंग्रजी सत्तेस पार घालवून दिले."

गंगाधररावाला धार्मिक बुद्धीचा मनुष्य म्हणतां येईल किंवा नाहीं हे ज्या त्या धार्मिक मनुष्याच्या व्याख्येप्रमाणे ज्याचे त्यास ठरवावें लागेल. त्याचा देवाच्या अस्तित्वावर विश्वास होता किंवा नाहीं हें सांगतां येणार नाहीं. तथापि जर कोणा मिशनऱ्यांनी हिंदूंच्या देवासबंधाने टीका केली तर त्यास संताप येई. पण त्याबरोबर हिंदूंचा धर्म हिंदूंस समजावून देणाऱ्या कनवाळु परकीयांचा अधिकच संताप येई. संध्येतले अघमर्षण आणि मार्जन यांच्या योगानें इलेक्ट्रिसिटी कोणीकडून कशी जाते हें सांगून " हिंदु धर्म " सिद्ध करू पाहणाऱ्या थिऑसफीच्या धंद्यांतल्या इंग्रज कुमारीविधवांचा तर त्यास अधिकच संताप येत असे. पण त्याहूनहि संताप, आनींबिझांटचा आधार देऊन हिंदुधर्माचे महत्त्व सिद्ध करू पाहणाऱ्या आपल्या " धार्मिक " भावनांच्या मंडळीचा येत असे. त्यावेळेस "देव म्हणे बद्ध आला वृद्धाहूनि जिष्णुचाच राग मला" हे आर्यार्ध तो पुटपुटे. हिंदुस्थानाच्या इंग्रज कनवाळूंचा त्यास धार्मिक क्षेत्रांतच संताप येत असे असे नव्हे, तर राजकीय क्षेत्रांत तर अधिकच येत असे.

गंगाधररावाचे मि. कामत यांच्या घरीं जाणें येणें सुरू झाल्यामुळे आणि अस्सल महाराष्ट्रीयाच्या अस्सल भावना त्या कुटुंबांतील मुलांस दिसल्यामुळे आपल्याला अज्ञात असे कांही जग आहे, त्या जगाशीं आपला कांहीं तरी आपलेपणाचा संबंध आहे, इत्यादि कल्पना त्यांच्या मनांत येऊं लागल्या. इंग्रजी भाषा हिंदुस्थानांत येऊन देशी भाषांनां मारून टाकींत आहे इत्यादि गोष्टी सांगतांना गंगाधररावांस जो संताप येतांनां दिसे त्याच्या योगानें रघुनंदन व लीला यांनां प्रथम मौज वाटे, व पुढे जरी गंगाधररावांच्या या बाबतींतील त्वेषाच्या दृढतेमुळें आणि गंगाधररावांविषयीं वाढत असलेल्या स्नेहभावामुळें देशी भाषा मरत जाव्या ही गोष्ट दुःखास्पद आहे असे त्यांस वाटूं लागले होते तरी त्यांनां गंगाधररावांसारख्या व्यक्तीच्या मताविषयी व त्या मतामुळें होणाऱ्या दुःखाविषयीं खरी सहानुभूति कधींच उत्पन्न झाली नाहीं. लीलेनें कांही रेड इंडियन लोकांसंबंधीच्या कादंबऱ्या वाचल्या होत्या त्या कादंबरींत इरेक्वा नांवाच्या एका इंडियन जातीच्या नायकाचे चरित्र वर्णन केले होतें, त्या कादंबरीतल्या नायकाविषयीं लीलेस जी भावना उत्पन्न होई तीच गंगाधररावांविषयीं उत्पन्न झाली होती कीं, त्या भावनेस कांहीं निराळें स्वरूप आलें होतें हे सांगतां येत नाही. त्या कादंबरीतला नायक कांहीं अद्भुत गुणांचा व भावनांचा ठेवा आहे, असे तिला वाटत होते; तसे गंगाधररावाकडे पाहून वाटे. त्या कादंबरीतील इरेका जात व त्या कादंबरीतला इरेका नायक, आपल्या जातीचा पराभव झाला, आपले लोक रानांवनांत ढकलले गेले, व तेथें ते अनेक रोगांस बळीं पडून नष्ट होत आहेत, आपल्या जातीचे कांहीं लोक गोऱ्या लोकांच्या वस्तीत जाऊन जाऊन राहूं लागले, ते अगदी हलक्या प्रकारचीं कामे करून पोट भरीत आहेत, ते निकृष्ट स्थितींत आहेत, त्यांच्या मुलांची इरेक्वा भाषा नष्ट झाली आहे, त्यांनीं जुना इंडियन रीतिरिवाज टाकला, इरेक्वा जातीच्या अनेक बायका उदरपोषणासाठीं गोऱ्या लोकांमध्यें वेश्यावृत्ति आचरूं लागल्या; या अनेक गोष्टीबद्दल संताप व खेद यांनीं व्याप्त झाला आहे असें त्याचें स्वभावचित्र वर्णिले होतें. लीलेला ती कादंबरी फारच आवडली होती, राष्ट्र नष्ट होत असतां

त्या नष्ट होणाऱ्या राष्ट्राबद्दल त्या जातीच्या नायकास जो खेद वाटत असे तो तिलाहि वाटे. जेव्हां गंगाधरराव "पहातो देशाचा शिव शिव अतां नाश नयनीं" असें म्हणत असत तेव्हां तिला त्या कादंबरीच्या नायकाबद्दल जी सहानुभूति वाटे तीच गंगाधररावांबद्दलहि वाटे व गंगाधररावांच्या एकंदर कार्यक्रमाविषयीं तिला कौतुकहि वाटत असे.

रा. कामत यांच्या घरी येणारे दुसरे हिंदुस्थानी विद्यार्थी अनेक होते. त्यांत एक सरजामे म्हणून होता, तो देखील गंगाधररावांसारखाच देशाभिमानी पण त्याच्या आणि गंगाधररावांच्या वृत्तींत फरक होता. मि. कामत यांच्या मनांत सरंजामे हा आपल्या घरीं यावा आणि लीलेचें व त्याचें संघटन वाढलें तर तें चांगलेच होईल असे होतें. कामत यांच्याकडे प्रोफेसर गोगटे हेहि कधी कधीं येत. प्रो. गोगटे यांच्याविषयीं गोविंदरावांनां आदर होता, आणि गोविंदरावांची बरीचशीं मतें गोगटे यांच्या मताप्रमाणें बदलत असत. गोगटयांनां जर असे वाटले कीं, सुशिक्षित आणि पैसे मिळविणाऱ्या हिंदूनी हिंदुस्थानांतच गेले पाहिजे तर त्यांनांहि तसेंच वाटे. जर अमेरिकेंत आलेल्या मंटळींनी अमेरिकेंतच वस्ती करावी असे प्रोफेसर मजकुरांनी म्हणण्यास सुरवात केली तर मि. कामत यांचें तसें मत बने. असो. येथें आटपते घेतले पाहिजे. मि. कामत यांच्याकडे येणाऱ्या जाणाऱ्या सर्व मंडळींसंबंधानें आतांच सांगावयाचे म्हटले तर पुढील अनेक प्रकरणांनां मजकूरच रहावयाचा नाहीं.

---

## प्रकरण २ रें.

## रुक्मिणी.

रुक्मिणी ज्या दुपारी मिस् स्वीटलंडबरोबर मिशन-इस्पितळांत गेली होती त्याप्रसंगीं तिकडे जातांनां आणि बाहेर पडतांना आपणांस कोणी चोरून पहात तर नाहीनां असें तिला वाटत होतें. तिला तसें वाटण्याचें कारण उघडच होते; ब्राह्मणाची मुलगी, नवरा कोठें तरी पळून गेलेला, आणि त्यांत ती रूपाने चांगल्यापैकीं; तिच्यावर अनेक लोकांची अनेक कारणामुळे दृष्टि होती. हिला नवरा नाहीं, आपल्या जाळ्यांत ही आपल्याला ओढतां येईल कीं नाहीं असा विचार गावांतलि कांही उनाड तरुण मंडळी करीत होती, तर कित्येक लोक हिच्या वागणुकींत कांहीं बरें वाईट सांपडण्यासारखे असले तर ते शोधून काढून तिच्या नांवाचा बोभाटा गांवभर करावा अशा प्रकारची होती, कित्येक तिचे हिताचिंतक बनून तिला दूषीत करावी या विचारांत होते. रुक्मिणी गंगाबाईवरून धुणीं वगैरे धुवून परत येत असे तेव्हां, तिच्या पाठीमागून कोणी तरी बोलत जात जावे असा प्रकार प्रथम होऊं लागला. कोणी म्हणावे, तुम्ही नाटकांत येतां कां, पगार चाळीस रुपये मिळेल. आणि सर्व प्रकारची चंगळ होईल. कोणी असें म्हणे कीं, नवरा कांहीं आतां परत येत नाहीं, तो अमेरिकेत आहे, त्याला अमेरिकन बायको मिळाली आहे. आमच्या मित्रांनां तसें पत्र आलें आहे, बायकोची त्याला आठवणहि होत नाही, उगीच वेडयासारखे कां करावे, खाण्यापिण्याचे इतके हाल कशासाठी? इत्यादि गोष्टी बोलत तरुण-मंडळी पाठीमागे चालत असत. गांवांतले एक सावकार म्हणाले कीं, तू मुंबईला चल; तुला मी स्कॉलरशिप देतो आणि तेथे नर्सचे काम शीक. नर्सला पैसे चांगले मिळतात. पण असे सांगणारे सावकार रस्त्यांतच बोलण्याचा प्रयत्न करीत. घरीं जाऊन बोलण्याचे धैर्य करीत नसत. तथापि त्या बोलण्यानें आपण नर्सचें काम शिकण्याला हरकत काय आहे आणि तें काम शिकण्याची सोय वाईंतच होणार नाहीं काय? इत्यादि

विचारहि रुक्मिणीच्या मनांत आले, व तसे विचार तिच्या मनांत येण्याला सांपत्तिक कारणहि होते. तिला असें वाटूं लागलें होतें कीं आपणांस आपल्यॉं पोटापाण्याची सोय स्वत: लावली पाहिजे. गांवांत त्यावेळेस एक पोलीसचे अधिकारी होते, ते तर हिच्या वर्तनांत कोठे दोष आढळेल काय, आणि त्याचा आपणांस बोभाटा करतां येईल काय? आणि तो बोभाटा झाल्यावर आपणांस गांवांत एखादी चोरी झाली तर कांहींतरी निमित्तानें तिच्या घरीं जाऊन घराचा झाडा घेतां येईल काय या विचारांत होते. कां की, जर तिच्या वाईट वर्तनाचा अगोदर बोभाटा झाला तर तिच्याविषयीं लोकांची सहानुभूति कमी होईल, आणि मग आपणांस आपली पोलिशी कारवाई करायला सोपें जाईल, इत्यादि कल्पना त्यांच्या मनांत येत होत्या.

रुक्मिणीनें मिशनइस्पितळांत नोकरी धरल्यामुळें त्या पोलिस अधिकाऱ्यांची बरीचशी निराशा झाली. कां कीं, मिशनच्या रेव्हरंडपाशी, डॉक्टरपाशीं व मिस् स्वीटलंडपाशीं ओळख झालेल्या बाईवर खोटें किटाळ आणणे सोपे नाहीं, एवढेच नव्हे तर अशा संस्थेशीं संबंध असलेली बाई वाईट वागणुकीची असली तरी आपणांस त्याचा फायदा कांही घेतां येणार नाहीं अशी त्याची पक्की खात्री होती. तिच्यावर डोळा ठेवणारी परतु आतां आपले हेतू जागच्या जागी जिरले म्हणून खंत करणारी मंडळी अगदीं स्वस्थ बसली असें मात्र नाहीं. ती आपल्या विषयवासनातृप्तीच्या बाबतीत झालेल्या निराशेचा सूड अन्य तऱ्हेने निंदा करून घेत होती. रुक्मिणी जेव्हां मिस् स्वीटलंड हिच्या दवाखान्यांत अर्धेमुर्धे कंपाउंडरचे, अर्धेमुर्धे आयाचें आणि अर्धेमुर्धे नर्सचें असें काम करूं लागली तेव्हां ती लवकरच खिस्ताच्या कळपांत शिरणार आहे असा बोभाटा ती मंडळी करीत होती.

रुक्मिणीचा नवरा गंगाधर यास इंटरच्या परीक्षेला बसण्याची मनाई झाल्यानंतर त्यास आपण कोठें तरी जावें असें वाटलें, आणि त्यानें अमेरिकेस प्रयाण केलें. रुक्मिणीचें सासर इंदूरला होते, आणि तेथेंच तिचा नवरा शिकत होता. त्यावेळेस इंदूरचे महाराज सवाई तुकोजीराव हे अल्पवयी होते, आणि कारभार सर्व रीजन्सीच्या हातीं होता. त्यावेळेस इंदूरची राज्यव्यवस्था कशी होती, पैसेखाऊ लोकांचे प्राबल्य कसें झालें होते, आणि राजवाडा कसा जळाला, आणि कां जळाला या सर्व गोष्टी आज उकरून न काढलेल्या बऱ्या. त्यावेळेस कांही तरुण उत्साही मंडळी, हे राज्य रीजन्सीच्या तावडींतून सोडविले पाहिजे, लोकांत स्वदेशाभिमान जागृत केला पाहिजे, नानकचंद हा बदमाष मनुष्य आहे तर त्याला लंबा केला पाहिजे, तो संस्थानांतील कुटुंबांची नीति खराब करीत आहे, लोकांच्या बायका बिघडवून त्यांना नोकऱ्या देतो, त्यानें महाराष्ट्रीय माणसे काढून टाकलीं आहेत, यानेंच शिवाजीराव महाराजांशीं हरामखोरी केली, अशा कल्पनांची होती. याच काळांत, शिवाजीची आठवण करणें, त्याच्यासंबंधीं पदें गाणें, त्याचा उत्सव करणें या गोष्टी अध्यामुर्ध्या राजद्रोही ठरल्या होत्या, त्या सरकारने कठोरता वापरून बंद करण्याजोग्या आहेत, नाहीतर देशांत राजद्रोह पसरेल आणि ब्रिटिश राज्य जाईल अशा कल्पना इंग्रजी मुलखांतहि पसरल्या होत्या. महाराष्ट्रीय देशाभिमानास बद्द ठरवून महाराष्ट्रीयांस इंग्रज अधिकाऱ्यांमध्ये अप्रिय करणे यावेळेस अगदी सोपें झालें होतें. आणि त्याचा फायदा इंदूर येथील हिंदी पक्षाच्या मुत्सद्यांनीं घेतला. दक्षिणी मंडळीचे जे जे स्वाभाविक उत्सव त्यांत राजद्रोह आहे, आणि त्यांशीं संबद्ध दक्षिणी मंडळी तर पक्की राजद्रोही आहे, फार कशाला, दक्षिणी म्हणजे इंग्रजद्रोही, म्हणजे राजद्रोही आहे अशा

कल्पना तेथील इंग्रज अधिकाऱ्यांच्या मनांत भरवून बरीचशी दाक्षिणी मंडळी राज्यांतून घालवून देण्यांचा प्रयत्न कसा केला, याचाहि वृत्तांत त्यावेळचे विदेशीं गेलेले तरुण मोठ्या त्वेषानें किंवा खेदाने सांगत असत. गंगाधर हा एक असाच देशाभिमानी तरुण होता. तो घरचा अगदीं गरीब पण त्यास कॉलेजचें शिक्षण घ्यायला थोडेसे सामर्थ्य होतें; बापाला तीस पसतीस रुपये पगार होता, आणि बाप कसें तरी करून मुलाला कॉलेजांत पाठवी. तथापि बापाला ते सर्व जडच जात होते. त्यावेळेस कांही तरी "राजद्रोही" म्हणजे देशाभिमानी खेळामुळें, म्हणजे स्वाभाविक महाराष्ट्रीय करमणुकीच्या खेळामुळे, म्हणजे शिवाजीउत्सवांत गाणीबिणी म्हटल्याच्या आरोपावरून त्याला कॉलेजमधून काढण्यांत आलें आणि त्याला पासपोर्टहि देण्याचे ए. जी. जी. नें नाकारले व तो अमेरिकेत [illegible]च गेला. त्याने जातांना आपल्या बायकोचे दागिने घेतले, ते विकले आणि अमेरिकेस जाण्यासाठी पैसे उभे केले.

रुक्मिणीनें नवऱ्याच्या पलायनास मदत केली, ती भीतीमुळें, किंवा नवऱ्याच्या मनांत असलेल्या कल्पनांशीं सहानुभूति असल्यामुळे मदत केली हें नक्की सांगतां येत नाहीं. नवरा कां जात आहे याची तिला स्पष्ट कल्पना नसावी. विलायतेला किंवा अमेरिकेला गेलेली मंडळी मोठ्या पदाला पोंचतात, व त्यांच्या बायका नेहेमीं नवऱ्यांच्या विलायतच्या अनुभवाच्या गोष्टी सांगतात व जमलेल्या बायकांत प्रतिष्ठा मिळवितात एवढें मात्र तीस ठाऊक होतें. रुक्मिणीचे व तिच्या नवऱ्याचे संबंध पूर्णपणें प्रेमाचे होते असें म्हणतां येणार नाहीं; अगोदरच आईबापांनीं फसविलें म्हणून तिच्यावर सासरच्या मंडळीचा आरोप, आणि त्यांचा त्याबद्दल राग असतां मुलानें तिला रागानें वागविलें पाहिजे तिच्यावर भाळून जातां कामा नये, जो बायकोच्या हातांत जातो तो नवरा घरभेदी आहे, अशा प्रकारची त्याच्या घरची शिकवण. नवऱ्यानें नेहेमी कृत्रिम तरी रागावलेली मुद्रा दाखविली पाहिजे. ती दाखविली म्हणजे तो राग काढून टाकण्यासाठीं सासरा आणखी कांहीं तरी देईल अशी नवऱ्याच्या घरची समजूत. सासऱ्यापाशीं कांहीं नसले तरी त्याने कर्ज काढून दिलें पाहिजे. कां कीं, ते रीतीचेच आहे; जर नवरा बायकोशीं हंसू खेळूं लागला तर मुलगी डोक्यावर बसेल, म्हणजे मुलगी काळजींत राहणार नाहीं आणि जांवयास आणखी कांहीं देण्याची काळजी सासऱ्यास पडणार नाहीं. या भावनेनें गंगाधररावास वारंवार पत्नीशिक्षणाची शिकवण मिळे. करार करणारे पक्ष दोन सासरे आहेत अशा प्रसंगी नवऱ्यामुलाचें कर्तव्य हेंच की, बाप जे करार करील ते पाळले जाण्यासाठीं बाप जी परिस्थिति उत्पन्न करूं इच्छील तिला मदत करणे. या प्रकारची जी नैतिक कल्पना परभणीकरांच्या कौटुंबिक व्यवहारामध्ये वागत होती तीमुळे गंगाधरपंत पहिल्यापासून आपल्या बायकोस रागाची मुद्रा दाखवीत, कपाळास आंठ्या चढवीत इत्यादि बायकोस असमाधान उत्पन्न करणाऱ्या अनेक गोष्टी करीत. बापाच्या पुरेसे पैसे न देण्याच्या चुकीमुळे आपल्याला त्याच्या मुलीला म्हणजे आपल्या बायकोला कठोरपणाने वागवावें लागतें आणि हा अन्याय आहे असे पुष्कळदां त्याच्या मनास बोचतहि असे. तथापि त्या बोचण्याची बाधा फार दिवस झाली नाहीं. आपल्या कठोर वर्तनाचें आपल्याच मनानें समर्थन व्हावयास बायकोच्या चुका किंवा दुर्गुण हे नजरेस पडावयास पाहिजे होते. व ते पडल्याशिवाय राहिले नाहींत. कधीं तेल सांडलें, कधीं पीठ सांडलें, कधीं रात्रीं दिवा मालविल्याशिवाय रुक्मिणी झोंपी गेली असले दुर्गुण नवऱ्याच्या दृष्टीस आणण्यास घरांतल्या इतर मंडळीने कमी केलें नाही.

नवऱ्यास प्रथमतः आपण आणि आपली बायको सासऱ्यापासून पैसे काढण्यासाठीं झालेल्या गुप्त कटास बळी पडलेल्या व्यक्ती आहोत याची कल्पना आली नाहीं. त्यास पुष्कळदां असे वाटे की आपण आपल्या बायकोस जी क्षुद्रता दाखवीत आहो ती आपण स्वेच्छेनेंच दाखवीत आहो, आणि आपण जो रुसलेल्या अगर रागावलेल्या मुद्रेचा देखावा आपल्या बायकोस दाखवीत आहो तो केवळ बापाच्या मसलतीत आपण आहों म्हणून दाखवीत आहों अशांतला भाग नसून आपल्या बायकोच्या दोषामुळेंच दाखवीत आहों. अशी तो आपल्या मनाची समजूत करून घेई. पण मधून मधून आपण अन्याय करीत आहों याची जाणीव डोकावेच.

रुक्मिणीची नवऱ्याविषयीं काय भावना होती बरे? ती निरनिराळ्या वेळीं निरनिराळी होती. लहान मुलीला आपले लग्न झाले म्हणजे आनंद होतो तसा तिलाहि झाला. पुढे आपला नवरा लग्नांतल्या कांहीं भानगडीमुळें आपल्यावर रुसला आहे व आपल्याकडे पाहून कपाळाला आंठ्या घालतो, आपण कांहीं नवऱ्याला पसंत नाहीं याबद्दल तिला वाईट वाटे. आपण पसंत की नापसत हें नवऱ्याला जशी शिकवण मिळेल त्यावर ठरतें, आणि ही शिकवण आपल्या बापापासून पैसे जसे मिळतील त्यावर अवलंबून असते इतका दूरान्वय लहान मुलीच्या लक्षांत कोठून येणार! आपण नापसत असणे हे नशीब, ग्रह, रूप, किंवा आपलेच दुर्गुण यांवर किंवा आपण चांगल्या किंवा वाईट शकुनाची असणे यावर अवलंबून असते अशीच तिची समजूत झालेली; व आपल्याच कांही तरी कमीपणामुळें आपण नवऱ्याच्या रागास कारण होतों असे तिला वाटे. त्यांतल्या त्यांत आपणास चांगले वागविण्यासंबंधी अटी आपले सासरे काय घालतात हे सासरेहि तिच्यापाशीं बोलत नसत. कां कीं, तिचे दोष वारंवार काढण्यांत येत ते खरे आहेत असेंच दाखविण्याची त्यांची इच्छा असे. सासऱ्याप्रमाणेंच तिचे आईबापहि मुग्ध असत; कां कीं, तिच्या आईबापांच्या मनास असे वारंवार खाई कीं आपल्या मुलीस चांगली वागणूक न मिळाल्यास आपलाच दोष आहे. आपलेंच दारिद्र्य हें त्याचें खरें कारण आहे. आपल्या वरील अवकृपेचे खरे कारण तीस ठाऊक न झाल्यामुळें आपल्या हातून होणाऱ्या चुकांसच ती दोष देऊं लागली. व आपल्याच अंगीं इतके दुर्गुण कां असावेत याचीच तिला कल्पना होईना.

सुनेसंबंधाने नवऱ्याचे वाईट मत व्हावें यासाठीं जशी खटपट असे तशीच खटपट सुनेची आणि मुलाची ओळख होऊं नये याबद्दल असे. नवरा आणि बायको यांची मुलीच्या रजोदर्शनानंतर पद्धतशीर ओळख होण्यापूर्वी दोघांनां एकमेकांशीं बोलूं द्यावयाचें नाहीं हें तर रीतीचेंच होते. पण रजोदर्शनानतर देखील दोन तीन वर्षें गर्भाधान लांबविण्यांत आले. आणि पुरुषांनी ओटीवर बसावयाचे व जेवण्यापुरतेच माजघरांत जायचे, आणि बायकांनीं स्वैपाघरांत बसावयाचे आणि वाढण्यापुरतें माजघरांत जावयाचें हा नियम नवराबायकोसंबंधाने अधिक जोरानें अमलांत येऊ लागला, व शिवाय नवरा व बायको यांची रजोदर्शन आणि गर्भाधान याच्या मधल्या काळांत दृष्टादृष्ट झाली तर ती गोष्ट मोठी अशुभ होय. कोणी म्हणे असे झाले म्हणजे मुलीस वैधव्य येते, कोणी म्हणें कीं, त्याने गोहत्येचे पाप लागतें, म्हणजे ही गोष्ट पापमय तर आहेच पण अनिष्ट परिणाम उत्पन्न करणारी आहे. येणेंप्रमाणें घरांतल्याघरांत नवराबायकोची ताटातूट ठेवावयाचीच पण गर्भाधानहि लांबणीवर टाकावयाचें. पहिलें वर्ष मुलगी अगदीं लहान आहे म्हणून टळलें; वर्ष संपल्यावर पुढे शुक्रास्त झाला, त्याच्या पुढें दुसरे कांहींतरी कारण झालें. या मधल्या

काळांत मुलीच्या बापास जीं पत्रें गेलीं होतीं त्यांत लग्नांत जें देऊं केले ते पुरे झाले नाही, लग्नानतरच्या "दिवाळसणाची" देणगी मिळाली नाहीं. तर ती देणगी आल्यानतर पुढे गर्भाधानाचा विचार होईल. मागच्या दिवाळसणाचे देण्याची ऐपत आपणांस नाही तर आपण गर्भाधानाच्या वेळची देणगी तरी काय देणार इत्यादि गोष्टीची पत्रांत चर्चा सुरू होऊं लागली. पूर्वीचे घेणें पूर्णपणें वसूल झाल्याशिवाय मुलीचे गर्भाधान होऊं द्यावयाचे नाही, हा निश्चय तिच्या बापास कळविण्यांत आला.

गंगाधररावाची आपल्या बापावर श्रद्धा फार दिवस राहिली नाहीं. घराची इभ्रत राखणे, मुलाने बापाच्यासमोर ब्र न काढणे इत्यादि सद्‌गुणांचें जे महत्त्व त्याच्या मनावर ठसविले होते त्यांविषयी त्यास सशय येऊं लागला. हुंडयाची जी रकम घेतली तीवर बापाचा हक्क कितपत आहे, वगैरे गोष्टीचा विचार तो करूं लागला व आसपासच्या घरच्या कर्मकथा त्यास जसजशा ऐकूं येऊं लागल्या तसतसा त्यास वडील मंडळीसंबंधाने बराच संशय येऊं लागला. त्यास पुष्कळ ठिकाणीं असे दिसूं लागले की, वडील मडळीच्या अपेक्षा अनेक प्रसंगीं स्वार्थमूलक असतात, तो स्वार्थ साधण्यासाठीं ते पितृभक्ति, घराण्याची इभ्रत, अशा गोष्टींची चर्चा करतात, आणि आपण पुष्कळ बाबतींत फसलों आहो. गंगाधरपंत ज्या कॉलेजांत होते त्या कॉलेजांतील एका विद्यार्थ्याला फेलोशिप मिळाली तेव्हां त्या फेलोशिपचे, खाणावळ वजा जातां सर्व पैसे घरांत यावे म्हणून त्याच्या बापानें त्यास आपणांस कशी अडचण आहे, दीडशें रुपये अमुक तारखेस साऱ्यासाठीं भरावयाचे आहेत पण पैसे नाहींत इत्यादि मजकुराचीं पत्रे लिहिण्यास सुरवात केली, आणि पुढे मुलाबापांचे भांडण कसें झालें इत्यादि गोष्टी समजूं लागल्यावर त्यास बापाचें करण सर्वथा मुलाच्या कल्याणासाठी नसून कांही अंशीं केवळ स्वार्थाचे असतें ही गोष्ट समजू लागली.

रुक्मिणीचे गर्भाधान शास्त्रदृष्टया कधींच झालें नाहीं गंगाधरपंताने एकदां गर्भाधान आटपून घ्यावें असा आग्रह धरला. त्यामुळें गंगाधरपंतांस 'आजकाल मुलें फाजील झाली' म्हणून जरी शिव्या मिळाल्या तरी मुलीला नवऱ्याकडे पाठविण्यांत येऊं लागले व दोघांमध्यें थोडथोडया परस्पर प्रेमाच्या व विश्वासाच्या शब्दांची अदलाबदल झाली असावी. या बाबतींत गंगाधरपंतांच्या बापानें दौर्बल्य दाखविलें त्याचें कटु फळ त्यास मिळालें. कां कीं, गंगाधरपंताच्या पलायनाच्या गुप्त योजनेस या नवराबायकोच्या ओळखीमुळें चालना मिळाली, गगाधर गेला, तेव्हां न्यूयॉर्कहून त्याच्या बापाला पोंचल्याचे पत्र आले होते तेवढेच. त्यानंतर कांहींएक पत्र आले नाही. व बायकोला त्याने मुळीं पत्र लिहिलेच नाही. नवरा पळाला तो कांही दिवस मुंबईला गेला आणि मुंबईहून ज्या बोटीने जाणार होता ती बोट जाईपर्यंत त्याच्या बायकोने त्याच्या योजिलेल्या पलायनाची बातमी अगदीं गुप्त ठेवली होती. नवऱ्याच्या पळून जाण्याच्या बेतांत बायको सामील आहे हें सासऱ्यास समजतांच सासऱ्याला राग आला. त्यांत तिने आपले दागिने नवऱ्यास घेऊं दिले याबद्दल राग विशेषच आला. दागिने केले ते कर्ज काढून केले होते, आणि जर कर्जाची रकम मागावयास सावकार आलाच तर वेळेवर रकम दागिने मोडून परत करूं अशी सासऱ्यास धमक होती. अर्थात या सर्व गोष्टी सुनेस ठाऊक नव्हत्या. कां कीं, लग्न जुळविते वेळेस जेव्हां ८०० रु. हुंडा घेतला त्यावेळेस २००० रुपयांचे दागिने सुनेच्या अंगावर घालण्याची भाषा झाली होती, सासऱ्यास सुनेचा इतका राग आला कीं, सासऱ्यानें तिला माहेरीं पाठविलें.

रुक्मिणी माहेरीं आली पण लग्न झालेल्या दिवसापासून तिच्या माहेरच्या स्थितींत बरेच अंतर पडले होते. तिचा बाप वारला होता. तिच्या बापाला जें कांहीं तिच्या लग्नामुळें कर्ज झालें होतें तें वारण्याकडे विम्याचे पैसे जाऊन तिच्या आईलाच आतां पुढे काय करावें याची भ्रांति पडली. एका दृष्टीने मुलीला सासऱ्यानें पाठविलें हे आईस बरेच वाटले.

रुक्मिणीचे माहेर वांईला होते. आई आणि मुलगी आतां एकत्र राहू लागली. कांहीं दिवसांनी घरांतले पैसे सपून जाण्याची वेळ आली. आतां काय करावें या विवंचनेंत मायलेकी असतांना सुदैवाने डॉ. स्वीटलंड हिची व त्यांची ओळख झाली. डॉ. स्वीटलंड ही अमेरिकन बाई असून वांईच्या अमेरिकन इस्पितळाशी संबद्ध होती. तिला असें कळलें कीं, रुक्मिणीचा नवरा अमेरिकेला गेलेला आहे. मिस् स्वीटलंडला स्वाभाविकपणे तिजबद्दल सहानुभूति उत्पन्न झाली व तिनें आपल्या दवाखान्यांत तिला एक जागा देऊ केली आणि ती रुक्मिणीने पत्करली.

गंगागधरपंत अमेरिकेला १९१० सालांत गेला. व १९११ सालीं रुक्मिणीची माहेरास रवानगी झाली. १९११ सालापासून १९सालापर्यंत रुक्मिणी केवळ नर्सचें काम वगैरे शिकत होती अशा प्रसंगीं एक विशेष गोष्ट घडली आणि त्यामुळे मिस् स्वीटलंडची आणि तिची विशेष मैत्री जडली. त्या सालांत जीं पत्रें अमेरिकेतून येत असत तीं सर्व सेन्सार उघडीत असे आणि याच सुमारास एक पत्र रुक्मिणीस आले आणि तेहि उघडलें गेलें, एवढेंच नव्हें तर तिला वांईच्या मामलेदाराकडून पत्र आले कीं, अमुक तारखेस साताराचे कलेक्टरसाहेब वांईस येणार आहेत तर त्यांस त्या तारखेस सकाळीं ८ वाजतां येऊन भेटण्यास हुकूम करण्यांत येत आहे. इतक्या मोठ्या सरकारी अधिकाऱ्यानें आपणांस भेटावयास बोलावले आहे म्हणून रुक्मिणी अधिकच घाबरली आणि आपणांस भेटावयास बोलावण्याचें काय कारण आहे, बायको मनुष्याने भेटावयास यावें असा कलेक्टरचा आग्रह कां इत्यादि गोष्टींवर तिचें आणि मिस् स्वीटलंडचें संभाषण झालें. आणि त्याबरोबर आपलें नवऱ्याकडून आलेलें पत्र सेन्सारनें उघडलें हेंहि तिनें मिस् स्वीटलंडला सांगितले. मिस् स्वीटलंडनें नवऱ्याचे पत्र दाखविण्यास तुझी कांहीं हरकत आहे काय असें रुक्मिणीस विचारतांच ते मिस् स्वीटलंडला तिनें दाखविलें. त्या पत्रांत गंगाधरपंतांनीं पुढील मजकूर लिहिला होता.

" मी हिंदुस्थानांत येणार होतों, पण आतां येतां येणे शक्य नाही; माझा एक मित्र लाहोर येथे फांशीं गेला. मला आतां ब्रिटिश राज्य आहे तेथें येणे धोक्याचें आहे हे तूं समज. तुला शक्य झालें तर तूंच अमेरिकेस निघून ये, आणि सानफ्रान्सिस्को येथील अमेरिकन एक्स्प्रेस कंपनीच्या ऑफीसांत माझ्यासंबंधाने चौकशी कर, म्हणजे माझी भेट होईल. मी अमेरिकेस जाण्यापूर्वी तुझे दागिने घेतले होते ते दागिने स्त्रीधन आहे, आणि त्यांवर माझा हक्क नाहीं. व त्यासाठीं त्या दागिन्यांची किंमत मीं तुजकडून उसनी घेतली आहे असे समजतो. एक्स्प्रेस कंपनीच्या मुंबईच्या एजंटाकडून तुला त्या दागिन्यांच्या किंमतीपैकी १००० रुपये परत मिळतील, आणि उरलेले हजार रुपये सवडीप्रमाणे पाठवीन. मी खुशाल आहे यापलीकडे कांहीं एक लिहितां येत नाही."

मिस् स्वीटलंडनें तिला सर्व गोष्टी स्पष्ट करून सांगितल्या. हिंदुस्थानांतून ब्रिटिशराज्य घालवून देण्यासाठीं अमेरिकेंत कांहीं बंडाचा कट झाला होता. तो कट उघडकीस येऊन त्या कटांतील कांहीं माणसें हिंदुस्थानांत येऊन सरकारकडून पकडलीं जाऊन फांसावर लटकलीं. बंड कांहीं झालेंच नाहीं पण तुझा नवरा त्या बंडांत सामील

झाला असला पाहिजे आणि त्यामुळें त्याला हिंदुस्थानांत येण्याचें धोक्याचे झालें आहे. साताऱ्च्या कलेक्टरने तुला यासाठींच बोलावले आहे.

"मग कलेक्टरसाहेब मला काय विचारतील ?" रुक्मिणीने विचारले.

"नवऱ्याचीं आणखीं कांहीं पत्रे तुला आली आहेत काय म्हणून विचारतील."

"मला ते गेल्यापासून पत्र आले ते एवढेच. पण आलेलीं सर्व पत्रें दाखवावीं लागतील काय ?"

"नवऱ्याचीं बायकोला आलेलीं सर्व पत्रें सरकारने पहावयाचीं हे विलक्षणच होईल, पण त्याबरोबर तीं पाहूं नयेत असेंहि करून चालणार नाहीं."

"तर मग मीं काय करावयाचे ?"

"तूं काय करावयाचे हे मी पूर्णपणें सांगूं शकणार नाहीं. परंतु येतील तीं पत्रें दाखवावीं लागतील, आणि तूं जीं पत्रें पाठविशील त्यांवरहि कांहीं अडचण उत्पन्न होईल, तूं यासंबंधानें कोणा तरी वकिलाचा सल्ला घे, पण अगोदर कलेक्टरकडे जाऊन तर ये."

"तुम्हीं माझ्याबरोबर याल काय ?"

"कलेक्टरची हरकत नसेल तर येईन— पाहिजे तर मी बरोबर आलें तर चालेल किंवा नाहीं म्हणून कलेक्टरसाहेबांनां विचारीन."

संभाषणाप्रमाणे मिस् स्वीटलंड यांनीं कलेक्टरला विचारले व कलेक्टर साहेबांचें 'तुम्हीं मिसेस रुक्मिणी परभणीकर या मला ज्या वेळेस भेटावयास येतील तेव्हां बरोबर असण्यास हरकत नाहीं' असे पत्र आलें. रुक्मिणी जेव्हां भेटावयाला गेली तेव्हां 'नवऱ्याकडून आतांपर्यंत आलेलें पत्र एवढेंच. गेल्यापासून गंगाधरपंतांनीं पत्र लिहिलें नाहीं किंवा पैसे पाठविले नाहीत. गंगाधरपंत गेले तेव्हां ते इंजनेरचें शिक्षण घेण्यासाठीं गेले. जाण्यासाठीं पैसा माझे दागिने विकून उभा केला, मला ते कांहीं कटांत असल्याचें माहींत नाहीं. मला एकच पत्र आलें ते दाखविलेंच आहे. त्यांत मला ब्रिटिश मुलखांत येण्यांत धोका आहे एवढेंच लिहिलें आहे. जरी गंगाधरपंतांचें ब्रिटिश राजसत्तेविरुद्ध कटांत अंग असलें तरी माझे अंग मुळींच नाहीं. राजसत्तेविरुद्ध कट म्हणजे काय हे मला समजत नाही. मी वर्तमानपत्रे फारशीं वाचीत नाही. अमेरिकेहून परत आलेली कोणी मडळी मला भेटली नाहीत, किंवा त्यांनी नवऱ्याचा निरोप कळविला नाहीं. माझ्या मनांत अमेरिकेस नवऱ्याकडे जावें असेच आहे, पण आई एकटी आहे आणि मला एकटीला इतका दूरचा प्रवास करण्याचें धैर्य होत नाहीं. ज्याअर्थी नवरा परतच येणार नाहीं त्या अर्थी मी गेलेच पाहिजे व जायचे तर जितकें लवकर जाता येईल तितकें चांगलें. मला जावें असें वाटतें पण थोडे इंग्रजी शिकणे झाल्यानतर जावें असें वाटतें. मिशनमधल्या कोणी मेमसाहेब किंवा मिसीसाहेब अमेरिकेस जाणार असतील तर त्यांच्याबरोबर जाईन.' असें तिने सांगितलें. कलेक्टरनें सांगितले कीं, ज्याअर्थी तुमचा नवरा कटांत आहे त्याअर्थी तुम्ही जरी आज कटांत नाहीं तरी तुमच्या वर्तनावर व तुमच्याकडे जातो येतो कोण यावर आम्हांस नजर ठेवली पाहिजे. आम्हांस हें पाहिजे आहे कीं, तुम्ही येथे ब्रिटिश राजसत्तेविरुद्ध जो कट होत आहे त्याच्या गुंतागुंतींत सांपडूं नये. तुमच्याकडे येणाऱ्या पत्रांवर आम्हांस नजर ठेवतां येईल पण तुमच्याकडून जाणाऱ्या पत्रांवर कांहीं नजर ठेवतां येणार नाहीं. पण मी तुम्हांस असे सांगून ठेवतो कीं, तुम्हीं आपल्या स्वतःसंबंधानें किंवा तुमच्या सासरच्या आणि माहेरच्या माणसांसंबंधानें कायतो मजकूर पत्रांत लिहा; जास्त लिहूं नका, आणि जर तुम्ही तसा लिहिला तर तुमच्यावर सरकारचा राग होईल. व त्याचे वाईट परिणाम तुम्हांस भोगावे लागतील.

रुक्मिणीचा नवरा अमेरिकेंत आहे एवढ्याच गोष्टीमुळें मिस् स्वीटलंडच्या मनात रुक्मिणी-विषयी थोडेसें कौतुक व नंतर सहानुभूति उत्पन्न झाली, ती पुढें रुक्मिणी स्वत: अमेरिकेला जाणार आहे हें समजल्यानंतर अधिकच वृद्धिंगत झाली. हिंदुस्थानांतल्या वरच्या जातींतल्या स्त्रियांनां अमेरिकेंतील मजूरवर्गातल्या स्त्रियांपेक्षांहि हलक्या प्रतीचें शिक्षण असतें, आणि त्यामुळे जर ही बाई अमेरिकेस गेली तर तिची स्थिति चांगली राहणार नाहीं, तिच्या नवऱ्याने तिला तिकडे टाकून दिलें, किंवा नवरा मृत्यु पावला तर तिचे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं, इत्यादि विचार मिस् स्वीटलंडच्या मनांत आले. आणि जोंपर्यंत ही अमेरिकेला जाण्यास निघाली नाहीं तोपर्यंत हिला आपण बरेंचसें शिकवून तरबेज करावी असें वाटूं लागले. शिवाय तिला असेहि वाटलें कीं, ही मुलगी तिकडे गेली म्हणजे हिच्या नवऱ्याला अशिक्षणामुळे आपली बायको कोणालाहि दिसूं देऊं नये असे वाटेल, नवऱ्याच्या आयुष्यक्रमांत बायको भागीदार होणार नाहीं. आणि अशा प्रसंगीं नवरा हिला टाकून दुसऱ्याच एखाद्या बाईपाशी रहाण्याचा संभव आहे, या प्रकारच्या कल्पना देखील तिच्या मनांत आल्याशिवाय राहिल्या नाहींत. रुक्मिणीला जगांतील एकंदर चढाओढीची कल्पना तरी कशी येणार? अमेरिकेंत प्रत्येक व्यक्तीला काम कसे करावे लागतें, एखादा मनुष्य अगर बाई काम करण्यांत जरा कमी योग्यतेची असली म्हणजे तिला नालायक ठरवून ती जागा आपल्याला पटकाविण्यासाठीं इतर व्यक्ती कशा टपून असतात, आणि हिंदुस्थानांत उलट एखाद्या ब्राह्मणस्त्रीस कामाला लावण्यासाठीं काम देणाऱ्यालाच खटपट करावी लागते हा फरक तिच्या मनावर कसा ठसणार, आणि खऱ्या चढाओढीच्या जगांत प्रवेश होण्यास तिच्या अंगीं लायखी कशी उत्पन्न होणार, या सर्व गोष्टी तिच्या मनांत येत. रुक्मिणीस स्वतःचें पोट भरण्याचा प्रसंग आला तर तिचे कसे होईल याची कल्पनाहि मिस् स्वीटलंडला भीतिप्रद वाटे. पण त्या सर्व गोष्टींचे चित्र रुक्मिणीपुढे काढावें किंवा काढूं नये यासंबंधाने देखील तिचा अनिश्चय होता. भावी अडचणी चांगल्या तऱ्हेनें समजल्या नाहींत तर त्या अडचणीस तोंड देण्याची तयारी जी करावी लागावयाची ती कशी होणार? उलटपक्षीं अडचणीचें म्हणजे अमेरिकेंतील स्पर्धेचें जें भेसूर चित्र आहे ते काढले तर ती घाबरून तर जाणार नाहीना असे मिस् स्वीटलंडला वाटे. पण तिने शेवटी रुक्मिणीपुढें ते चित्र रेखाटलेंच, तथापि रुक्मिणी पुढे अमेरिकेची नागरिक होणार म्हणजे ती खरोखर आपल्यांतलीच होणार तर तिला आपण चांगलें तयार करावे या निश्चयानें मिस् स्वीटलड रुक्मिणीचे शिक्षण विशेष काळजीपूर्वक आणि उत्साहाने करू लागली.

रुक्मिणी आणि मिस् स्वीटलंड यांची अनेकदां संभाषणे होत. त्या संभाषणांमुळे रुक्मिणीस जगाची एकंदर अधिकाधिक कल्पना येई. अशा प्रकारच्या अनेक संभाषणांपैकी एक संभाषण घरगुती कामावरून सुरू झालें.

"तुमच्या देशांत बायका सैपाक करतात कीं नाहींत कीं सगळे गोरे लोक आणि त्यांच्या बायका हॉटेलांतून वगैरे जेवतात." रुक्मिणीनें विचारिलें.

"प्रत्येक स्त्रीला घरांतला स्वैपाक करावा लागतो, आणि दुसरेंहि काम पुष्कळ करावें लागतें. ज्या स्त्रियांचे लग्न झालें नसेल आणि ज्या कोठे तरी नोकरी करीत असतात त्याच फक्त खाणावळीत जेवतात." मिस् स्वीटलंड उद्गारली.

"तुमच्या देशांत गवंडी—सुताराच्या कामासारखीं हलकीं कामें कोण करतात, गोरे साहेब करतात काय?"

"गवंड्याचें काम किंवा सुताराचें काम हलकें कोणी समजत नाही. गवडी व सुतार यांचीं कामें नीट शिकावीं लागतात आणि या धंद्यांत प्राप्तीहि पुष्कळच असते, आणि ज्यांनां या कामाचे शिक्षण मिळालेलें असतें तेच लोक हीं कामें करतात."

"झाडलोट कोण करतात, बूट साफ कोण करतात?"

"झाडलोट बायकाच करतात. बूट साफ करण्याचा धंदा जो पत्करील तोच तें काम करतो, घरोघर बूट साफ करण्याचे काम बायकाच करतात."

"तुमच्यासारख्या चांगल्या बायका बूट साफ करतात?"

"आम्ही साफ करणार नाहीं तर दुसरें कोण करणार आहे! बायकांनीं लक्ष दिलें नाहीं तर पुरुष पोषाखाच्या बाबतींत दुर्लक्ष करतात. त्यामुळें बूट पुसण्याचे काम बायकांवरच पडते."

दुसऱ्या एका प्रसंगीं त्यांचें धर्मावर बोलणें झालें. त्यावेळेस रुक्मिणीनें विचारले कीं, "मिशनचे पुरुष आणि स्त्रिया हिंदुस्थानसारख्या दूरच्या देशांत येतात त्या कशासाठीं. आमच्या देशांतील लोकांनां खिस्ती करून तुम्हाला काय मिळणार आहे?"

"लोकांवर उपकार करावा, दुसऱ्याचे दुःख निवारण करावें असे आमच्या धर्मसंस्थापकाने सांगितलें आहे, आणि हा दयेचा आणि एकमेकांवर प्रीति करण्याचा सदेश आम्हाला जितक्या ठिकाणीं पसरवेल तितका पसरवावयाचा आहे. असे केल्यानें आपला उद्धार होतो असें आम्ही समजतों."

"केवळ दुःखनिवारण करण्यासाठीं इतक्या दूर येतां! तुमच्या देशांत निवारण करण्यासारखीं दुःखें नाहींत काय?"

"दुःखनिवारण करण्याचें काम आमच्या देशांत चालूच आहे. पण आमच्या देशांतलें दुःखनिवारण केलें म्हणजे आमचें कर्तव्य संपलें असें आम्ही समजत नाहीं."

"मग एखादा मनुष्य खिस्ती झाला म्हणजे तो काय खिस्ताच्या म्हणण्याप्रमाणे दया आणि दुःखनिवारण यांकडे लक्ष देऊं लागला असे समजावयाचे. जगांत खिस्ती लोक तर पुष्कळ आहेत. इतक्या सगळ्या लोकाचे दुःखनिवारण करण्यास खिस्ती लोक तयार आहेत काय?"

"जगांत खिस्ती म्हणवित.त तितके सगळे लोक खिस्ती असते तर जगांत वाईटपणा फारच थोडा उरला असता. खिस्ती म्हणविणारांमध्यें खरे खिस्ती फारच थोडे आहेत?"

"तर मग खिस्ती म्हणविणारे लोक वाढविण्यासाठीं इतका प्रयत्न कां?"

"असला प्रयत्न करण्याचे कारण एवढेच कीं, जो आपणास खिस्ती म्हणवितो तो आपल्या अंगीं खिस्ती गुण येण्यासाठीं आज ना उद्यां खटपट करील. नांवाच्या अभिमानाने नांवाप्रमाणें कृति थोडीबहुत करण्याची प्रवृत्ति होते. एवढयासाठीं नामधारी खिस्ती वाढविण्याची आमच्या लोकांची खटपट! एखादा महार खानसामा उद्यां खिस्ती झाला म्हणजे तो उद्यां दुधासाखरेची चोरी करणार नाही असे नाहीं. एखाद्या खिस्त्याने वाईट गोष्ट केली तरी पण तूं खिस्ती आहेस, तुला अमुक करणें योग्य नाहीं असे म्हणावयास सांपडते."

"ब्राह्मणास आपण ब्राह्मण आहो या भावनेने देखील फायदाच होतो त्याचें वर्तन ब्राह्मणासारखे नसले तर त्यास इतर लोक देखील तूं ब्राह्मण असून असें वाईट काम केलेंस असें बोलतील. तर तुम्ही आमच्या जातिभेदास वाईट कां म्हणतां!"

"प्रत्येक मनुष्यास ब्राह्मण होतां येत नाहीं म्हणून."

"प्रत्येक मनुष्यानें ब्राह्मण व्हायचें मग शूद्र कर्म कोणी करावयाचें?"

"आज सर्व ब्राह्मण ब्राह्मणांचे धंदे करीत आहेत काय? ब्राह्मणाचे कर्म करणारे ब्राह्मण आज फारच थोडे असतील. वकील ब्राह्मण, शिपी ब्राह्मण, असे ब्राह्मणांतच वर्ग तर आहेतना. ब्राह्मण व्हायचें झाले म्हणजे धंदा अमुक करावा असें आज मुळींच नाहीं. निदान सर्व धंदे करणाऱ्या सर्व प्रकारच्या जातीनीं ब्राह्मणासारखा आचार ठेवावा ही गोष्ट तरी तुला आवडते काय?"

"होय आवडते."

"तर मग तू आमचें 'संप्रदाय वाढवावा' हें तत्त्व कबूल करतेस असे झाले."

"चांगल्या तऱ्हेनें रहावें याची इच्छा लोकांत वाढावी हें मी कबूल करतें."

---

## प्रकरण ३ रें.

## फेरीबोटींतील संवाद.

न्यूयॉर्क शहराच्या तेविसाव्या रस्त्यावर जी न्यूजर्सीकडे नेणारी एक फेरी बोटीची सर्व्हिस आहे त्या सर्व्हिसच्या बोटीवरून प्रत्येकाला जावे लागतेच आणि या बोटीवर अनेक लोकांच्या अचानक भेटी होतात. न्यूयॉर्क हे शहर ज्या मानाथन बेटावर पसरले आहे त्या बेटावरून मुख्य भूभागावर जाण्याचा रस्ता म्हटला म्हणजे या प्रकारच्या फेरी बोटी. यांपैकी एका फेरी बोटीवर दोन हिंदी तरुण बोलत होते. या तरुणांविषयीं फारसे सांगण्याचें कारण नाहीं; त्यांचे जे संभाषण चाललें होतें ते ऐकल्यास आपल्या कथासूत्रास अवश्य असणारी माहिती त्यांच्याच तोंडून बाहेर पडणार आहे.

"काय डॉ.सरंजामे,तुम्ही परत कधीं जाणार?"

"माझें कांहीं ठरलें नाहीं. तुम्ही कधीं परत जाणार?"

"माझ्या मनांत एका महिन्यानेच जावयाचे होते. पण लाला गजपतराय लवकरच येणार आहेत म्हणून एक आठवडा उशीरानें जाईन म्हणतो."

"भाग्यवान पोरगा आहेस!"

"मला तुमच्याविषयीं आश्चर्य वाटतें, तुम्ही डॉक्टोरेटची पदवी मिळविली. आतां खरोखर येथें रहाण्यांत काय फायदा आहे!"

"मलाहि हिंदुस्थानांत एकदां फेरी करून परत यावेसें वाटत आहे पण सध्यां प्रवासखर्चाला शिल्लक नाही म्हणून जात नाही."

"तुम्ही परत येण्याची भाषा बोलतां हे पाहून फार आश्चर्य वाटते! या अमेरिकेतला आयुष्यक्रम अतिशय कठिण झाला आहे. मला अमेरिकेंत रहाण्याची बिलकुल आवड नाही. समाजांतील चांगले स्थान येथे मिळण्याची आशा नाहीं. शिक्षण संपादा, इतर अमेरिकन विद्यार्थ्यांपेक्षां जास्त लायकी दाखवा आणि शेवटीं काय? युनिव्हर्सिटीत एखादी इंन्स्ट्रक्टरची जागा असली तरी आपल्यासारख्या काळ्या कातडीच्या माणसाला मिळण्याची मारामारच पडणार" अशुतोष उद्गारला.

"असें जरी आहे तरी कांहीं हिंदी मंडळी गुणाधिक्यानें चांगल्या प्रतीच्या नोकऱ्या मिळवूं शकली आहेत की नाही? कोणी केमिस्ट झाला आहे तर कोणी युनिव्हर्सिटींत इंस्ट्रक्टर झाला आहे" डॉ. सरंजामे म्हणाले.

"आणि पुष्कळसे चांगलें शिक्षण असूनहि येथील आर्थिक परिस्थितीत झगडण्यास असमर्थ ठरून शेवटीं कोणी ठकवाठकवीच्या धंद्यांत शिरले आहेत; कोणास सदसद्विवेकबुद्धि बाजूस ठेवून प्रसिद्ध हिंदु फलज्योतिषी म्हणून धंदा करावा लागत आहे. असल्या हालांत रहाण्यापेक्षां स्वदेशासच परत जा कसे."

"स्वदेशांत जाऊन तरी काय करणार! तेथें, कमी शिक्षणाच्या इंग्रजापुढे तोंड वेंगाडून नोकरी मागावयाची. नोकरी देणार तो प्राव्हिन्शिअल देणार, आणि प्राव्हिन्शिअल पत्करली म्हणजे

आपले लोकच ‘तुम्ही आपल्या शिक्षणाची किंमत कमी केली. जास्त शिक्षण असून तुम्ही खालची नोकरी पत्करली आणि राष्ट्राची अब्रू घालविली’ म्हणून आपणांस टोचून बोलणार!”

“विपत्ति स्वदेशी आहे तशी येथेंहि आहे! तर मग आतां करावयाचे तरी काय?”

‘स्वदेशीं भोगी विपत्ति, सांगे वडिलांची कीर्ति, तो एक मूर्ख’ एवढें सतवचन मला परिचित आहे. आणि, जे राज्य माझा आणि माझ्या जातिबांधवांचा पदोपदी अपमान करते, आणि तो अपमान दूर करणे माझ्या शक्तीच्या बाहेर आहे, अशा स्थितींत मला हिंदुस्थानांत परत देखील जावेसे वाटत नाही. एवढेच नव्हे तर हिंदुस्थानच्या परिस्थितीची आठवण झाल्या-बरोबर मला संताप येतो. येथें जन्मभर जरी कप-बशा विसळण्याची नोकरी करावी लागली तरी करीन पण हिंदुस्थानांत जाऊन आपल्या स्वदेश-बांधवांना परके लोक बुटाखालीं कसे तुडवतात ते पहाणे नको!”

“तर मग तुम्हाला देशांत जाऊन देशसुधा-रणेचे प्रयत्न करावयाचे की, येथेंच रडत दिवस काढावयाचे?”

“अरे बाबा, मी देशाभिमानी नाही. मला देशाचे दिवस सुधारण्याचा मार्ग मुळींच दिसत नाहीं. देशांत परत जाऊन इंग्रजांचे राज्य घाल-वून देण्याची मला ताकद नाही. तर मी देशास परत तरी कशास जाऊं. मी राजकारणी मनुष्य नाही, मी केमिस्ट आहें, आणि केमिस्टला हिंदु-स्थानांत क्षेत्र काय आहे?”

“मग येथे तरी तुला काय क्षेत्र मिळणार?”

“मला माझ्या शास्त्राचा अभिमान आहे, आपल्या शास्त्राच्या साहाय्यानें, जरी मी गोऱ्या कातडीचा नसलों तरी वर येईन असा मला विश्वास वाटत आहे.”

“जर तूं स्वदेशास जाणार नसलास तर तुझा देशाला काय उपयोग?”

“अरे बाबा, मला तूं देशाभिमानी मंडळींत कां ओढतोस. मला देशाचा अभिमान नाही असे तुला मी अनेकदां सांगितलें नाही काय?”

“डॉ. सरंजामे, तू मला अगदीं विचित्र मनुष्य दिसतोस. येथें तुझे अनेक स्नेही इंग्रज आहेत. तुझ्या इंग्रज मित्रांस तूं अनेक प्रसंगीं मदतहि केली आहेस. तुजजवळ एक भाकरी असली तर त्यांतली अर्धी मोडून तूं इंग्रज किंवा अमेरिकन विद्यार्थ्यास देखील देण्यास मागे पुढे पाहणार नाहीस म्हणून तुझी ख्याति आहे. असें असतां हिंदुस्थानावर इंग्रजांचे राज्य आहे याबद्दल जर आम्हांपैकीं कोणी अधिक संतापानें भाषण करणारा असेल तर तो तूंच आहेस, आणि पुन्हां स्वदेशाभिमानाचा आरोप जर तुझ्यावर कोणी केलाच तर संतापतोस; तर तूं स्वदेशाभि-मानी नाहीस हें तुझे म्हणणे आम्हीं खरे तरी मानावे कसे!”

“मी स्वदेशाभिमानी नाहीं ही माझी खात्री आहे.”

“आण यासाठीं तुझ्या एकंदर मनोवृत्तीं-संबंधानें मला कोडे पडले आहे.”

“तसे कोडे असले तर तूं मानसशास्त्र-ज्ञाकडे जा. मला एवढेच सांगतां येईल कीं, माझ्या वर्तनांत किंवा विचारात जर विसंगति असली तर ती विसंगति मी मुद्दाम उत्पन्न करीत नाही. मनुष्याच्या सर्व भावना परस्परांशी सुसं-गत असतात असे कोणीं सांगितले आहे?”

“डॉ. सरंजामे, तुम्ही अशी उडवाउडवी करूं नका. मला तुम्हास हिंदुस्थानविषयीं आलेल्या कंटाळ्याचें स्पष्टीकरण अगदी निराळें दिसत आहे.”

“तें कसें काय?”

“मला वाटतें—काय सागूं—स्पष्ट बोलूं?”

"खुशाल!"

"मला वाटतें कीं, हा प्रेमाचा खेळ आहे. स्त्रीप्रेम तुला येथे अडकवून ठेवित आहे."

"स्त्रीप्रेम मनुष्याला स्वदेशीं परत जाण्यास अटकाव कसें करील?"

"कां, स्त्रीप्रेम अटकाव करणार नाहीं?"

"फार थोडा करील—नाहीं—तूं म्हणतोस तें शक्यहि आहे. एखादा मनुष्य दुसऱ्याच्याच बायकोवर प्रेम करीत असला आणि तीहि त्यावर प्रेम करीत असली आणि दोघांचा प्रेमाचा व्यवहार फारसा पुढे गेला असला व तो चोरून चालला असला तर जेथें त्या बाईचा नवरा असेल तेथेच प्रेमामुळें त्याच्या बायकोवर प्रेम करणाऱ्या परक्याला अडकून पडले पाहिजे. असल्या प्रकारची परिस्थिति असल्याखेरीज मला येथे अडकून पडण्याचे कारण नाहीं!! पण तूं मला येथ दुसऱ्यांच्या बायकांशी संधान लावणारी व्यक्ति समजतोस काय?"

"तुम्ही भवभलत्या कल्पना काढून चालू प्रश्नापासून संभाषण दूर नेत आहांत. तुमचें मिस् कामतवर प्रेम जडलें आहे कीं नाहीं तें सांगा!"

"अरे बाबा, तूं मला आणखी पंचाइतीत पाडतोस. माझे प्रेम अनेक स्त्रियांवर जडले आहे. त्यातल्यात्यांत मिस् कामतविषयीं माझ्यामध्ये प्रेमभावना आहे किंवा नाहीं याचा मलाच पत्ता नाहीं. परंतु त्या प्रेमभावनेचा आणि हिंदुस्थानांत जाण्याचा संबंध काय?"

"संबंध एवढाच कीं, मिस् कामत आणि तूं [illegible] जातींचीं आहांत. तुम्ही हिंदुस्थानांत गेलांत तर दोघांनांहि जातीकडून त्रास होईल म्हणून तुम्ही हिंदुस्थानांत जात नाहीं."

"अरे बाबा, आजकाल जाती दुर्बल झाल्या आहेत. जातीची भीति निदान अमेरिकेस खेप घालणारास तरी अनवश्य आहे."

"आणि ती कां?"

"जातीची पर्वा लोक कां बाळगतात? तर याचें कारण हेच कीं, जात सोडली तर आपणांस ज्या समुच्चयांत रहातां येईल असा समुच्चय नाहीं म्हणून. हिंदुस्थानांत प्रत्येक मनुष्य कोणत्यांना कोणत्या तरी जातीचा आहे, आणि त्याला असे वाटतें कीं, जात सोडली तर आपल्या मुलाबाळांचें कसें होईल. त्याला उत्तर एवढेच की, जातिक्षेत्राबाहेर लग्न लावणारे आज थोडके आहेत, उद्यां जास्त निघतील. तुम्हांस वावरावयास अनकूल असा समाज सांपडेलच. मला जातीबाहेर लग्न केल्याने हिंदुस्थानांत आपली स्थिति विशेष वाईट होईल असें मुळींच वाटत नाहीं. प्रत्येक गोष्टीची आपण विनाकारण भीति बाळगतो"

"तर मिस् कामतचे आणि तुझे लग्न होणार एकूण"

"हे तुला कोणी सांगितले?"

"त्याशिवाय जातीबाहेर लग्न करण्याने नुकसान होत नाहीं इतके सिद्ध करण्याची तुला आवश्यकता काय?"

"तूं जातिविषयक प्रश्न उपस्थित केलास म्हणून त्यावर तात्त्विक दृष्ट्या उत्तर देणें अवश्य होतें."

"मग तुमच्या लग्नाला अडचण काय आहे?"

"अडचण मुळींच नाहीं, मला तिच्याशी लग्न करावेसें वाटलें पाहिजे, तिला माझ्याशी लग्न करावेसें वाटले पाहिजे आणि माझ्यापेक्षा अधिक लायख वर मिळावा अशी तिच्या बापाची इच्छा नसली पाहिजे एवढीच. बाकी अडचण कांही नाही."

"तुला तिच्याशीं लग्न करावेसें वाटतें कीं नाहीं?"

"अरे, तूं तर फारच चौकशी करायला लागलास? तूं मि. कामत यांच्या तर्फे चौकशी करतो आहेस काय?"

"मुळीच नाहीं."

"मग तुला इतकी जिज्ञासा कां?"

"केवळ स्नेही म्हणून."

"म्हणजे? माझी तिच्याबरोबर लग्न करण्याची तयारी आहे असे तुला कळले म्हणजे तूं माझा कोणता फायदा करून देणार आहेस?"

"मी कोणता फायदा करून देणार."

"तर मग तुझी जिज्ञासा स्नेहाची आहे हे मी कसें ओळखावें, आणि ती जिज्ञासा तृप्त कां करावी."

"कां बरें, जिज्ञासा असावी काय?"

"नसावी असें मी कसे म्हणूं–जी भावना स्वभावत: मनुष्याच्या हृदयांत उत्पन्न होते ती भावना नसावी असे म्हणणे म्हणजे सृष्टीची एखादी होत असलेली क्रिया होऊं नये असें म्हणणें आहे."

"जिज्ञासा असावी असें जर तुझें म्हणणें आहे तर तूं उत्तर दे."

"तेवढ्यावरून मी उत्तर दिले पाहिजे असे कोठें ठरतें? तुझी जिज्ञासा स्वाभाविक आहे–आणि तिला मी उत्तर कांहींच न देतां ती अतृप्त ठेवणें हेहि स्वाभाविकच आहे! सर्वच स्वाभाविक इच्छा परिपूर्ण होण्याजोग्या नसतात आणि दुसऱ्याच्या दृष्टीनें योग्यहि नसतात."

"तर मग हा प्रश्न विचारण्याचा अधिकार कोणालाच नाहीं काय?"

"नाहीं असें कसें म्हणूं–ज्यांच्या मनांत विशिष्ट एखादा लग्नसंबंध घडून येण्यासाठीं, मदत करावयाची असेल त्यांची जिज्ञासा योग्यच होईल तरुणास व तरुणीस एकत्र होऊन संसाराच्या प्रवाहांत पडण्याच्या निश्चय करतां येत नसेल, तर तें प्रकरण जास्त हातघाईवर आणण्यासाठीं "जिज्ञासू" आणि "हितचिंतक" स्नेही बरेच उपयोगी पडतात."

"आणखी?"

"तसेंच मी एखाद्या तरुणीवर फिदा होऊन गेलों आणि ती तरुणी मिळविण्यासाठीं माझी तारीफ तरुणीपाशीं किंवा तिच्या आईबापापाशीं करण्यास देखील "जिज्ञासु स्नेही" उपयोगी पडतील."

"बरे सांगितलेस, या बाबतींत जर तुला साहाय्य पाहिजे असेल तर तें मी मोठ्या आनंदानें करीन. मिस्तर आणि मिस् कामत यांच्यापाशीं तुझी सपाटून स्तुति करीन."

"पण आधीं माझी तयारी पाहिजेना! मिस् कामत मला हवी असे माझें ठरले म्हणजे मग मला तुझ्या सारख्या स्नेह्याची मदत उपयोगी पडेल. तरी देखील प्रेमसबंध जुळविण्याच्या बाबतींत तुझी मदत घ्यावी कीं नाहीं याचा मला विचारच करायला हवा!"

"तो कां?"

"तूं देखणा आहेस म्हणून माझें जिच्यावर प्रेम जडले असेल अशा तरुणीकडे तुझ्यासारखा देखणा तरुण मध्यस्थीला पाठवणें भयप्रद होईल. ती मुलगी माझ्याऐवजीं अर्थात तुलाच पसंत करणार! तूं अधिक देखणा, आणि स्वत:विषयीं विचार न करतां मित्र कार्याला उत्सुक झालेला, तेव्हां कोणाच्याहि दृष्टीनें तूं माझ्यापेक्षां उच्च ठरणार! माझे एखाद्या स्त्रीवर प्रेम जडले असते, आणि तूं आहेस तितका देखणा नसतास तर तुझ्या या मदतीचा मीं मोठ्या आनंदानें स्वीकार केला असता."

"मी तुझ्यापेक्षां देखणा आहें काय–अरे माझी अशी तंगडी ओढूं नको. पण डॉ. सरंजामे, मिस् कामतवर तूं प्रेम करतोस की नाहीं?"

"तुला माझ्या प्रेमसंबंधांत मदत करणें शक्य नाहीं हे तर तुला सांगितलेंच. तर तुला हितचिंतक, जिज्ञासू या नात्यानें प्रश्न विचारण्यास अधिकार नाहीं,–"

"तूं नेहमीं अधिकाराच्या गोष्टी बोलतोस."

"मी कायदेशीर अधिकाराच्या गोष्टी कोठें बोलतों. मी कायदेपंडित नाही, पण मी व्यावहारिक

उपयुक्ततेच्या दृष्टीनें बोलतों. कोणत्या तऱ्हेच्या आणि कोणत्या हेतूनें केलेल्या प्रेमविषयक चौकशीला खरी माहिती देणें योग्य आहे यासंबंधानें कांहीं तरी नियम आहेत. तर माझें एवढेच पहाणे आहे कीं तुझी चौकशी कोणत्या श्लाघ्य कारणाच्या वर्गांत घालतां येईल."

"चौकशी कोणत्या कारणासाठीं केली असतां ती श्लाघ्य चौकशी होईल?"

"त्या कारणांची याद मला संपूर्ण कशी देतां येईल? पण दोन चार उदाहरणे किंवा कारणे मीं तुला देतों. त्यांपैकीं एखाद्या कारणाखालीं तुझी जिज्ञासा तुला घालतां येईल तर पहा."

"सांग बरे, कांहीं तरी चेष्टेचे तू बोलणारच; मला ठाऊक आहे."

"हे पहा, मी जी गोष्ट गंभीरपणाने सांगतो ती तुला चेष्टेची वाटत आहे. चौकशीच्या योग्यायोग्यतेविषयीं मी जे नियम शोधून काढले ते तुला चेष्टेचे वाटतात."

"अरे बाबा, मी माझे शब्द परत घेतो! काय सांगायाचें ते सांग."

"एखाद्या तरुणाने ज्या सावकाराचे पैसे घेतले असतील, त्या सावकारास तो तरुण, कोणत्या मुलीवर प्रेम करीत आहे, तो श्रीमंत मनुष्याच्याच मुलीवर प्रेम करीत आहे किंवा नाहीं, इत्यादि [illegible] चौकशी करायला आणि प्रसंगीं त्या तरुणाला "योग्य सल्ला" द्यावयाला पूर्ण अधिकार आहे. पण तू तर माझा सावकार नाहींस, तेव्हां तुझे विचारणे चौकशी या सदराखालीं येऊं शकत नाहीं."

"बरें, पुढे."

"जर कोणी प्रेमाच्या मानसशास्त्राचें संशोधन करीत असला तर त्याला प्रत्येक व्यक्ति ही केवळ अभ्यासाची वस्तु या नात्यानें त्या व्यक्तीसंबंधानें चौकशी करण्यास अधिकार पोंचतो."

"मी मानसशास्त्री नाहीं हें तुला ठाऊकच आहे."

"जर तुलाच मिस् कामत हिची प्रीति संपादन करावयाची असेल, जर तूंच तिच्यावर प्रेम करूं लागला असशील, तर मात्र दुसरा कोण तिच्यावर प्रेम करीत आहे त्याची चौकशी करण्यास आणि आपल्या मार्गातील कांटा दूर करण्यास तुला अधिकार आहे—तुझी चौकशी वरच्या कारणांत पडली नाहीं तर निदान या कारणाखालीं तरीं पडेल."

"नाही बोवा, माझी चौकशी या कारणाखालीं पडत नाही. मी मि. कामत यांचा जांवई होण्याची महत्त्वाकांक्षा धरीत नाही."

"तर मग तू आपला चौकशीचा अधिकार स्वतःच कमी करून घेत आहेस—अरे, तूं लाजूं नकोस, मिस् कामतवर प्रेम करीत असलास तर तू खुशाल सांग, आणि मी तिच्यावर प्रेम करीत आहे किंवा नाहीं याचीहि चौकशी खुशाल कर, मीहि तुला उत्तर देईन. तुझ्यातर्फेची एक गोष्ट तुला सांगितली पाहिजे."

"ती कोणती?"

"जातीच्या दृष्टीने माझ्यापेक्षां तू मि. कामत यांच्या जास्त जवळचा आहेस ही गोष्ट तुला दाखवितां येईल."

"काय, मि. कामत यांनां मी तुझ्यापेक्षां जास्त जवळचा!"

"होय, पण ही गोष्ट तुला ठाऊक नाही. मि. कामत हे सारस्वत ब्राह्मण आहेत. तुम्हीहि गौड ब्राह्मण आहांत. सारस्वत आपणांस कधीं कधीं गौड सारस्वत म्हणवितात, ते आपला बंगाली ब्राह्मणांशीं संबंध सांगतात, बंगालीब्राह्मण मच्छी खातात, सारस्वतहि मच्छी खातात, तर बंगाली तरुणास महाराष्ट्रीय सारस्वताच्या मुलीसाठीं मागणी घालावयाची असल्यास महाराष्ट्रीयापेक्षां तुम्हीच जवळचे आहांत अशी मांडणी तुला करतां येईल."

"तुझी छोकरी दुसऱ्या तरुणानें न्यावी असें तुला वाटते काय?"

"एखादी मुलगी "माझी छोकरी" ठरली म्हणजे मी जी धडपड करायची ती करीनच, पण तुला स्पर्धा करून तरुणीचे अंतःकरण जिंकून नेण्याची मी मोकळीक ठेवतों—ज्याचे नशीब अधिक बलवत्तर असेल तो जिंकील, पण एखाद्या मुलीची प्रेमयाचना करणारे जितके अधिक तितके त्या मुलीला हितावहच आहे, म्हणून मी मिस् कामत यांच्या हिताच्या दृष्टीनेंच बोलत आहे."

"फार उदार आहेस बाबा तूं!"

आशुतोष चौधरीने हे शब्द उच्चारले तोच बोट न्यू जर्सीच्या धक्क्याला लागली आणि दोघे तरुण हस्तांदोलन करून निरानिराळ्या दिशांनां निघून गेले.

डॉ. सरजामे यांच्या पूर्ववृत्तताचा कांहीं भाग अमेरिकेस शिक्षणासाठीं गेलेल्या बऱ्याच लोकांच्या स्थितीचा दर्शक होईल. यांचे वडील मुंबईस एका पोष्टांत नोकर होते, व ते अल्पवयी असतांच मृत्यु पावले. त्यानंतर त्यांचे शिक्षण पुण्यास चुलत्याकडे झाले, आणि त्यामुळे पुण्यांतील सर्व वातावरण त्यांच्या अंगांत पुरे भिनले होतें. पुण्यास झालेला प्लेग, त्यानंतर पुणे शहरांत सोल्जर लोकांनीं केलेला धुमाकूळ, आणि त्यानंतर झालेले ऱ्यांड आणि आयर्स्ट यांचे खून, त्यानंतर लोकमान्य टिळकावर झालेले खटले आणि चाफेकर बधू यांची हकीकत या गोष्टी त्यांस अत्यंत लहानपणीं समजल्यामुळें त्याच्या मनावर कांही विशिष्ट संस्कार अगदीं अल्पवयांत झाले होते, पुण्यास ते चुलत्याकडे आईसह कांहीं दिवस रहात होते तेव्हां त्यांस असें दिसून आलें कीं, आपल्या आईची पदवी घरांत बिनपगारी नोकरापलीकडे कांहीं नाहीं. आई जर स्वैपाकीण म्हणून स्वतंत्र असती तर आईस अधिक चांगली वागणूक मिळाली असती, आणि पगारहि मिळाला असता, आणि आपणहि अधिक बऱ्या स्थितींत असतों. पण सभ्य आणि कुलीन घराण्यांतील बाईनें स्वैपाकीण म्हणून नोकरी करावयास तरी कसे जावें याप्रकारच्या सामाजिक निर्बंधाचा त्यांच्या स्थितीवर परिणाम झाला होता. डॉक्टर सरंजामे यांस आपल्या घराण्याचा अभिमान होता. त्यांच्या घराण्याचें पूर्वीचें आडनांव लेढे होतें, पण पेशवाईत पूर्वजांनी कांहीं थोर कृती केल्यामुळे पेशव्यांकडून सरंजाम मिळाला होता. पण तो सरंजाम पुढे इंग्रजीत राहिला नाहीं. फक्त सरंजामे आडनांव तेवढे शिल्लक राहिले. आपल्या पूर्वजांनीं मराठी राज्याच्या विस्तारासाठीं काय कृति केली यासंबंधीं माहिती त्यांस घरांतल्या बोलण्यावरून थोडीशी कळली होती, आणि त्याबरोबर त्यांस आपल्या काल्पनिक जबाबदारीचीहि जाणीव होऊ लागली होती. मराठी राज्य फसलें हें आपल्या पूर्वजांच्या दोषामुळें. तर झालेली चूक आपणांस दुरुस्त केली पाहिजे इत्यादि कल्पना त्यांच्या मनांत येत असत. पण या तऱ्हेच्या कल्पना पुस्तके वाचतांनां येत आणि कृति काय करावी हे समजत नसे. आपल्या देशांतील कुणबी लोकांनां मरेमरेतो काम करून पोटभर अन्न देखील मिळत नाहीं, आणि या तऱ्हेची स्थिति येण्यास जबाबदार सरकार आहे, आणि हे असें वाईट सरकार आपल्या लोकांच्या उरावर बसण्यास कारण आपण आहोंत इत्यादि कल्पना त्याच्या मनांत येत असत, पण त्याबरोबर आपण स्वतः अत्यंत असहाय स्थितींत आहोंत असे त्यांस वाटे. त्यांचे कांही शिक्षण झाल्यानंतर, सरंजामे यांस कांहीं अमेरिकन तरुण आपलें पोट भरून विद्याभ्यास करीत आहेत याची माहिती लागली, आणि इतरांस जे शक्य झालें तें आपणांस कां शक्य नाहीं, आपणहि परदेशीं जाऊन कांही तरी अधिक शिकावें इत्यादि विचार मनांत येऊन त्यांनीं अमेरिकेस जावयाचा

निश्चय केला. पण या गोष्टीस आईची संमति मिळाली नव्हती म्हणून तो निश्चय पुढील काळावर ढकलला गेला. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें त्यांची आई वारली आणि त्यांस वाटेल तिकडे जावयास चारहि दिशा मोकळ्या झाल्या. पण बी. ए. ची परीक्षा लवकरच व्हावयाची होती तेव्हां ते ती परीक्षा उत्तीर्ण होऊन येथून बी.ए.ची पदवी प्राप्त करून घेऊन अमेरिकेस गेले.

विष्णू सरजामे अमेरिकेस आल्यानंतर थोड-क्याच दिवसांत त्यास पोटाची पंचाईत पडूं लागली. आणि तो अमेरिकेत आपल्या पोटाची सोय कशी होईल हें पाहूं लागला. प्रथम तो एका शेतांत जाऊन २॥ डॉलर रोज प्रमाणे काम करीत होता, आणि नंतर त्याने कोलंबिया युनिव्हर्सिटींत प्रवेश केला. पोस्ट ग्रॅज्युएट स्कूलमध्ये त्याने आपलें नांव दाखल केलें, आणि पुढें तो तीन वर्षे युनिव्हर्सिटींत अभ्यास करीत होता. तीन वर्षांत तो तेथील उच्च पदवी पीएच्. डी. प्राप्त करून घेता झाला. आणि पुढे त्याच युनिव्हर्सिटींत उपाध्यपकाचें काम करीत होता.

तो युनिव्हर्सिटींत अभ्यास करीत असतां गोविंदराव कामत यांच्याकडे वारंवार जात असे. गंगाधरपंत न्यूयॉर्क सोडून कोठें तरी निघून गेल्यानंतर बऱ्याच दिवसांनीं या तरुण महाराष्ट्री-याची आणि गोविंदरावांची गांठ पडली. अस्सल पुण्याचा मराठी बोलणारा विद्यार्थी न्यूयॉर्कला आला आहे, त्यांतल्या त्यांत तो महत्त्वाकांक्षी आहे इत्यादि गोष्टी गोविंदरावाच्या नजरेस आल्यामुळे तो त्यांस आवडूं लागला. गोविंदरावाला असें झालें होते कीं, मराठी बोलणारा कोणी आला म्हणजे तो त्यांस आप्तेष्टांहि जवळचा आप्त वाटत असे. आणि आपल्या मुलाला त्याची संगत लागावी असेंहि वाटत असे. त्यांतल्या त्यांत विष्णूचें मराठी वाचन चांगलें होतें, वेदांतावरच्या गोष्टींची त्याला चर्चा करतां येत होती, आणि आगरकर, विष्णुशास्त्री व टिळक यांच्या पुण्यांत विश्रुत असलेल्या दंतकथा त्याला परिचित होत्या, व त्याचें मराठी कवींच्या कवितांचें वाचन चांगलें झालें होते. एकदां घरच्या गणपतीच्या उत्सवाच्या प्रसंगीं त्याने हरदासी पोषाख करून कीर्तनहि चांगलें केलें होतें, तें याचें कीर्तन ऐकून शांता-बाईहि चांगल्याच खूष होऊन गेल्या, कां कीं, त्यांस आपण न्यूयॉर्क येथें नसून शेणव्यांच्या ठाकुरद्वारीं आहोत असेंच वाटलें. आपल्या मुलांनां हिंदुस्थानचें वातावरण चांगलें समजून आपलें राष्ट्रीयत्व कायम रहाण्यास हा चांगला उपयोगी पडेल असें गोविंदरावांस वाटलें म्हणून त्याच्याकडे गोविंदरावांचें विशेष लक्ष राहिलें. एके दिवशीं मि. कामत यांच्या घरीं सरजामे जेवावयास आला असतां जेवण झाल्यानंतर पत्ते खेळणें झालें व पत्ते खेळल्यानंतर रात्र फार झाली म्हणून मि. कामत यांनीं रात्रीं सरजामे यास निजावयास ठेवून घेतलें. त्या दिवशी गोविंदराव आणि विष्णु हे एकाच खोलीत निजले होते आणि सकाळीं दोघेहि जागे झाल्यानंतर तुम्हाला कांहीं भूपाळ्या येताहेत का हो?म्हणून गोविंदरावांनीं विचारलें.तेव्हां "घन-श्यामा सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला । उठि लव-कर वनमाळी उदयाचळीं मित्र आला॥' ही भूपाळी विष्णूनें पूर्णपणें चांगली म्हणून दाखविली. ती म्हणून दाखविल्यानंतर गोविंदरावांनां ती इतकी गोड लागली कीं, अरेरे आपण या गोड भाषेला मुकणार तर नाहीं ना, आपली मुलें मराठी जाण-तात, पण त्यांस अशी भूपाळी रचतां थोडीच येणार आहे, लीला कविता करूं लागली आहे पण ती कविता इंग्रजीतच करते इत्यादि गोष्टी मनांत जागृत झाल्या. विष्णुसरजामे हा त्यांच्या परिचयकक्षेंत आल्यानंतर गोविंदरावांचें महा-राष्ट्रीयत्त्व इतकें जागृत झाले कीं, त्यांस नवीन जगास येऊन आपण मिळविलेली ही संपत्ति

आपलें महाराष्ट्रीयत्व जाईल तर निरुपयोगी आहे असें वाटूं लागलें.

गोविंदराव कामत यांच्या घरीं सरंजामे यांचें जाणें येणें अधिकाधिक होऊं लागलें आणि शांताबाईस तर डॉ. सरंजामे अत्यंत प्रिय झाले.

---

## प्रकरण ४ थें.

## मत्तमयूरीच्या सहवासांत.

डॉ. मत्तमयूरीची नवी परिचारिका या नात्याने रुक्मिणीची कारकीर्द बरीच सुखावह झाली. रुक्मिणीबाई इस्पितळांत मिस् स्वीटलंड यांच्या देखरेखीखालीं काम करीत असतां, शस्त्रविद्येतील कौशल्याबद्दल मुंबईस नुकतीच प्रसिद्ध होऊं लागलेली डॉक्टरीण मत्तमयूरी हिनें मिस् स्वीटलंड यांस लिहून रुक्मिणीस आपल्याकडे रहाण्यास बोलाविलें. प्रथमत: मिस् मत्तमयूरी रायतुरकर इच्याकडे नोकरीस जावें किंवा नाही आणि त्यांतल्यात्यांत रहावयास जावें किंवा नाही याविषयीं रुक्मिणीस विचार पडला. मिस् मत्तमयूरी अमेरिकेहून शिकून आलेली; ती आपल्या नवऱ्याला कधीं तरी भेटली असेल, तर तिला आपण जरूर भेटावें अशी रुक्मिणीची इच्छा होतीच, पण तिच्या सहवासांत रहावें किंवा नाही, कारण मत्तमयूरी कांही ब्राह्मण नाही, अशा तिच्या मनांत शंका येत होत्या. पण आतां आपल्याला अमेरिकेला जावयाचे आहे, तिकडे जावयाचें तर बोटीवर पाय ठेवल्यापासून वाटेल त्याच्या हातचे आपणांस खावें लागणार; तर येथील एखाद्या ब्राह्मण नसलेल्या स्त्रीच्या घरीं जेवावयास काय हरकत आहे हे विचार देखील तिच्या मनांत आले. मनाची हरकत नाहीं पण जनाची हरकत किती होईल याचीहि कल्पना तिला आलीच. लोकांतली भावना अशी कीं, इंग्लंडमध्यें जातांना किंवा गेल्यानंतर ज्या गोष्टी कराव्या लागतात त्या आपद्धर्म म्हणून केल्यास हरकत नाहीं, पण हिंदुस्थानांत इतर जातीच्या घरांत जाऊन रहाणें हें कांहीं चांगलें नाहीं. या शंकेचेहि तिनें पुढील उपाय काढून निराकरण केले! डॉ. मत्तमयूरीच्या घरीं जाऊन रहाण्यास हरकत नाहीं, आपण आपली जेवणाची निराळी सोय करावी म्हणजे झाले; एवंच मत्तमयूरीचे आमंत्रण रुक्मिणीने मोठया आनंदानें स्वीकारलें.

डॉ.मत्तमयूरीकडे रुक्मिणीनें नोकरीला जाण्याचें जाहीर झाल्यानंतर वाईत (लोकचर्चा) जरा जास्त झाली. डॉ.मत्तमयूरीचा कौटुंबिक पूर्वेतिहास महाराष्ट्रास बराच परिचित होता. डॉ. मत्तमयूरी ही मुंबईतील एका प्रसिद्ध डाक्टरची एकुलती एक मुलगी असून बऱ्याच मोठया इस्टेटीची मालकीण होती. हिच्या घराण्यांतला पैसा बऱ्याच लोकांच्या डोळ्यांत येत असे. आणि जसजसे हे कुटुंब संपत्तिमान होऊं लागले तसतसा त्या कुटुंबापाशीं पैसा कसा जमला याची वाटाघाट होऊ लागली. हिच्या वडलांनी लाखों रुपये आपल्या धंद्यांत मिळविले. पण त्यासंबंधानें लोक विशेष चर्चा न करतां डॉक्टरला आपल्या आईकडून पैसे कसे व किती मिळाले, मावशीकडून कसे मिळाले आणि सासूची संपत्ति त्याच्या घरांत कशी आली इत्यादि गोष्टींची मुंबईत उजळणी होत असे. आणि तीच उजळणी जेव्हां रुक्मिणीस डॉ. मत्तमयूरीकडे नोकरीसाठीं आमंत्रण आले तेव्हां वाईतहि होऊं लागली. डॉ. मत्तमयूरीने जेवणाखाणासह रुक्मिणीस ६० रुपये पगार देऊं केला होता. त्या मुद्दयावरहि वाटाघाट झाली. अनेकांच्या कल्पना त्यांत मिसळल्या आणि त्यावरून तथील मंडळींनीं त्या सर्वांस पटेल असें कारण शोधून काढलें. वांईच्या मंडळीने, केवळ ब्राह्मण स्त्री बाटविण्यासाठींच मुद्दाम ही लाघवी डॉक्टरीण इतका पगार देत आहे असेच म्हणण्यास सुरवात केली. डॉ. मत्तमयूरीनें एक सूतिकागृह मुंबईत सुरू केलें होतें तेव्हां त्यावरची सर्व व्यवस्था

पहाण्याचें आणि प्रत्येक बाईस नीट काळजी-पूर्वक वागविण्याचें काम रुक्मिणीसाठीं योजिलें होतें आणि तिची जेवणाची सोय सूतिकागृहांत असलेल्या ब्राह्मण स्वयंपाक्याकडून करावयाचें योजिलें होते, आणि या सर्व गोष्टी रुक्मिणीस आणि तिच्या आईस कळल्यानंतर दोघींचीहि त्याला आडकाठी आली नाही. आणि आई व मुलगी या दोघीजणी वाईतून निघून मुंबईस येऊन राहिल्या.

डॉ. मत्तमयूरीचा कौटुंबिक इतिहास पुढील-प्रमाणें होता:–हिची आजी–म्हणजे बापाची आई ही मुंबईतील एक प्रसिद्ध नायकीण होती. हिच्या गायनाची त्या काळांत फार प्रसिद्धि असे. हिराबाई ही नायकीण म्हणून प्रसिद्ध होती तशी धर्मकृत्याबद्दल देखील ती प्रसिद्ध होती. ही कोण-त्याहि यजमानावर अवलंबून अशी नव्हतीच; कां कीं, हिनें गाण्यावर लाखों रुपये मिळविले होते. तसेंच हिची बहीण गोकुळ हिनेंहि मिळ-विले होते. या दोघी बहिणी गोवें प्रांतांत रायतुर म्हणून गांव आहे तेथल्या रहाणाऱ्या आणि त्या-मुळें यांनां हिराबाई रायतुरकरीण आणि गोकुळ रायतुरकरीण असें म्हणत. गोकुळला कांही मूल-बाळ नव्हते, पण हिराबाईस एक मुलगा होता. हा मुलगा कोणातरी यूरोपियन गृहस्थाचा असावा अशी चर्चा लोकांत होई; कां कीं, हा मुलगा अगदी गोरापान होता आणि त्याचे केंस तांबूस वर्णाचे होते. आपल्याला मुलीच्या ऐवजी मुलगा झाल्याबद्दल हिराबाईस दु:ख झालें असेल, पण तिने तेवढयासाठीं मुलाची उपेक्षा केली नाही. मुलगा हुशार निघाला, डॉक्टर बनला, आणि डॉक्टर म्हणून तो प्रसिद्धीस आला. या मुलाचें नांव पांडुरंग. डॉ. पांडुरंग यास आपल्या आईचे आणि मावशीचे पैसे तर मिळालेच पण याची बायको देखील एका श्रीमंत नायकिणीची एकुलती एक मुलगी असल्यामुळें त्याच्या बायकोकडूनहि द्रव्य घरांत आले आणि या सर्व इस्टेटीची मालक आज एकटी डॉ. मत्तमयूरी ही होती. डॉक्टर पांडुरंग यांची, इच्छा मुलीने डॉक्टरीण व्हावे आणि कोण-त्यातरी योग्य पुरुषाबरोबर लग्न करावें ही होती. मुलगी डॉक्टरीण तर झालीच; आतां तिचें चांगल्या योग्य पुरुषाबरोबर लग्न करावयाचेंच काय तें राहिलें होतें. डॉ. मत्तमयूरी ही अमेरिकेला गेली त्यापूर्वी तिचा बाप वारला होता.

डॉ. मत्तमयूरी हिने एकाएकी रुक्मिणीस सलगी करूं दिली नाही. दहा पांच दिवस सेव्य-सेवक भावानेच ती वागली व तिलाहि वागविलें. पण रुक्मिणी ही देखणी होती. तिच्या अंगीं उच्च घराण्यांतील स्त्रीस शोभेल अशी वागण्याची ढब होती, व राग आलेल्या व्यक्तीसहि आनंद उत्पन्न करील अशा तऱ्हेचे स्वाभाविक स्मित तिच्या मुखावर विलसत असे. डॉ. मत्तमयूरीची, रुक्मिणी जरी आपली नोकर आहे अशी भावना होती तरी रुक्मिणी उच्च जातीची आहे ही भावनाहि होती. डॉ.मत्तमयूरी श्रीमंत होती, देखणी होती, सुशिक्षित होती, अमेरिका, यूरोप वगैरे प्रदेश पाहिलेली होती; तरी देखील तिच्या मनाच्या अगदी आंतल्या कोठींत कांही निराळ्या भावना होत्या, त्या कधीं कधीं उचंबळ्या खात. आपण अकरमाशा आहोंत आणि त्यामुळे आपण अगदी गरीब पण कुलीन घराण्यां-तील तरुण स्त्रीपेक्षां अधिक हतभागी आहोत असेच तिला वाटे, आणि जगांतल्या या जन्म-विषयक भावनांमुळें होणाऱ्या उच्चनीचतेचा जरी राग येई तरी त्या भावनांमुळें उत्पन्न होणारी जी आत्मलघुत्वाची भावना ती मात्र तिची नष्ट झाली नाहीं. जेव्हां जेव्हां रुक्मिणी तिच्याकडे स्मित-पूर्वक पाही, तेव्हां ही सेविका केवळ सलगी कर-ण्याचा प्रयत्न करीत आहे म्हणून तिला राग याव-याचा तो न येतां आपला हा सत्कारच झाला असें तीस वाटे. रुक्मिणीशीं तिची वागणूक अधिका-धिक सलगीची होऊं लागली व उलट रुक्मिणीची

वागणूक जेव्हां अधिक सलगीची होई तेव्हां तिला आनंदच वाटू लागे. या आनंदाचें कारण केवळ जातिविषयकच होतें, किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें रुक्मिणीशीं सलगीचा आनंद होई ते पुढे कळेलच.

डॉक्टर मत्तमयूरी रुक्मिणीस आपल्याबरोबर पुष्कळदां मोटारींतून फिरावयास नेई तेव्हां त्यांची अनेक गोष्टीवर बोलणी होत, तथापि सुमारे एक महिना उलटून जाईपर्यंत रुक्मिणीने "त्यांची व तुमची ओळख आहे काय" हा प्रश्न डॉक्टरीणबाईस विचारला नव्हता. पहिल्या चौकशीच्या वेळेस डॉक्टरीणबाईनीं "आहे, ते अमेरिकेंत खुशाल आहेत, ते आपण केव्हां तिकडे जाणार म्हणून वाट पहात आहेत" एवढेंच सांगितले. पण पुढे कांही दिवसांनीं त्यांचे या विषयावर अधिक बोलणें होऊन डॉ. मत्तमयूरीनें आपला सर्व वृत्तांत रुक्मिणीस निवेदन केला.

"गंगाधरपंत यांची आणि माझी शिकागो येथें ओळख झाली. मी त्यावेळेस "युनिव्हर्सिटी ऑफ शिकागो"च्या मेडिकल कालेजांत होतें. मी त्यांनां पुष्कळ सार्वजनिक प्रसंगी पाहिले आणि नतर आमचा परिचय बराच दृढ झाला. गंगाधरपंत व मी अशी दोघेजण बरोबर फिरावयास जातहि होतो.–तू घाबरूं नको–आम्ही दोघे जरी फिरावयास बरोबर जात होतों तरी आमची प्रेमाची भाषा कधींच सुरू झाली नाहीं; व याचे मला फार गूढ वाटे. मी कधीं दुसऱ्या विद्यार्थ्याबरोबर फिरावयास गेलें म्हणजे दुसऱ्या किवा तिसऱ्या फिरायला जाण्याच्या वेळींच त्या विद्यार्थ्यांकडून लगट किवा मला वश करून घेण्यासाठी खटपट होई–"

"ती कशी काय ?"

"तू लग्न झालेली बाई आणि तू मला असा प्रश्न करावा काय ?"

"मी पुरुषांबरोबर फिरायला गेलेंच नाहीं."

"तर मग तुला बऱ्याच गोष्टी समजल्याहि नसतील."

"तुम्ही फिरायला गेला म्हणजे रस्त्यांत तुम्हाला वश करण्याची खटपट विद्यार्थी कसे करणार ?"

"त्या गोष्टी सांगावयाच्या कशा, सांगावयालाहि संकोचच वाटायचा, पण तुला कांहींच कल्पना नाहीं, आणि तू अविवाहित नसल्यामुळे तुला ते अनुभव यापुढें येतील हे संभवनीय नाहीं."

"पण मला तें सांगाना."

"सांगा म्हणून म्हणालीस म्हणून सांगते, आम्ही फिरायला गेलो म्हणजे पुरुषांचा दंड धरून स्त्रियांनी जावें ही तर रीतच आहे. त्यामुळे स्त्रियांचे हात पुरुषांच्या बाहुपाशांत तर गुंतलेले असायचेच. त्या बाहुपाशानें हातांला घट्ट दाबण्यांपासून तरुण पुरुष आपल्या मनांतील भाव व्यक्त करण्यास सुरवात करतो."

"या एकत्र फिरायला जाण्याचे पर्यवसान पुढे कशांत होते?"

"त्याचे पर्यवसान लग्नांत होतेच असे खात्रीने सांगतां येत नाहीं. पण पुष्कळदां प्रेमांत होतेंच, आणि दुसरी कोणतीहि विघ्नें नसली तर लग्नांतहि व्हावयास हरकत नाही."

"प्रत्येक फिरायच्या सोबत्याशीं प्रेम जुळविलें जाते काय?"

"जेव्हां एखादी स्त्री अनेक पुरुषांबरोबर जातां जातां एकावरच तिचें विशेष प्रेम जडून इतर पुरुषांची संगत ती कमी करूं लागते–"

"स्त्रीला एखाद्या पुरुषाची संगत विशेष आवडली म्हणजे त्या पुरुषाला त्या स्त्रीची संगत विशेष आवडेल ही काय खात्री आहे–."

"आपण त्या पुरुषास आवडत आहों किंवा नाहीं हें स्त्रीला सहज समजतें."

"ते कसें?"

"ते पुरुष अगोदर आपला भाव निरनिराळ्या रीतीनी व्यक्त करूं लागतात. स्त्रीला घरीं

पोंचवून आपण आपल्या घरीं जातांना ते "गुड इव्हिनिंग" चुंबन देऊन करा असे म्हणतात आणि तें चुंबन मिळाले तरी त्यांनां लवकर निघून जावें असें वाटत नाहीं, निघतां निघतांच अर्धा पाऊण तास जातो-आणि कधीं कधीं तर घरी किंवा घराच्या दारापुढें ते तास दोन तास बोलत बसतात. फिरायला जावयाचें ते एकांतात जावें, जेथे जनसंमर्द थोडका असेल अशा ठिकाणीं जावे ही तर प्रवृत्ति असायचीच, पण गंगाधरपंतांनीं अशा ठिकाणीं मला नेले नाही. सिनेमा पहावयास जेव्हां कोणा तरी तरुणाला सोबत घेऊन मी जात होतें तेव्हां तर कांहीं विचारावयासच नको! तो तरुण विद्यार्थी आणि मी शेजारशेजारीच व आम्ही दोघेहि काळोखांत. आणि थंडीचे दिवस असले म्हणजे उबेसाठी एकमेकांला चिकटून बसण्याची तर आवश्यकता, निदान सप्रयोजकता. तरुणाचा वाम व स्त्रीचा सव्य बाहू एकमेकांशीं गुंतलेले व ते सिनेमांत उत्पन्न होणाऱ्या देखाव्यांप्रमाणे सैल-घट्ट होणारे; मोटार कड्यावर आली किंवा तारू फुटलें आहे असा देखावा उत्पन्न झाला तर जणू काय आपण एकमेकांनां सोडावयाचे नाहीं अशी भावना व्यक्त करण्यासाठीं अगदीं घट्ट होत, किंवा चुंबनाचा देखावा आला म्हणजे घट्ट होत."

"पण बाई, मला हे सांगा की, तुम्ही किती जणांच्या बरोबर फिरायला गेला?"

"मी पाळीपाळीनें शिकागो येथील सर्व हिंदु विद्यार्थ्यांबरोबर फिरायला गेलें."

"सिनेमाचे देखावे चालू असतां किंवा फिरायला गेला असतां तुम्ही सर्व हिंदु विद्यार्थ्यांनां आपला हात धरू दिला!"

"न देऊन काय करूं, हा तर देशाचाच रिवाज आहे. हिंदु विद्यार्थी अमेरिकन तरुणीबरोबर फिरायला जातांना जसे वागत तसेच माझ्याबरोबर फिरायला गेले असतांना वागत, आणि त्यांस तसें वागूं देणें अवश्य होतें, किंबहुना माझें कर्तव्य होते."

"कर्तव्य तें का होतें."

"ज्या देशांत आपण रहातों त्या देशाच्या [illegible] कल्पना सर्व स्त्रीपुरुषांस अवलंबाव्या लागतात तरुण स्त्रीनें कोठें बाहेर फिरावयास जातांना कोणातरी पुरुषास किंवा प्रौढ स्त्रीस बरोबर घेऊन जाणे हें योग्य समजतात. तर मला फिरावयाला जावयाचे किंवा नाटकाला जावयाचें झालें तर एकटीनें न जातां रस्त्यांत कोणी उद्दामपणानें बोलूं नये किंवा चेष्टा करूं नये म्हणून कुणाच्या तरी बरोबर जावें हें तर योग्यच आहे. कोणातरी तरुण विद्यार्थ्याबरोबर मी फिरावयाला गेले तर ज्याप्रमाणें अमेरिकन मुली बरोबरच्या तरुणाच्या बाहुपाशांत आपला हात देऊन चालतात त्याप्रमाणे मी चालले नाहीं तर तें लोकरीतीहून निराळें दिसेल म्हणून तरुण पुरुषाचा हात धरूनच मलाहि चालले पाहिजे."

"तुम्ही बहुतेक हिंदु विद्यार्थ्यांबरोबर फिरायला जात होतां."

"शिकागोच्या सर्वच इंडियन विद्यार्थ्यांबरोबर फिरावयास मी गेलें होतें."

"सर्वांबरोबर कां, आणि सर्वच विद्यार्थी तुमच्याबरोबर फिरायला कसे आले?"

"तुला परदेशीं गेलेल्या एकंदर समाजाची कल्पना नाही. प्रत्येक ठिकाणी असे आहे कीं, हिंदु पुरुष पंचवीस तर विद्यार्थिनी एखादीच. तिचा सहवास आपल्याला व्हावा, आपण तिला आवडूं लागावें म्हणून सर्वच विद्यार्थी खटपट करीत असतात; आणि त्यामुळें आपल्या स्त्रियांनाच उलटा मान चढतो, सर्वच विद्यार्थिनी सर्व तरुणांबरोबर जावें ही समदृष्टि ठेवीत नाहींत, आणि ज्या तरुणांची स्त्रीविद्यार्थिनीशीं ओळख झाली असेल ते तरुण देखील तिची इतर हिंदु तरुणांशीं ओळख होऊं नये म्हणून धडपड करीत

असतात. ज्या मुलीस आपल्या देशांत कोणी विचारणार नाहीं असल्या मुलीच्या भोंवतीं तरुण आणि देखण्या पुरुषांचा घोळका जमूं लागतो— रुक्मिणीबाई, तुम्हाला त्या मधुर परिस्थितीचा अनुभव आतां येणें शक्य नाहीं. तथापि ज्या विद्यार्थिनी तिकडे जातील त्यांस हा गोड अनुभव येईल, आणि तो त्या कधींहि विसरणार नाहींत—"

"तुम्हीं तर पुष्कळ तरुणांबरोबर फिरावयास गेलां होता तर तुम्हीं चुंबनपूर्वक निरोप पुष्कळ पुरुषास दिला आहे काय?"

"तूं किती खोदखोदून विचारतेस, या गोष्टी सांगायची देखील लाज वाटते, कारण कीं तूं या अनुभवांतून नाही गेलीस आणि त्यामुळें तुला या गोष्टींचें आश्चर्य वाटत असेल किंवा तूं या गोष्टी वाईटहि म्हणत असशील. पण मी तुला खरें सांगायचें ठेवीत नाहीं. मीं दोघांतिघां तरुणांस चुंबनपूर्वक निरोप दिला आहे."

"एका तरुणीने पुष्कळ तरुणांस चुबन देणे हें तुम्हांस गैर वाटत नाहीं काय—"

"माझ्या या बाबतींतल्या नीतिकल्पना अमेरिकन झाल्या आहेत. मला त्यांत गैर वाटत नाही."

"अमेरिकन लोकांनां यांत गैर वाटत नाहीं— त्यांनां नीतिकल्पना कांहीं नाहींतच काय" रुक्मिणी म्हणाली.

"नीतिकल्पना नाहीत असे कसे होईल. नीतिकल्पना मनुष्यस्वभावामुळे उत्पन्न झाल्या आहेत. जें आपले म्हणून आपण समजतों त्यावर आघात जर कोणी करूं लागला तर तें कोण सहन करील? जें आपले असेल तें रक्षण करावें हा मनुष्य स्वभाव आहे आणि नीतिकल्पना त्यामुळेंच उत्पन्न झाल्या आहेत. आपलें असेल तें रक्षण करण्याची भावना आपल्या पुरुषांइतकीच अमेरिकन लोकांत आहे. तर त्यांस नीतिकल्पना नाहींत असें कसें होईल. "

"तर मग तरुण मुलगी अनेकांनां चुंबन कशी देते, तिच्या नवऱ्याला ते आवडेल काय? "

"विवाहित स्त्री अनेक पुरुषांस चुंबन देत नाहीं. हें चुंबनविषयक स्वातंत्र्य लग्नापूर्वीचें असतें."

"लग्नापूर्वी असें स्वातंत्र्य कां—आणि तें किती असतें? "

"लग्नापूर्वी हे स्वातंत्र्य असलेंच पाहिजे. त्याशिवाय एकमेकांची आकर्षणभावना एकमेकांस कशी कळावी!"

"आणि हे आकर्षणाची भावना व्यक्त करण्याचें स्वातंत्र्य कोठपर्यंत जातें? "

"चुंबन आणि आलिंगन इत्यादि बाह्योपचारांपलीकडे हे स्वातंत्र्य जातां कामा नये-लग्न ठरलें तरी देखील या मर्यादेचा अतिक्रम होतां कामा नये असा तिकडे नियम आहे."

"तो पाळला जातो काय?"

"तो पाळला जातो कीं, जात नाहीं याचा अनुभव मला प्रत्यक्ष नाही. मला वाटतें कीं चांगल्या लोकांत तो पाळला जात असावा. तथापि एखाद्या बाईस लग्न झाल्यानंतर एका वर्षाच्या आंत मूल झाले म्हणजे लग्न झाल्यापासून नऊ महिने पुरे झाले कीं नाहींत याची मोजदाद आणि चर्चा होते हें मात्र मी पाहिलें आहे."

"लग्न ठरल्यानंतर पुरुषांस जर आलिंगन-चुंबनापलीकडे जाऊं द्यावयाचें नाहीं, आणि लग्न ठरण्यापूर्वी देखील तें स्वातंत्र्य चालूच ठेवायचें तर लग्न ठरण्यापूर्वीच्या दिवसांत आणि ठरल्यानंतरच्या दिवसांत फरक तो काय? "

"फरक पुष्कळच आहे, एक तर ती स्त्री दुसऱ्या पुरुषाबरोबर फिरायाला जाणें बंद करते, आणि आपल्या लग्न झाल्यानंतरच्या गोष्टींसंबंधाचा विचार करूं लागते. तिच्या प्रेमाचें आश्रयस्थान निश्चित झाल्यामुळें तिची त्या तरुणाशी वागणूक अधिक आपलेपणाची होते—शिवाय लग्न ठरण्यापूर्वी स्त्रियांनी आलिगन-चुंबनाच्या

बाबतींत अघळपघळ असावें हे तेथेंहि चांगलें मानीत नाहीत. स्त्रियांनीं तरुणांबरोबर फिरावयास जावें आणि तरुणांची चुंबन देण्याविषयी विनंति एकाएकी मान्य करावी असे मुळीच नाही. स्त्रीनें तरुणास चुंबन घेऊं देणे किंवा स्वत: त्याचें चुंबन घेणे ही गोष्ट तिची पसंति व्यक्त करणारी आहे, आणि ही पसंति दाखवावयाची ती देखील विचारानेच दाखविली पाहिजे."

" आमच्या यजमनांबरोबर तुम्हीं फिरायला जात होतां तेव्हां तुमचे एकमेकांवर प्रेम जडले की नाहीं?"

" रुक्मिणीबाई या गोष्टी तुमच्यापाशी बोलायच्या म्हणजे कसेसेंच वाटते. पण त्या सर्व सांगून टाकून मोकळे झालेंच पाहिजे असेहि वाटते. गंगाधरपंत आणि मी जेव्हां बरोबर फिरावयास जात होतों,तेव्हां त्यांची वृत्ति अत्यंत तटस्थपणाची होती. जणूं काय मी कोणी त्यांच्या मित्राचीच बायको आहे. त्यांच्या या तटस्थ वागण्यामुळे त्यांच्यावर माझा विश्वास अधिक जडला. इतर तरुणांबरोबर फिरावयास गेले असतां त्यांची माझ्याबरोबर अधिकाधिक लगट करण्याची प्रवृत्ति होई आणि त्यामुळें माझ्या मनास अनेकदा अस्वस्थता उत्पन्न होई. त्यांनां दूर सारावें तेव्हां त्यांचा अपमान झाला असे त्यांस वाटे. आणि त्यांची मला लगट सुखकर होई असे मुळींच नसे. मला तेथील बहुतेक हिंदु तरुणांपाशी सख्य पाहिजे होतें, मित्रता पाहिजे होती, पण परिचयाचे पर्यवसान केवळ सख्यांत होऊं देण्याऐवजीं अनुनयांत होऊं लागे, आणि ते तर मला टाळावयाचे होतें तर सख्यवाढवील पण अनुनयपर होणार नाहीं अशा संयमी पुरुषाशीं मला सहवास हवा होता. गंगाधरपंतांच्या आत्मसंयमनानें हे आपल्याबरोबर फिरावयास येण्यास योग्य पुरुष आहेत असेंच मला वाटे आणि त्यामुळे त्यांच्याबरोबर फिरावयास जाणे मी अधिक पसंत करीं; आणि त्याचा परिणाम असा झाला की, आम्हा दोघांचे परस्परावर प्रेम जडले आहे अशी शिकागोच्या हिंदुस्थानी मंडळींत एकदम चर्चा सुरू झाली."

" मग ती चर्चा खोटी होती काय?"

" ज्यावेळेस ती सुरू झाली त्यावेळेस तरी निदान ती अजीबात खोटी होती."

" म्हणजे काय? तुमचें दोघांचे एकमेकांवर प्रेम मागाहून जडले?"

" एकमेकांचे एकमेकांवर प्रेम जडले कीं नाही हे मलाच सांगतां येत नाहीं, माझें त्यांच्यावर प्रेम जडलें हे मात्र खास, आणि माझ्या मन:स्थितीची जाणीव मला फार लवकर झाली?"

" ती कशी?"

"माझ्याशी गंगाधरपंत अत्यंत सभ्यतेने, जणूं काय ते एकाद्या विवाहित स्त्रीबरोबर फिरावयाला जात आहेत अशा रीतीने वागत. प्रथमत: त्यांच्या या सभ्यतेच्या वर्तणुकीनें जरी मला आनंद झाला तरी तो आनंद फार दिवस टिकला नाहीं. ते प्रथम जितका दूरपणा ठेवीत तितका दूरपणा अनेक महिने झाले तरी त्यानी कायम ठेवला होता. त्यांच्या भावी आयुष्यक्रमाविषयी अनेक विचार मला कळले, त्यांच्या आयुष्यक्रमांत आपण जणूं काय प्रवेशच करीत आहोंत असें मला वाटे आणि आपल्या भावी योजना देशविषयक विचार इत्यादि गोष्टी सांगून जरी त्यांनी मला आपल्या सार्वजनिक आयुष्यांत एका अंशीं भागीदार केलें तरी त्यांची माझ्याशी असलेल्या वागणुकींत तटस्थ वृत्ति ढळली नाहीं. त्यांनीं आपल्या घरच्या गोष्टी किंवा वैयक्तिक सुखदु:खाच्या गोष्टी मला कधींच सांगितल्या नाहींत, फार काय त्यांचे लग्न झाले आहे हें मला तरी बराच काळपर्यंत माहीत नव्हतें—"

" तुम्ही त्यांच्याबरोबर फिरायला जात होतां त्यावेळेस तुम्हांला त्यांचें लग्न झालें आहे हे माहीत नव्हतें?"

"मुळींच नव्हतें."

"तर मग मी निदान तुम्हांस तरी दोष देणार नाहीं. तरी पण तुम्ही कधीं त्यांच्या घरची चौकशी केली नाहीं? "

"मला ती करण्याचें कधीं धैर्यच झालें नाहीं?"

"कां बरें?"

"अमेरिकेस आलेल्या पुष्कळ तरुणांचा इतिहासच असा असे कीं, त्यांस तो सांगण्यास आनंद वाटत नसे, बरेचसे हिंदु विद्यार्थी स्वतःच्या बळावर विद्याभ्यास करीत असत, त्यांच्या घरची माहिती विचारावयाची म्हणजे त्यांच्या घरची असलेली गरीबी बाहेर काढावयाची. आणि मी तेथें काम न करणाऱ्या आणि घरून पैसे आणणाऱ्या आणि साधारणपणे सुखवस्तु समजल्या जाणाऱ्या व्यक्तींपैकीं असल्याकारणाने मला जरा ते आपल्या बाहेरची समजत. एवढेंच नव्हे तर तरुण मडळी, आपलें दारिद्र्य किंवा दैन्य मजसारख्या स्त्रीला दिसून येऊं नये म्हणून जपत असत. व यामुळे मला कोणाच्याहि घरची चौकशी करण्यास धैर्यच होत नसे. गंगाधरपंतांच्या घरची गरीबी असावी हे तर मला दिसतच होते, तथापि ते देखील आपले दैन्य माझ्या दृष्टीस पडूं नये म्हणून प्रयत्न करीत. त्यांचे लग्न झाले असेल अशी कल्पनाच मला आली नाहीं. कारण कीं, ते अमेरिकेस आले तेव्हां अल्पवयी होते."

"तुम्हाला त्यांच्या घरची चौकशी न करण्याचें कारण एवढेच!"

"थोडेसे स्वतः संबंधीचेंहि होतें, तुम्हाला तें सांगायला मला कांहीं हरकत नाहीं, मला मुख्य हें हवें होते कीं माझ्या घरची चौकशी कोणी करूं नये. माझ्या घरच्या गोष्टी कोणी काढूं नयेत म्हणून मीच दुसऱ्यांस त्यांच्या घरची माहिती मुळींच विचारीत नसे. माझ्या मनांत असेंहि येत असें कीं, हिंदुस्थान सोडून जेथें कोणी जात किंवा कुल याची चौकशी करणार नाहीं अशा ठिकाणी जाऊन रहावें."

"तुम्हांला त्यांनीं घरच्या गोष्टी कांहींच सांगितल्या नाहींत तर मग त्यांचें व तुमचें बोलणे तरी इतकें कशावर होत असे!"

"त्यांनां नेहेमी असें वाटे की हिंदुस्थान देश वाईट स्थितींत आहे, याचें कारण परके राज्य होय. आणि हें परके राज्य कसें जाईल याच्या फिकिरींत ते होते."

"ब्रिटिशराज्याविरुद्ध जो कट अमेरिकेंत झाला त्या कटांत तुम्हीं होता काय?"

"मी मुळींच नव्हते, व त्या कटाची बातमी देखील गंगाधरपंतांनीं मला मुळींच सांगितली नाहीं. त्यांनां असें वाटे कीं, बंड करण्याचा जो कार्यक्रम त्यांना अंगीकारावा लागणार होता त्यांत स्त्रियांचा कांहीं एक भाग नसावा. त्या कटामुळे जर अनिष्ट दुःखपरंपरा उत्पन्न झाली तर त्या परिणामापासून स्त्रियांचें रक्षण व्हावें—व यासाठीं स्त्रियांचा त्या कार्यक्रमाशीं संबंधच नसावा—

**"जें नित्य सुंदर सुगंधि शिरीं धरावें**
**तें पुष्प काय चतुरें चरणें चुरावें"**

हें वाक्य ते पुष्कळदां आपल्याशीं पुटपुटत."

"मला त्यांच्या या वागणुकीचा अर्थ कळत नाहीं. त्यानी आपले लग्न झाले आहे ही गोष्ट तुमच्यापासून चोरून कां ठेवली?"

"मुद्दाम ठेवली असे मला वाटत नाहीं. तथापि त्यांनीं ही गोष्ट मला अगोदर सांगितली असती किंवा मी त्या संबंधाने अगोदर चौकशी केली असती तर किती तरी बरें झालें असतें, माझें चित्त त्यांच्याकडे जें एकसारखें ओढलें जात होतें त्याला प्रारंभींच अवरोध झाला असता—"

"तुम्हीं त्यांचे प्रेम आपल्यावर बसावें म्हणून प्रयत्न केला काय?"

"अर्थात केला, एवढेंच नव्हे तर त्यांनीं [illegible] माझ्याशीं दूरपणाने वागण्याचा उपक्रम चालू ठेवला

तरी तो उपक्रम चालू ठेवण्यास त्यांस बरेच प्रयत्न पडले असतील, आणि त्यांच्या मनाच्या गुहेमध्ये लपून बसून त्यांस तूं जर ओढीत नसतीस तर माझे प्रयत्न खास यशस्वी झाले असते. "

" तुम्ही काय प्रयत्न केले ? "

" प्रथमत: ते जेव्हां मजकडे भेटावयास आले ते शिकागो येथील तीन चार महाराष्ट्रीय मंडळीस मी जेवावयास बोलाविले त्या प्रसंगीं आले. त्या वेळेस मी अगदी मराठी जेवणाचा बेत केला होता, वरणभात, दोन भाज्या, शिकरण व पोळी असे जेवण दिले. त्यावेळेस ते जेवण त्यांस फार आवडले. जेवतांना गप्पा सुरू झाल्या त्यांत आपण स्वस्त खरेदी कशी करतो हे त्यांनी सांगितले व त्यावेळेस "सीअर्स रोबक आणि कपनी "च्या दुकानाचे त्यांनीं वर्णन केले आणि त्यावेळेस तें दुकान पहाण्याची मी इच्छा दर्शविली तेव्हां आम्ही दोघे प्रथमत: बरोबर गेलो; त्यानतर शिकागो येथल्या दुसऱ्या कांही गोष्टी पहाण्याची मी गोष्ट काढली आणि तुम्ही बरोबर याल काय म्हणून विचारले आणि त्याला त्यांनीं संमति दिली."

"तुम्हाला तरी निरनिराळ्या गोष्टी पहाण्यासाठी त्यांनां बरोबर घेण्याची काय जरूर पडली होती ? "

"माझ्या परिचयाच्या ज्या कांहीं अमेरिकन मुली होत्या त्या त्यांचे आवडते "छोकरे" असतील त्यांच्या बरोबर फिरावयास जात असत, कित्येक मुली आपण तरुणांमध्यें किती प्रिय आहोत हे मोठ्या अभिमानाने सांगत असत, किती तरुण त्यांच्याबरोबर फिरावयाला जायला उत्सुक असतात त्याचे वर्णन करीत, तेव्हां मलाहि असें वाटे कीं आपल्याबरोबर फिरावयास जायला तरुण कसे तयार आहेत याची जाणीव आपल्याला करून घ्यावी, व इतरांस करून द्यावी. अमेरिकेसारख्या देशांत ज्या मुलीस तरुण मंडळी फिरावयास घेऊन जातात, व जिच्या संगतीविषयीं उत्सुकता दाखवितात ती मुलगी भाग्यवान समजली जाते. तरुणांनी वगळल्यामुळे घरीं बसून रहाणारी, घरचा रिकामपणाचा वेळ खरे प्रेम मिळत नसल्यामुळे प्रेमाचीं वर्णनेच वाचून समाधान करून घेणारी, आणि शेवटी त्यासहि कंटाळून धार्मिक बुद्धीची व खिस्ताच्या जगावर असलेल्या प्रेमाविषयीं गोष्टी करणारी आणि आपल्या ताण बसलेल्या मज्जातंतूंस सिगारेट ओढून स्वास्थ्य देऊं पहाणारी मुलगी व्हावयाचे मला नको होते."

"तर मग तुम्ही सिगारेट केव्हां पासून ओढायला लागला ? "

"गंगाधरपंतानी प्रेमाच्या बाबतीत निराशा केल्यापासून. "

" तुम्हाला मी जिवंत आहे याचा फार राग आला असेल ! "

" खरोखरच आला होता, एवढेंच नव्हे तर मी अमेरिका सोडण्यापूर्वी गगाधरपतांना तुमच्या मृत्यूची तार यावी अशी मी देवापाशीं प्रार्थना करीत होते. "

" मी मरावें असे तुम्हास आतां वाटतें काय? "

"आतां तुझी ओळख झाली, आणि त्यामुळे तुम्हा दोघांची भेट व्हावी आणि तुम्ही सुखाने दिवस काढावेत असेच मला वाटते, तुझी प्रत्यक्ष ओळख होण्यापूर्वी तुमच्या मृत्यूचें जर मला दु:ख झाले असतेंच तर तें एवढयाकरतांच कीं त्यामुळे गंगाधरपंत दु:खी होतील म्हणून."

" त्याचे लग्न झाले आहे ही गोष्ट तुम्हांस कशी कळली ? "

" आम्ही दोघेहि फिरावयास बरोबर जात होतों. तरी ते माझ्याशीं आदरपूर्वक पण अत्यंत तुटक पणाने वागत—मला असे वाटे कीं, माझें सौंदर्य त्यांच्यावर परिणाम करीत नाहीं, मी अत्यंत मोहक कपडे करावे, गंगाधरपंतांच्या डोळ्यांत भरेल असा पोषाख करण्याकरतां पोषाखांतच तासतास

खर्च करावा पण त्यांनीं 'तुमचा पोषाख फार खुलतो' अशा तऱ्हेचेहि उद्गार कधी काढले नाहींत. मी इकडे अधिकाधिक सुदर पोषाख करावा, अधिकाधिक मधुर भाषणाची पराकाष्ठा करावी तरी त्यांच्या मनावर परिणाम होईना. तेव्हां माझी अशी खात्री झाली कीं, यांचे प्रेम दुसऱ्या कोणातरी स्त्रीवर जडलें आहे. त्यांची "लीला" नांवाची पूर्वीची एक विद्यार्थिनी न्यूयार्क येथें होती. मला असे वाटले की, गगाधरपंतांचे तिच्यावर प्रेम जडले असावे, तथापि त्याबरोबर मला असेंहि वाटे कीं, लीला दूर आहे, मी जवळ आहे; गंगाधरपंतांच्या हृदयांतून लीलेस काढून टाकून तें स्थान पटकाविण्याविषयी मी निकराचा प्रयत्न केला तर मला ते खात्रीने मिळेल. आणि एकदां मला विजय मिळाल्यासारखेहि झालें, पण तो विजयानद एक मिनिटभरहि टिकला नाही. दुसऱ्या मिनिटांत माझी स्थिति विजयगिरीच्या कड्यावरून खालीं ढकलल्यासारखी झाली!"

"ती कशी काय ?

"एकदां आम्ही दोघे बरोबर सिनेमाला गेलो होतो. उन्हाळ्याचे दिवस होते आणि सिनेमाहून आल्यानंतर जवळच्या एका पार्कमध्ये थोडा वेळ बसलों, आणि नतर लवकरच माझ्या बिऱ्हाडीं परत आलो. त्या सिनेमामध्ये एक हिदुस्थानी कथा वर्णन केली होती. तीवरून हिदुस्थानांतल्या नाटकांसंबंधानें बोलणें निघाले. त्यावेळेस मला कांहीं नाटकांतलीं पदें ठाऊक आहेत आणि तीं पदें मी पियानोवर वाजवूं शकतें हें गंगाधरपंतांनां कळले, तेव्हां त्यांनी ती वाजवावयास मला सांगितले. मी पियानो वाजवीत असे तेव्हां पुस्तक माझ्यासमोर असे आणि गंगाधरपंत माझ्या पाठीशीं असत व ते पुस्तकाचीं पाने उलटीत असत. या नेहमींच्या संवयीमुळें यावेळीं देखील ते माझ्या पाठीशीं होते. मी एखादें पद वाजवावे आणि त्यांनीं चाल ओळखून म्हणावयास लागावें असे चाललें होतें. आम्ही त्यावेळेस 'पारलर' मध्ये होतो. आणि त्यावेळेस पारलरमध्ये दुसरें कोणीहि नव्हते, अशा वेळेस मी—

( पद—राग कालंगडा, ताल धुमाळी )

**हा उत्सुक तव संगमा मग कां भीसी ॥**
**झिडकारिन तुजला असें मनीं कां आणिसी॥ध्रु०॥**
**दुर्लभ ती लक्ष्मी जना। जन का तिजसी॥चाल॥**
**आतां संशय न धरी मनीं। या परिजनीं ॥**
**विपरीत बघसी ॥ १ ॥ ॥ हा उत्सुक० ॥**

हे शाकुंतलातील पद वाजविले व ते त्यांनीं चांगल्या गोड आवाजांत म्हटले याच वेळेस कर्मधर्मसंयोगाने इलेक्ट्रिसिटी " फेल " होऊन एक मिनिटभर काळोख पडला. पदहि त्याचवेळेस संपलें. तेव्हां पद संपताक्षणीच गंगाधरपतांनी माझे चुंबन घेतले."

" तुमच्या मनांत मला हेच सांगावयाचे आहे काय? मला या गोष्टी ऐकायला नको आहेत." रुक्मिणी म्हणाली. रुक्मिणीच्या बोलण्याकडे लक्ष न देता मत्तमयूरीने आपलें निवेदन पुढे चालविले.

"गगाधरपतांनी माझे चुंबन घेतल्यामुळे प्रथम मला असें वाटले कीं, ज्या वेळेची मी वाट पहात होतें ती वेळ ठेपली. मी गंगाधरपंतांचें हृदय जिकले—पुढे गंगाधरपंतांच्या तोंडून प्रेमाचे शब्द ऐकूं येतील अशा अपेक्षेने माझे कान ताठरले होते, आणि ते चुंबन त्यांनी घेतलें तेव्हां विद्युल्लतेचा धक्का मिळून माझ्या शरीरांतील सर्व ततू विलक्षण स्फुरण पावले.तथापि अत्यानंदामुळे म्हणा किवा अत्यंत आश्चर्यामुळें म्हणा माझ्या शरीरास बधिरता उत्पन्न झाली."

" तर मग त्यांनी प्रेमाचे शब्द उच्चारले नाहींत काय? "

" नाहींत, 'मयुरी, मला क्षमा कर, मी तुझ्याशी इतकी " लिबर्टी घ्यावयास " म्हणजे स्वैर आचरण करावयास नको होतें " असें ते म्हणाले."

" म्हणजे लाथ मारून क्षमा मागण्यासारखेंच आहे कीं, नाहीं !" रुक्मिणी म्हणाली.

"असेल कदाचित्, पण मी त्या दृष्टीनें त्यांच्या वर्तनाकडे पाहिले नाहीं आणि पहात नाहीं. मी त्यांच्यावर प्रेम करीत असें, आणि त्यांनीं माझ्याशी थोडीशी " लिबर्टी" घ्यावी हें मला पाहिजे होतें, योग्यायोग्यतेच्या कल्पनांनीं गंगाधरपंत फारच बद्ध आहेत त्यांनी अधिक सैल झाले पाहिजे असे मला वाटे."

" मग त्यांनीं तुमची क्षमा मागितली त्यामुळें तुमचा हिरमोड झाला? "

"मुळींच नाहीं."

"कां?"

"त्यांनी माझे चुंबनहि घ्यावे, आणि त्याबद्दल माझी क्षमाहि मागावी हेंच मला पाहिजे होते; अमेरिकन किंवा इंग्रज तरुण जेव्हां प्रेममय होऊन जातो तेव्हां त्यास असे वाटू लागते कीं आपण जिच्यावर प्रेम करतों ती तरुणी उच्च कोटींतील आहे; आपण खरोखर तिच्या योग्यतेचे नाही, तथापि तिनें आपला स्वीकार करावा व आपणांस कृतार्थ करावे अशी भाषा तो बोलू लागतो. तो तरुणीकडे आकर्षिला जातो व आपण आकर्षिले गेलो आहोंत हें तोंडाने कळविण्यापेक्षां कृतीने कळविणे त्यास सोपें वाटते, आणि स्त्रीला देखील कृतीनेच उत्तर देणे सोपें वाटतें. कधीं कधी प्रेमदर्शक कृतीच्या योगाने स्त्रीला राग आला असेल अशा कल्पनेनें तो प्रेमदर्शक कृती करून पुन्हां क्षमा मागावयास लागतो."

" मग तुम्ही काय केले? "

" थोडक्या वेळांत पुन्हां दिवे लागले तेव्हां त्यांनां मी असे दाखविले कीं, मी आनंदयुक्त स्मित करून स्तब्ध राहिली आहें व या स्मितयुक्त स्तब्धतेनें असें दर्शविलें कीं, तें चुंबन मला अप्रिय मुळींच झाले नाहीं—पण माझे आनंदयुक्त स्मित पाहून अधिकाधिक चुंबनें घेण्याऐवजीं गंगाधरपंत एकदम दूरच्या खुर्चीवर जाऊन बसले आणि म्हणाले, मयूरी, मी चूकच केली, मी तुझा अपराधच केला आहे. मला तुझे चुंबन घ्यावयाचा अधिकार नाहीं, माझें लग्न झालेलें आहे, आणि माझे माझ्या बायकोवर प्रेमहि आहे. तुझ्यावर प्रेम करण्याचा मला अधिकारच नाहीं. माझें मन दुर्बल झालें असतां मी तुझें चुंबन घेतलें. "

"माझें माझ्या बायकोवर प्रेम आहे असें ते म्हणाले ! तुम्ही कांहीं तरी बोलतां, मला ते खरं वाटत नाहीं."

"खरे वाटत नसेल तर नसो—मी गंगाधरपंतांस असत्यवादी कधीहि म्हणणार नाहीं. मला त्यांचे शब्द अत्यंत कटु वाटले, व जी दूर असलेली अदृश्य स्त्री माझा प्रियकर मला लाभू देत नाही तिचा रागहि आला, पण रागाची भावना तीव्र नव्हती. गंगाधरपंतांनीं, आपले लग्न झाले आहे हे अगोदर कां कळविले नाही असा विचार मनांत आला पण तोहि प्रमुख नव्हता. मला माझे आयुष्य निरर्थक दिसूं लागले. घरी पैसा आहे पण त्या पैशाचा काय उपयोग? . . . . आणि माझें लग्न होईल आणि आम्ही सुखाने राहूं असे त्यावेळेस जे मी कल्पनेचे कोट बांधले होते ते सर्व एकदम ढांसळून पडले. शिक्षण घेऊन तरी काय करावयाचे; पैसाच मिळवायचाना? पैसा कमावून तरी काय करावयाचा, आपल्या प्रियजनाशिवाय आयुष्य व्यर्थ होय, अशा तऱ्हेच्या विचारांनीं मला असें वाटलें कीं, आपल्याला आतां आयुष्यांत सुख लागणे शक्य नाहीं मी स्फुंदत स्फुंदत रडूं लागलें तेव्हां गंगाधरपंतांचे हृदय कळवळले. त्यांनी मला म्हटले, मयूरी, माझ्यासंबधाची खरी हकीकत मी तुला सांगितली नाही याबद्दल मला क्षमा कर. तुला हेंहि सांगतों कीं, जरी मी अविवाहित असतो तरी देखील मी तुझ्याशी लग्न केलें नसतें. माझ्या नादाला लागून कोणत्याहि स्त्रीचें कल्याण होणार नाहीं. माझे भवितव्य ठरलेलें आहे. जोंपर्यंत

हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य आहे तोंपर्यंत देशाच्या स्वातंत्र्यासाठीं मला त्या राज्याच्याविरुद्ध कांहीं तरी खटपट चालूच ठेवावी लागणार. माझा आयुष्यक्रम आंखला गेला आहे. माझें भवितव्य ठरलेलेच आहे. आतांपर्यंत माझे आयुष्य कष्टमय होते आणि पुढे तें तसेच रहाणार, माझे रुक्मिणीवर प्रेम आहे. तथापि आज जर रुक्मिणी विवाहबंधापासून मोकळी होऊं इच्छील तर मी त्यासहि मोठ्या आनंदाने संमति देईन. राज्यक्रांतिकारक प्रयत्नाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि रीतीनें माझे आयुष्य खर्च झाले तर मी माझे आयुष्य फुकट गेले असे समजेन. माझा मार्ग दुःखाचा आहे आणि अनेक लोकांच्या दृष्टीनें तो मूर्खपणाचा आहे. माझे आयुष्य दुःखांत जाणार आहे. त्याबरोबर रुक्मिणीचेंहि का जावें असें वारंवार माझ्या मनांत येतें." या गंगाधरपंतांच्या बोलण्याने माझे समाधान झाले नाहीं. मी त्यास म्हटले "तुमच्या आयुष्यक्रमाशीं सहानुभूति बाळगणारी, तुमच्यावर जो दुःखाचा प्रसंग येईल तोहि आनंदानें पत्करणारी, तुमच्या आयुष्याच्या ध्येयांत स्वतःचें आयुष्य विलीन व्हावें म्हणून महत्त्वाकांक्षा धरणारी जर कोणी स्त्री असेल तर तुमचे आयुष्य सुखाने जाणार नाहीं काय ? तेव्हां मला त्यांनी उत्तर दिलें "मयूरी, कोणत्याहि स्त्रीच्या आयुष्याचा, माझ्या कार्याशी सहकारिता झाल्यामुळे नाश होऊं नये असे मला वाटते–रुक्मिणीची माझ्या आयुष्यक्रमांत सहकारिता होईल असे वाटत नाहीं. रुक्मिणी सुंदर आहे, आणि फार चांगली मुलगी आहे, आणि यासाठीच जर तिचे लग्न दुसऱ्या कोणाबरोबर झाले असते–" या त्यांच्या बोलण्याचा फायदा घेऊन मीहि उत्तर दिलें कीं "होय, मला तसेच वाटतें." तेव्हां त्यानी मला पुन्हां सांगितलें की "मयूरी, तूं माझ्यावर प्रेम करूं नको. मी कोणाऱ्याच स्त्रीच्या प्रेमास लायख नाहीं. राष्ट्रास स्वातंत्र्य देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे सर्व परीनें संन्यासवृत्ति ग्रहण केली पाहिजे. तूं मला हृदयांतून काढून टाक. तूं रघूवर प्रेम कां करीत नाहींस. रघू तुला पत्रे लिहितो आणि तूं त्याला उत्तरहि देत नाहींस हे मला ठाऊक आहे, आणि–"

"रघू म्हणजे कोण ?"

"न्यूयार्कमध्यें कामत या आडनांवाचे एक व्यापारी आहेत त्यांचा मुलगा–ज्या लीलेची पत्रे गंगाधरपंतास येत असत त्या लीलेचा भाऊ–मी अमेरिकेस गेलें तेव्हां कांहीं दिवस न्यूयार्क येथे रा. कामत यांच्या घरीं रहात होते. आणि त्यावेळेस त्यांचा थेरला मुलगा रघु हा न्यूयार्क शहर दाखविण्यासाठीं मला इकडे तिकडे घेऊन जात होता–पण त्याचा मला कांहीं कारणाने राग आला आणि नंतर दोन चार दिवसांनींच मी न्यूयार्क सोडून दुसऱ्या गांवीं गेले."

"तुम्हाला रघु कामत याजवर रागावण्याचे काय कारण ?"

"काय कारण आहे हे नक्की सांगतां येत नाहीं, कां कीं, त्याने ज्या "लिबर्टीज" माझ्यापाशी घेतल्या तशीच 'लिबर्टी' दुसऱ्यांनी घेतली पण मी अमेरिकेस नवीनच गेलें होतें तेव्हां त्यानें माझे चुंबन घ्यावें हे मला आवडलें नाहीं. त्यांतल्या त्यांत त्यानें अशी लबाडी केली की, मला तो "कोने आयलंड" दाखवावयाला घेऊन गेला. त्या ठिकाणी पुष्कळच तरुण गृहस्थ तरुण पोरींना बरोबर घेऊन मजा मारायला येतात,–कोनें आयलंड म्हणजे फारच मजेदार ठिकाण आहे. तेथे अनेक सिनेमा, फराळाची दुकानें, कृत्रिम रेल्वे, आणि त्या रेल्वेस शोभा आणण्यासाठी कृत्रिम बोगदे या सर्व गोष्टी आहेत. आम्ही अशा कृत्रिम रेल्वेमध्यें बसलों आणि जेव्हां ती रेल्वे काळोखी बोगद्यांतून जाऊं लागली तेव्हां चोहोंकडे चुंबनाचे आवाज ऐकूं येऊं लागले. या वेळेस रघूने जें वर्तन केलें, त्यावरून त्या लहानशा

आगगाडीतून नेण्याचे कारण मला समजले. रघूनें त्याच प्रसंगी दुसऱ्याहि गोष्टी केल्या. कोने बेटांत फोटोग्राफरचीं दुकानें अनेक आहेत. त्या दुकानीं रात्रींची विजेची रोषनाई केलेली असते. त्यांपैकीं एका दुकानांत आम्ही आपला फोटो काढून घेतला;तेव्हां तो फोटो निघायच्या ऐन वेळेस त्याने माझ्या कमरेला विळखा घातला. मी त्यामुळे त्याच्यावर रागावलें, पण तो हसूं लागला. तूं हिंदुस्थानी आहेस, अमेरिकन रीत अजून तुझ्या आगवळणी पडावयाची आहे इत्यादि गोष्टी तो उलट मलाच सांगावयास लागला."

"तुम्हाला त्याचा राग फार आला असेल."

"कां येणार नाहीं, तसला फोटो कोणाच्या दृष्टीस पडला तर."

"तुम्हीं रघूला तसे नाहींका म्हटले."

"मी म्हटलें आणि मी तसे म्हटल्याबद्दल दुसऱ्या दिवशीं तो फोटो आपल्या बहिणीला व आईला दाखवून माझे शब्दहि पुन्हां उच्चारून उलट माझीच चेष्टा करायला लागला."

"तुमच्या चेष्टेचे काय कारण ! तुमचे रागावणे अगदी बरोबर होते."

"तो असे म्हणायला लागला कीं, "कमरेला विळखे उजेडांत घालण्याला आणि त्याचा फोटो काढून घ्यायला हरकत कां असावी. तसल्या गोष्टी जर आपण काळोखांत करूं तर त्याची चोरी.....मी तुमच्या कमरेला काळोखांत विळखे घातले आहेत काय ?" असा त्याने पकडीचा प्रश्न केला. तेव्हां "नाहीं वाटतं घातले" असें मी उत्तर दिले. तेव्हां त्या उत्तराने मुळींच अडून न जातां, "तर मग तरुणाला उजेडांतच कमरेला विळखे घालूं देण्यास किंवा त्याचा फोटो काढून घेऊं देण्यास हरकत आहे!! काळोखांत विळखे घालायला हरकत नाही !!" असे त्यानें स्मितयुक्त उद्गार काढले."

"तुमचे आणि रघूचे भांडण झाले तें कामंमचेच काय?"

"त्याला आतां यापुढें काय स्वरूप येईल ते येवो—मी प्रथमतः तर त्याची संगत अगदी सोडून दिली आणि एक दोन दिवसांनी दुसऱ्या गांवी गेलें, तेथें त्याचीं पत्रें येत असत. त्यांत "तुला राग आला असल्यास मी तुझी माफी मागतों" असे त लिही आणि तरी देखील मला, तूं वेडी मुलगी आहेस तू असल्या गोष्टीबद्दल राग मानू नये, मी तुझ्याबरोबर जसा वागलों, तसाच अमेरिकन मुलीबरोबर वागलो इत्यादि पत्रे लिही आणि गंगाधरपंतांशी झालेली गोष्ट झाल्यानंतर एक दिवस तो शिकागो युनिव्हर्सिटी पहाण्याच्या निमित्तानें शिकागोलाहि आला."

"ते अमेरिकेंत जाण्यापूर्वीची घरची हकीगत त्यानी तुम्हाला कधी सांगितली होती काय?"

"गंगाधरपंत घरच्या गोष्टी फारशा बोलत नसत, आणि आम्ही जरी एकत्र फिरावयास गेलों तरी त्यांच्या घरच्या स्थितीसबंधाने चौकशी करण्याचें धैर्य मला झाले नाही. गंगाधरपंत जरी फिरायला जाण्यासाठीं मला नेण्यासाठी मजकडे येत असत आणि मला आपल्या बिऱ्हाडीं पोंचवून मग ते घरी एकटे जात, तरी त्यांनी आपली खोली पहावयास मला बोलवले नाहीं, व याचें कारण त्यांची गरीबी होय. आपली गरीबी किंबहुना द्रव्यहीनता मजपासून ते लपवून ठेवण्यासंबधाने फार तत्पर असत. आम्ही बरोबर फिरावयाला गेलो तेव्हां अनेक प्रसंगी किंबहुना वारंवार आईसक्रीम व सोडा घेण्यासाठीं "ड्रग-स्टोअर" मध्यें जात होतो पण प्रत्येक प्रसंगी आईसक्रीम, सोडा यासाठी त्यांनीच खर्च केला आहे. ट्रामचें तिकीट त्यांनींच काढावें, येणेंप्रमाणे प्रत्येक फिरावयास जाण्याच्या प्रसंगीं कमींत कमी दहा आण्याच्या खर्चांत मी त्यांस घालिता असे. त्यांनां हा खर्च देखील भासत असेल आणि माझ्यासाठी हा खर्च कमींत कमी २५० रुपये झाला असला पाहिजे." इतके बोलणे झाल्यावर

रुक्मिणी एकदम म्हणाली " तुम्ही या गोष्टी सांगितल्या त्या ऐकून मला राग येतो, तुमच्यासाठी त्यांनीं २५० रुपये खर्च केला व मला दरमहा पै देखील पाठविली नाही एवढेच तर काय पण मला पत्र देखील आतांपर्यंत एकच पाठविले. एकदां १००० रु. पाठविले. मधून मधून खुशाल आहे एवढे सांगणारी व पत्ता न देणारी चित्रांचीं पोस्टकार्डें येत असत तेवढीच. बाई, तुम्ही मला या गोष्टी सांगू नका."

"छे! छे! रुक्मिणी, तूं गंगाधरपंतांवर रागावूं नकोस, मी त्यांच्यासारखा सद्वर्तनी आणि उच्च भावनांचा मनुष्य पहिला नाही–"

"तुमचे त्यांच्यावर प्रेम जडले आहे म्हणून तुम्ही कांही तरी बोलतां झालें."

"तर मग तुला गंगाधरपंत नको आहेत काय?"

"नको असे कसे होईल, त्यांनीं आपले वर्तन सुधारावे एवढेच माझे म्हणणे असणार!"

"वर्तन सुधारावे म्हणतेस तर वाईट वर्तन तरी कोणते आहे."

"त्यांनां माझी आठवण नाही, मला त्यांनीं पत्रे पाठविली ती केवळ निमित्तासाठी. त्यांनी मोहाशी निकराचा झगडा केला असेल, पण तुमच्याशी वागतांनां चुंबनापर्यंत तर मजल ठेपलीच. पुढे ते कसे वागतील कोण जाणे!!"

"मी स्वदेशी परत येतेवेळेस मला गंगाधरपंत भेटावयास आले आणि त्यांनी तुम्हाला कळविण्यासाठी एक निरोप मजजवळ सांगितला."

"तो काय?"

"गंगाधरपंतांनीं प्रथम तुम्हांला एवढेंच सांगावयास सांगितलें कीं, तुमची ज्या दिवशीं त्यांनां आठवण झाली नाहीं असा एकहि दिवस गेला नाहीं. तुम्ही त्यांनां तिकडे जाण्यांत जी मदत केली ती ते विसरले नाहीत."

"मीं त्यांनां काय मदत केली?"

"ते तुमचें तुम्हाला ठाऊक. मला चौकशी करण्याचा अधिकार काय?"

" ते तुम्हाला ठाऊक नाहीं!"

" मुळीच नाहीं."

" मी त्यांनां भाडयासाठीं आपले दागिने विकावयास दिले होते."

" असं काय ?"

" होय, पण मला एक दिवसहि ते विसरले नाहींत हे त्यांचे म्हणणे तुम्हाला खरे वाटते काय?"

" अगदी खरें वाटतें. तुमची रोज आठवण होत असल्याशिवाय त्यांचे १००० रुपये शिल्लक पडलेच नसते!"

"बरं, त्यांचा आणखी निरोप तरी काय ?"

"गंगाधरपंतांचा तुम्हाला निरोप हाच कीं, तुम्ही होता होईतो लवकर अमेरिकेत जावे.तुम्हाला त्यांनीं विशेष मजकुराची पत्रे काहीच पाठविली नाहींत याचे मुख्य कारण हे कीं, ज्याअर्थी त्यांस इंग्रजी सत्तेविरुद्ध बंड करण्यासाठीं मोठा कट उभारण्याची खटपट करावयाची होती व ज्याअर्थी पुढे मागे तो कट इंग्रज सरकारच्या नजरेस येईल अशी त्यांनां भीति वाटत होती त्या अर्थीं त्या कटाशीं तुमचा कोणत्याहि कारणाने संबंध नसावा अशी त्याची इच्छा होती.एवढेच नव्हे तर त्यांच्या खुशाली पलीकडे तुम्हास माहिती नसावी, त्याच्या कार्यासंबंधाने कांहींहि ज्ञान नसावे. त्यांस असेहि वाटें कीं इंग्रज सरकार इतकें दुष्ट आहे कीं तें स्त्रियांचे हवे तसे हाल करील. तर यामुळें जोंपर्यंत तुम्ही ब्रिटिश लोकांच्या तावडींत आहांत तोपर्यंत या कटाचे ज्ञानहि तुम्हांस नसावे अशी त्यांची इच्छा होती. तुम्हांस जाणारें व तुमच्याविषयीं संशय उत्पन्न करणारें एक चिटोरें देखील पोलिसास किंवा पत्रे चोरणाऱ्या खात्यास सांपडूं नये या हेतूनें त्यांनीं तुम्हांस विशेष मजकुराचे पत्रच पाठविले नाही. त्यांनां सध्यां तुमच्याकडची स्थिात काय आहे ती देखील ठाऊक नाहीं.

## प्रकरण ५ वें.

## रुक्मिणीचें अंतःकरण.

रुक्मिणीचे अंतःकरण नवऱ्याविषयी कसे होतें असे विचारले तर ते निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या प्रकारचे होतें असें उत्तर द्यावे लागेल. प्रथमतः नवऱ्यास पळून जाण्यास सहायक रुक्मिणी असल्यामुळे तिला आपण आपल्या नवऱ्याच्या विश्वासांतील आणि मसलतीतील व्यक्ति आहो व आपण त्याच्या महत्वाकांक्षेच्या मार्गांत मदत करणाऱ्या आहोंत असे वाटे; व तिचें मन त्यामुळें स्वाभिमानयुक्त असे. नवऱ्यास पळून जाण्यामध्यें मदत केली म्हणून तिच्यावर जेव्हां सासऱ्याचा राग झाला, त्यावेळेस तो राग सोसतांनां सत्कार्यासाठीं दुःख सोसणारी व्यक्ति आपण आहो म्हणून दुःख सोसतांनां देखील तिच्या मनास आत्मगौरवाची भावना होत होती. नवऱ्यास मदत करण्याबद्दल त्रास सोसण्याची संधि म्हणजे आपली कांहीं अपूर्व सत्त्वपरिक्षा होत आहे, आणि या परीक्षेत आपण उत्तीर्ण झाले पाहिजे असेंच तिला वाटे. आपण नवऱ्यासाठीं काय दुःख सोसले याबद्दल नवऱ्यास माहिती मिळून जेव्हां नवरा आपली पाठ थोपटील तेव्हां आपल्या सर्व दुःखाचें परिमार्जन होणारच आहे, त्यावेळेस आपणांस जें सुख होईल तें आपणापासून नेण्यास कोण समर्थ आहे असें तिला वाटे. पण पुढें ही भावना नवऱ्याच्या मौनामुळे कमी कमी होऊं लागली होती. जेव्हां वाईला मिशनची नोकरी मिळण्यापूर्वी तिने दुःखाचे दिवस काढले तेव्हां नवऱ्याकडून धीराचे आणि आश्वासनाचे निरोप येण्याची आवश्यकता होती पण त्यावेळेस तसले निरोप कांहीं आले नाहींत. म्हणून तिला दुःख होई, व नवऱ्याचा रागहि येई; परंतु आपणास नवऱ्यानें जेव्हां १००० रुपये आणि पत्र पाठविले तेव्हां नवरा आपणास विसरला नाहीं, आणि तो आपण तेथे जावें अशी अपेक्षा करीत आहे, असे पाहून आपण नवऱ्याविषयी दुष्ट शंका मनांत विनाकारण येऊं दिल्या, असें तिला वाटे आणि आपल्या कुशंकेखोर मनाचाच खरोखर तिला राग आला.

मत्तमयूरीच्या तोंडून जेव्हां आपल्या नवऱ्याची स्तुति ऐकिली तेव्हां रुक्मिणीस बरें तर वाटलेंच पण तिच्या मनावर जे कांहीं पूर्वीचे संस्कार झाले होते त्यांमुळें दुःखहि झाले. आपण नवऱ्याच्या मसलतींत नेहमी असणारी व्यक्ति होतों व आतां नवरा, आपल्या काय योजना आहेत याविषयी आपणास विश्वासांत देखील घेत नाहीं, मी स्त्री आणि त्यामुळे मी दुर्बलतेचा ठेवा आहे. असे नवरा मला समजतो, आणि त्याच्या भवितव्यामध्ये मला स्थान न देतां तो मला केवळ एक नाजूक वस्तु म्हणून दूर राखीत आहे, जणूं काय माझा नवरा राजद्रोहाबद्दल फांशी गेला आणि माझ्या केसालाहि धक्का लागला नाहीं अशी स्थिति असणे ही गोष्ट मोठी इष्ट आहे! नवरा फांशीं गेला आणि बायको मात्र बिनधोक जिवंत राहिली, तर त्या बायकोची त्याच्या योगानें कीर्ति वाढणार आहे काय? अर्थात नाही; तर मग माझ्याविषयीं इतकी जपणुकीची वृत्ति कां असावी. बायको म्हणजे पुरुषानें जिचे केवळ पालन करावे अशी व्यक्ति आहे की, ती सहधर्मचारिणी आहे? राज्यक्रांति करणें, एक राजा काढून त्याच्या जागी दुसरा राजा आणणे यासारखीं कामें बायकांचीं नसतील; पण या कार्यांत त्यांची मदत कांहींच कां नसावी? इत्यादि विचार मनांत येऊन आपल्या नवऱ्याने आपणांस कांचेच्या घरांतील फळझाडासारखे वागवावें हें तर तिला मुळींच पसंत नव्हते, आणि आपल्या नवऱ्याला तरी कां पसंत असावें असा ती आपल्या मनांत प्रश्न करी. राणी लक्ष्मीबाईची स्तुति नवऱ्यानें आपल्यासमक्ष अनेकदां केली आहे किंवा नाहीं, व शत्रूच्या हातीं सांपडण्यापेक्षां देहत्याग

करण्याच्या तयारीबद्दल तिची त्यांनीं फार वाहवा केली की नाही. असे असतां त्यांनीं असल्या कार्यामध्ये माझ्यावर कांहीं एक येऊं नये अशी भावना कां धरावी.

रुक्मिणीस आतां जे दुःख उत्पन्न होऊं लागलें तें आपण वांईस कष्टानें आयुष्य काढीत असतां नवऱ्याने आपल्या सुखाकडे जें दुर्लक्ष दाखविले त्यामुळे नव्हते. ते दुःख ती अजीबात विसरून गेली. तिला दुःख जें वाटलें तें एवढ्याकरतां कीं जो कष्टमय आयुष्यक्रम नवऱ्याने पत्करला त्या कष्टमय आयुष्यास भागीदार होण्यास आपण लायख नाहीं असे आपला नवरा समजतो. आपल्याविषयी आपल्या नवऱ्याचे मत वाईट आहे. त्यास असे वाटतें की, ज्या साहसास मी प्रवृत्त झालों त्या साहसाचे महत्त्व समजून त्यांत सहकारिता करण्याची माझ्या बायकोची लायखी नाहीं. आणि ही लायखी तरी कां नाहीं, तर देशाचे दुःख हे आपले दुःख समजून जी साहसाची व त्यागाची तयारी करावयाची ती करण्यास आपले मन तयार झाले नाहीं एवढेंच नव्हे तर देशाचे दुःख ते आपले दुःख असे समजण्याइतपत मला शिक्षणहि नाहीं म्हणून. अर्थात् माझ्यांतील व्यंगामुळेच नवरा मला आपल्या कार्यक्षेत्रापासून जितके दूर ठेवतां येईल तितकें ठेवीत आहे. म्हणून हे जे माझें व्यंग आहे ते मला काढून टाकले पाहिजे.

रुक्मिणीच्या मनांत नवऱ्याविषयीं ज्या अनेक शंका-कुशंका उत्पन्न होत त्यांपैकीं एक अशी कीं, मयूरी सांगते तितपतच खरोखर तिचे आणि आपल्या नवऱ्याचे संबंध राहिले कीं ते बरेच पुढें गेले असून आपणापासून ती कांहीं चोरून ठेवीत आहे. मी माझ्या बायकोवर प्रेम करतो असें नवऱ्यानें मयूरीस सांगितलें, आणि माझ्या मदतीचीहि गोष्ट सांगितली त्यावरून माझ्याविषयीं दोघांचें बोलणें झालें होतें खास. आणि मी पाठीमागें आहे या गोष्टीची नवऱ्यानें आणि मयूरीनें जाणीव ठेवली यांत मला समाधान आहे. मयूरी देखील जरी थट्टाविनोद करणारी स्त्री दिसली तरी ती अनीतिमान स्त्री असावी असे वाटत नाहीं. दुसऱ्या बाईचा नवरा आपण घेऊन बसावें आणि त्या बाईला ओरडत बसवावें अशी देखील तिची वृत्ति नाहीं.

रुक्मिणीच्या मनांत दुसऱ्या अनेक गोष्टी येत. आपल्या नवऱ्याच्या आणि मयूरीच्या अनेक गोष्टी होत, आपल्या नवऱ्याने आपल्याला अनेक चावट चावट अशा फार गोष्टी सांगितल्या होत्या, आपण जितक्या वेळा नवऱ्यापाशीं बोलत बसलों असूं तितक्या वेळ मयूरीहि बोलत बसली आहे. आणि त्यांतल्यात्यांत, भोवतालीं मराठी समजणारे कोणी नसल्याने त्यांनां आपले बोलणें दुसरें कोणी ऐकेल अशी भीति नव्हतीहि आणि आपल्याला तर आपण जे बोलतों तें दुसऱ्या कोणाला ऐकूं जाईल, किंबहुना दाराशीं कान लावून कोणी ऐकत असेल अशी भीति असे, अर्थात त्यांनां मयूरीशीं मोकळेपणानें बोलण्यास माझ्याशीं बोलतांनां मिळाली त्यापेक्षां अधिक संधि होती. तर नवरा तिच्याशीं अनेक चावट गोष्टी बोलला असेल काय आणि त्याचा परिणाम पुढे वाईट झाला असेल काय? या प्रश्नाचें तिने पुढे आपल्या मनास असे उत्तर दिले की, आपल्यापाशी बोलायला फारशा गोष्टी नवऱ्याला सुचतच नसतील. कां तर आपले शिक्षणच झाले नाहीं. त्यांनां केवळ चावट गोष्टी बोलण्याची आवड असेल असे नाहीं. नवरा बायकोपाशी जेवढें चावट बोलेल तेवढें दुसऱ्या स्त्रीशीं-त्यांतल्या त्यांत सुशिक्षित स्त्रीशी-बोलेल अशी कल्पना कां करावी?

माझी आणि त्यांची पहिल्याप्रथम ओळख ज्या दिवशीं झाली तेव्हां त्यांच्या खोलींत जातांनां आपण जणूं काय वाघाच्या जबड्यांत जात आहो असे कसें बरें वाटलें होतें, आणि माझ्या

अंगाला दरदरून घाम कसा सुटला होता; मी खोलीत आले तेव्हां मला असे वाटले की आपण त्यांच्या इच्छेस येईल असें वर्तन ठेवले नाही तर आपणांस मार बसेल, आणि त्यामुळे नवऱ्याशीं मी पण किती बरे भीतीने वागत होते, पण ती भीति त्यांचे स्मितयुक्त मुख पाहून कशी बरें दूर झाली, नवरा ही बळीने संतुष्ट करावयाची क्रूर देवता असें जें आपण समजत होतो, तें किती चुकीचें आहे हें आपणास त्यांच्या पहिल्या दिवशींच्या स्मितमुखसत्कारानें कसें बरे कळून आलें, आणि पुढे कांही दिवसानीं परिचय चांगलाच वाढून त्यांच्या खोलींत जाण्याची वेळ केव्हां येते इकडे लक्ष कसे बरे वेधू लागले, त्यावेळेस आपणाशीं सहानुभूति बाळगणारा, आपल्यावर प्रेम करणारा आणि आपणांस दुःखाच्या प्रसगी सांत्वन करणारा आणि धीर देणारा असा नवरा लाभला आहे, अशी कशी खात्री झाली आणि कांहीं दिवसांनी सासूसासऱ्यांची भीति देखील मनांतून अजीबात कशी गेली, त्यांचे रागावणें दुःख उत्पन्न करीनासे कसे झाले, नवरा आपला आहे अशी खात्री असल्यानंतर सासूसासऱ्यांच्या शिव्याचा राग येण्याच्या ऐवजीं त्यांच्या शक्तिहीन रागाबद्दल उलट त्यांची कीव कशी वाटूं लागली, ही वडील मंडळी, यांची समजूत कशी तरी केली पाहिजे असे त्यांस वाटूं लागले होतें, त्या कल्पनेशी आपलीहि सहानुभूति, विनाकारण माझ्यावर ते रागावले असतां तें रागावणे सहन करून मी कशी दाखविली, वडील माणसांनीं—त्यांचीच चुकी असतां--माझ्याविरुद्ध तक्रार केलेली पाहून जरी दिवसां त्यांच्या देखत पतिराज मजवर रागावले तरी रात्री 'मी तुझ्यावर विनाकारण रागावलो' असें कबूल कसें करीत अशा अनेक गोष्टींची तिला आठवण झाली. आपल्या पतीचे आपल्यावर प्रेम होतें. ते गृहसौख्याचे आणि शांततेच्या आयुष्यक्रमाचे भोक्ते होते. आपले पतिराज अर्थात केवळ राज्यक्रांतीसाठींच अमेरिकेला गेले असतील असे वाटत नाही. कारण ते गेले तेव्हां त्यांचा तसा बेत असता तर अमेरिकेहून परत आल्यानतर आपण असे राहू, तशा गोष्टी करूं इत्यादि गोष्टीची चर्चा त्यांनीं कधींच केली नसती.

ते हिंदुस्थान सोडून जाईपर्यंत आपला एकमेकांचा विश्वास एकमेकांवर वाढतच होता. ते हिंदुस्थान सोडून जाण्याचा जेव्हां विचार करूं लागले तेव्हां त्यांच्या मनांत राज्यक्रांतीच्या कल्पना होत्या काय? खचित नव्हत्या किंवा राज्यक्रातीच्या कल्पना मनांत असूनहि आणि त्या दडवून ठेवून उपयुक्त उद्योग, स्वतंत्र धंदा किंवा मोठ्या पगाराची नोकरी प्राप्त होईल असे शिक्षण मिळविण्यास जाण्याच्याच गोष्टी ते बोलत होते! ते सर्व नाटक होते काय? मोठ्या पगाराची नोकरी मिळविण्यास लायख करणारे शिक्षण मिळविण्याचा हेतु त्यांनी मला सांगितला तो मजकडून दागिने मिळविण्यासाठीच तर नसेलना! मनांत दुसरे कांही तरी असून उपयुक्त धंद्याचें शिक्षण मिळविण्याच्या गोष्टी केवळ दागिने मिळविण्याच्या हेतूने केल्या असतील असे म्हणवत नाहीं. नाहीं तरी मनुष्याचा नेम काय सांगावा! राजकीय हेतूसाठी हव्या त्या लबाड्या कराव्यात असे अलीकडे पुण्याचे पुष्कळ देशाभिमानी तत्त्ववेत्ते म्हणत नाहीत काय? आणि हें गनीमी काव्याचे तत्त्व "महाराष्ट्रीय" आहे, असे म्हणून लबाडीचा गौरव करीत नाहींत काय? ज्या कामांत प्राप्ति होणार नाहीं, आणि ज्या कामांत मान मात्र फांसांत लटकण्याचा संभव आहे त्या कामांत मी मदत करण्याऐवजीं विघ्न करणार नाहीं कशावरून असें त्यांस वाटलेंहि असेल. आणि तसें वाटलें असल्यास त्याबद्दल त्यांस दोष तरी कोण देणार. मला खरें सांगितल्यानें माझ्या अडथळ्यानें कर्तव्य करण्याला तेवढे विघ्न उपस्थित होणार

असें जर त्यांस वाटत असलें तर त्यांनीं मनांतले हृद्गत मला जरा उशीरां समजूं दिलें एवढेंच होईल. त्यांच्या मनांत राज्यक्रांतीसाठी कट करण्याचे किंवा कटांत शिरण्याचे विचार पूर्वीपासूनच असतील काय, की तसले विचार मागाहून उत्पन्न झाले? राज्यक्रांति झाली पाहिजे इत्यादि गोष्टी ते बोलतहि नव्हते. आपल्याला पुढे आयुष्यांत काय करावयाचे, ब्रिटिश राज्यांत नोकरी करावयाची कीं संस्थानांत करावयाची, कीं वकील व्हावयाचें असे बोलणे झाले तेव्हां त्यांनी आपल्या इच्छित आयुष्यक्रमाचे चित्र कसे बरे काढले होते ? होय, आपण एखाद्या खेडयांत रहावें, रहाण्याला घर मात्र स्वतंत्र असावे, घराबाहेर लहानसा बगीचा असावा, आपण त्या बगीच्यांत फळझाडे लावावीं आणि एकसारखे काम करावे, व त्या खेडयांतल्या शाळेंत आपण मास्तर असावें, आणि खेडयांतील मुलांमुलींनां शिक्षण द्यावे, अशा तऱ्हेचा स्वस्थपणाचा आयुष्यक्रम त्यांच्या डोळ्यासमोर असे. आपल्या शहरांतील मुलांनां दूध मिळत नाही. आपण तरी आपल्या मुलांनां दूध मिळेल असें केले पाहिजे; त्यांनां घरी दूध प्यावयास आणि चांगले खावयास मिळत नसल्यामुळें तालीमबाजी कशी सोडावी लागली या गोष्टी ते बोलत. जेव्हां त्यांचे येथील कॉलेजांतून नांव काढून टाकण्यांत आले तेव्हां मामंजी त्यांच्यावर किती रागावले, तेव्हां काय ते त्यांनां येथल्या राज्याविषयीं दुःख वाटूं लागलें होतें. ते म्हणाले की, कॉलेजांतून काढल्याचे इतके दुःख कां? सरकारी नोकरींत आपणास शिरावयाचे असेल तरच कॉलेजच्या डिगऱ्यांची किमत. इतर उद्योगी लोक पोट नाही का भरीत. हिंदुस्थान देशाची परिस्थितीच बिघडली आहे, शिवाजीचा अभिमान बाळगणें यासारखी गोष्ट जर वाईट ठरते,तर तो अभिमान बाळगणारे लोक दोषी नसतांना परिस्थितीच दोषी आहे आणि ही परिस्थिति इंग्रजांचे देशावरील वर्चस्व नष्ट झाल्याशिवाय बदलणार नाही. असे ते बोलले होते. त्यांच्या मनोवृत्तींत जो फरक पडला तो त्यांस कॉलेजांतून काढून टाकण्यानेच पडला. ते त्यावेळेस काय म्हणत तें पक्के आठवले कॉलेजांतून नांव काढून टाकले कीं त्या मनुष्याची लोकांत किमत जवळ जवळ शून्य झालीच. इतकें कॉलेजांतील शिक्षणाचे महत्त्व कां? तर कॉलेजांतील परीक्षा पास झाल्यावर सरकार नोकरी देतें म्हणून,आणि तेवढ्यामुळें वाटेल त्या मनुष्याला वाटेल ती सबब काढून नालायख किंवा अनीतिमान ठरविण्यास सरकारला अधिकार झालाच, या सरकारला दुसऱ्यांच्या बायकांवर प्रेम करणारा मनुष्य शिवाजीवर प्रेम करणाऱ्या मनुष्यापेक्षां अधिक प्रिय आहे, तर अशा सरकारची नोकरी करण्याची [illegible] धरणे म्हणजे आपली नीतिमत्ता भ्रष्ट करून घेण्याचीच महत्त्वाकांक्षा धरणे आहे दुसरे कांही नाहीं—असे असतां आजचा ब्राह्मण, सरकार आपल्या इच्छेप्रमाणे जसे वांकवील तसे वांकवून घेण्यास तयार कां बरे झाला? छे! छे! सरकारच्या पुऱ्या तावडींत सापडलेला वर्ग ब्राह्मणच आहे. शिवाजीचे नांव घेऊं नका; नाहीं घेत. देवळांशीं संबंध ठेवूं नका; नाही ठेवीत. कारकुनीची नोकरी देण्यास कांहीहि अटी घाला, आम्ही त्या निमूटपणे पाळूं. या प्रकारची वृत्ति ब्राह्मणांत कां बरे झाली आहे? तर दुसऱ्या कोणत्याहि धंद्यास ब्राह्मण लायखच नाही म्हणून. तर असला नैतिक अधःपात जर टाळावयाचा असेल तर सरकारी नोकरीखेरीज अन्य उद्यमास ब्राह्मणांनी लागले पाहिजे, इत्यादि गोष्टी ते बोलत होते खरे पण राज्यक्रांति करण्याच्या प्रयत्नास ते प्रवृत्त कसे झाले हें मला समजत नाहीं.

यांप्रमाणे अनेक प्रकारचे विचार रुक्मिणीच्या मनांत येत, आणि त्यांबरोबर तीस असेहि वाटे की राज्यक्रांतीच्या खटपटीत मनुष्य पडतो तो जिवावर

उदार झाल्यामुळे पडतो, आणि मनुष्य जिवावर उदार होतो याचें कारण त्यास सुख किंवा सुखाशा कांहीं उरली नसेल म्हणून पडतो, तर आपल्या नवऱ्याची अशी तर स्थिति झाली नसेलना? झाली असल्यास आपण ती सुधारण्यासाठीं निकराचा प्रयत्न करून अमेरिकेस गेलें पाहिजे.

रुक्मिणीची अमेरिकेस जावयाची खटपट एकसारखी चालू होतीच. लढाई संपेपर्यंत पासपोर्ट मिळण्याची आशाच नव्हती, पण लढाई संपल्यानंतर तिने निकराचा प्रयत्न केला. सातारच्या एका वकीलास तिने लागणारा पत्रव्यवहार करून पासपोर्ट मिळवून आणण्याची खटपट करण्यासाठीं पंचवीस रुपये देऊं केले होते. त्यास मधून मधून ती पत्रें लिही. व शेवटीं तुम्हांस लवकरच पासपोर्ट मिळवून देतो असे सातारच्या कलेक्टरकडून अभिवचन मिळवून देतो असे पत्र आले ते तिला मुंबईस असतांना पोंचले. तेव्हां तिच्या अमेरिकेस जाण्यासाठीं तयारी करावयाची ती डॉ. मत्तमयूरी हीच करूं लागली.

एके दिवशी डॉ. मत्तमयूरी ही तिला म्हणाली "रुक्मिणीबाई तुमच्यापाशी पैसा नसेल, पण भावी सुखाची आशा तरी तुम्हांस आहे. आणि तुमचा आयुष्यक्रम इतर लोकांसारखाच सुव्यवस्थित होईल असे वाटते."

"केवळ इतर लोकांसारखा साधा, कायम ठशाचा असा आयुष्यक्रम व्हावा अशी तुमची इच्छा आहे काय? की आपला आयुष्यक्रम इतर लोकांच्या आयुष्यक्रमापासून निराळा व्हावा असे तुम्हांस वाटते?"

"माझा आयुष्यक्रम अगदी सामान्य लोकांप्रमाणे सामान्य व्हावा अशीच माझी इच्छा पूर्वीपासून आहे. ती पुरी मात्र होत नाही. पुष्कळ लोक माझ्या आयुष्यक्रमांत कांही वैशिष्टय आहे अशा दृष्टीनें पाहतात; पण तसे कांहीं नाही. मी केवळ पूर्वसंचिताच्या शक्तीमुळे कशी बशी कोणत्या तरी तऱ्हेने ढकलली जात आहे. माझे आयुष्य इतर स्त्रियांसारखे साध्या घडणीचें झालें नाहीं किंवा आयुष्य जेव्हां बनत चालले तेव्हां मला त्याचें आपल्या इच्छेने नियमन देखील करतां आलें नाहीं. मी प्रवाहांत पडले आणि पुढे ढकललें गेलें."

"तुम्हांला सुखाशा कां नाहीं?"

"मला आयुष्याचें भवितव्य अगदी काळ्या ढगांनी व्याप्त दिसतें. मला माझ्या आयुष्याचे पुढें काय होईल हे कांहींच कळत नाही. प्रेम करणाऱ्या पुरुषाशिवाय, किंवा ज्या पुरुषावर आपण प्रेम करतों अशा पुरुषाशिवाय आयुष्य व्यर्थ आहे!"

"तुम्ही अगदी खरें बोललांत!"

अनेक दिवस एकत्र राहिल्यामुळें, आणि संभाषणाचे विषय आणि पूर्वसबंध इतके जवळचे व इतके नाजूक असल्यामुळे डॉ. मत्तमयूरी आणि रुक्मिणी यांचे संबंध बरेच निकट झाले. एकीकडे मालक आणि नोकर असा संबंध तर दुसरीकडे जें स्थान एकीला प्राप्त झाले आहे ते स्थान [illegible] दुसरीची महत्त्वाकांक्षा आणि ती देखील निष्फळ झालेला असा सबंध. मत्तमयूरीविषयी रुक्मिणीस प्रथम थोडा मत्सर वाटे, थोडा रागहि आला असेल, पण पुढे तिला मयूरीविषयी सहानुभूति उत्पन्न झाली. रुक्मिणी आणि मयूरी यांची एकमेकीविषयी वृत्ति निरनिराळ्या प्रकारची होती. नवराबायकोची भेट व्हावी व त्यांनी सुखाने नांदावे असे मयूरीस वाटे, तर मयूरीवर जो कोणी दुसरा तरुण आसक्त झाला असेल त्यास आपण मदत करावी, आणि तिच्या प्रेमाच्या ओघास योग्य संगमस्थान मिळावें असें रुक्मिणीस वाटे. रुक्मिणीने मनांत असा विचार केला कीं, रघु कामत याचे जर मयूरीवर प्रेम जडलें असेल तर त्या प्रेमास योग्य प्रत्युत्तर मयूरीकडून कां येऊं नये. या कल्पनेमुळे रुक्मिणीनें "रघु" कामत यांच्याविषयी मुद्दाम चर्चा सुरू केली.

" रघुनाथरावांचा आणि तुमचा अजून पत्र-व्यवहार होतो काय ? " रुक्मिणीने विचारले.

" होतो, पण तो केवळ औपचारिक होतो. " मयूरी उद्गारली.

" रघुनाथरावांची पत्रें तुम्हास औपचारिकच असतात काय?"

" रघूचीं पत्रें केवळ तशीच असतात असे म्हणतां येत नाहीं. "

" रघुनाथराव पत्रांत काय लिहितात?"

" तिकडची बातमी लिहितो; घरची बातमी लिहितो. "

"घरच्या पत्रांत लीलेविषयी काय लिहितात, त्यांनां लीलेची पत्रें जातात असें आपण म्हणाला होतां."

"लीला आणि डॉ. सरंजामे ही बरोबर फिरा-वयास जातात असे रघूने लिहिले आहे. डॉ. सरं-जामे हे एक कोंकणस्थ ब्राह्मण आहेत व ते तेथील कोलंबिया युनिव्हर्सिटींत अध्यापक आहेत."

"तुमच्यावर रघुनाथराव प्रेम करीत आहेत असें त्यांच्या पत्रावरून म्हणतां येईल की नाही–"

"रघु माझ्यावर प्रेम करतो की माझ्याशी केवळ फ्लर्टिंग करतो हें मलाच कळत नाही."

"फ्लर्टिंग म्हणजे काय?"

"नाटकी प्रेमाचें चावटपणाचे भाषण–त्याला फ्लर्टिंग म्हणतात. "फ्लर्टिंग" म्हणजे काय हे व्याख्येने सांगतां येत नाही. दोघा पोरापोरींचे एकमेकांवर आसक्त नसतांना जे गुळपीठ चालते त्याला "फ्लर्टिंग" म्हणायला हरकत नाही. एखादा छोकरा एखाद्या छोकरीला पाहून "प्रिय-तमे" म्हणून हांक मारतो, तिचा जाऊन चटकन मुका घेतो, तिच्या गळ्यांत जाऊन हात घालतो. पण त्याच्या मनांत तिच्याविषयीं मोठी दृढ भावना असते अशांतला भाग मुळीच नसतो. तरुण मंडळी एकत्र जमली म्हणजे कांही चाव-टपणा करीत करमणुकीनें वेळ घालवावा या प्रकारची त्या देशांत रीतच झाली आहे. या प्रकारच्या चावटपणाला त्या देशांत निरुपद्रवी समजतात, आणि मुलगी किंवा मुलगा अंतःकर-णांत प्रेम जागृत नसतांना प्रेमी जनांचे सर्व चाळे करतात, किंबहुना ते चाळे अधिक अतिशयो-क्तीनें करतात तेव्हां त्यास फ्लर्टिंग समजणे आणि उलट तशाच क्रिया करणें हें खऱ्या अमेरिकन शिक्षणाचा भाग आहे असेंहि कित्येक विद्वान ग्रंथकार लिहितात.–"

" म्हणजे, रघुनाथ कामत केवळ प्रेमाची भाषा बोलत आहे, आणि त्याच्या मनांत कांहीं प्रेम नाहीं असा आपला समज आहे काय?–"

" होय. "

" असें वाटण्याचे कारण काय? "

" फार थोडक्या दिवसांची ओळख असतांच तो असा चावटपणा करूं लागला, एकाएकी चुंबन घेणें, कमरेस विळखा घालून दोघांचा फोटो काढून घेणे, इतक्या चावटपणास जो प्रवृत्त होतो तो प्रेमामुळे खास होत नाहीं.–"

"मग असला चावटपणा त्यांनीं केला याब-द्दल तुम्हांस त्यांचा राग आला असेल–"

"अर्थात आला!"

"पण आज त्या वर्तनाबद्दल राग येतो काय?"

"त्याला झालीं चार वर्षें;त्याविषयींचा राग अजून शिल्लक काय राहाणार, शिवाय त्यावेळेस त्याचे करणे जितकें फाजील वाटले तितके आज वाटत नाहीं. अमेरिकन लोकरीतीचा परिचय झाल्या-पासून तर त्याचे वागणे अगदी स्वाभाविक वाटते.–"

"तर मग तुमचें चुंबन घेतल्यानंतर तुम्हीं रागावलां त्याबद्दल तुम्हांलाच वेडी मुलगी म्हण-ण्यास रघुनाथ तयार झाला तर तें त्याचें म्हणणें तुम्हांस बरोबर वाटतें काय? "

" कांही अंशी बरोबर वाटतें. "

" पण " फ्लर्टिंग " चालतां चालतां म्हणजे नाटकी प्रेम दाखवितां दाखवितां पुरुष किंवा स्त्री खरोखर प्रेमाच्या ओघांत सांपडणार नाही काय?–"

" ते शक्य आहे! "

" मग रघुनाथराव तुमच्यावर प्रेम करूं लागले नाहीत कशावरून? इतकीं वर्षें तुमच्याशीं ते पत्रव्यवहार करीत आहेत–केवळ फ्लर्टिंगच चालूं असते तर पत्रव्यहार इतका वेळ टिकला असतां काय? आणि इतक्या दूरच्या स्त्रीशी केवळ फ्लर्टिंग-साठींच पत्रव्यहार ठेवण्याची प्रवृत्ति होते काय?"

"माझें या विषयीं अजून मत निश्चित नाही."

" डाक्टरीणबाई, मला लग्नापूर्वीच्या प्रेमाच्या व्यवहारांतले कांहीं समजत नाहीं. पण मी तुम्हाला प्रश्न विचारते की एखाद्या पुरुषावर तुम्ही प्रेम करतां पण तो तुमच्यावर प्रेम करीत नाही, आणि दुसरा पुरुष असा आहे कीं, तो तुमच्यावर प्रेम करीत आहे पण तुम्ही त्याच्यावर प्रेम करीत नाही, तर तुम्ही कोणता पुरुष लग्नाला पत्कराल?"

" हा प्रश्न कठिण आहे, स्वाभाविक प्रवृत्ति ज्यावर आपण प्रेम करतो त्याच्याशीच लग्न करण्याकडे व्हावयाची. "

" आणि तो तुमच्यावर प्रेम करीत नसला तर-"

" तर मग त्याच्या मनामध्यें आपल्याविषयींचें प्रेम जागृत करावे, असे मी म्हणेन. स्त्री आपल्या प्रेमाच्या शक्तीवर पुष्कळ विश्वास टाकते, आपण त्यावर प्रेम करतो हे त्यास समजू लागले तर त्याचेंहि प्रेम जागृत होईल अशी तिची अपेक्षा असते."

" तुमचें उत्तर समाधानकारक नाही. स्त्री आपल्यावर प्रेम करीत आहे एवढीच भावना जर पुरुषास स्त्रीवर प्रेम करावयास लावील तर स्त्रिया साध्वी आणि नवरे दुष्ट असे देखावे आपणांस दिसलेच नसते; उलटपक्षीं तुमचें पुरुषावरील प्रेम पाहून त्या पुरुषाच्या मनांत प्रेम जागृत व्हावे अशी तुम्ही अपेक्षा करता तर, तुमच्यावर जो पुरुष प्रेम करीत असेल त्या पुरुषाविषयीं स्त्रीच्या मनांत प्रेम कां उत्पन्न होऊं नये? "

" कधी कधीं होईलहि, पण नाहीं. प्रेम करणारांवर प्रेम जडतें हें नेहमींच सत्य नाही, कधी कधी असेहि होतें कीं ज्या मनुष्यावर आपण बिलकूल प्रेम करीत नाहीं, तो मनुष्य मात्र आपल्यावर प्रेम करीत आहे असें पाहून त्याचा तिरस्कार येतो."

"तुम्हाला याचाहि अनुभव आला आहे काय?"

" आला आहे. "

" तो कोणाविषयीं, रघुनंदनविषयीं काय ? "

" नाहीं, मला प्रेमाची पत्रे लिहिणारा एक दुसराच विद्यार्थी होता, तो कुरूप होता, आणि त्यास त्याच्या कुरूपतेची जाणीव असल्यामुळे माझ्याशीं प्रत्यक्ष भेटीच्या प्रसगी त्यास बोलावयासहि धैर्य होत नसे. पण प्रेमपत्रांचा मात्र एकसारखा तो वर्षाव करीत असे. त्याला असे वाटत असावे की त्याची दया येऊनच मी त्याचा स्वीकार करीन."

" रघुनंदनाचीं प्रेमपत्रें पाहून तुम्हास काय वाटते ? "

" अजूनहि तें फ्लर्टिंग आहे, त्यांत खरेपणा नाहीं अशी मला भीति वाटते."

" त्याच्या प्रेमाच्या भाषेत नाटकीपणा नसावा असेंच तुमचे म्हणणें आहे नाहीं ? "

" होय ? "

" तर मग तुम्ही रघु कामत यांजवर प्रेम करीत आहांत ? "

---

### प्रकरण ६ वें.

## लाला गजपतराय.

लाला गजपतराय हे लडनमध्यें ह्यामस्टेड-मधील एका बोर्डिंग हाऊसमधील " सामान्य "

खोलींत एक लङ्ग ध्याड पुढें ठेवून मोठ्या काम करण्याच्या नेटाने पत्रें लिहीत बसले होते. त्यांच्या टेबलावर वर्तमानपत्रें व मासिकें यांस पाठविण्याच्या हेतूनें हाती घेतलेले कांही अर्धे-मुर्धे लिहिलेले लेख, तर कांहीं पत्रें यांचा ढिगारा पडला होता. पत्रे अनेकप्रकारचीं होतीं, कांहीं ४ वाजतांच्या चहाची बोलावणी, तर वर्तमानपत्रांच्या संपादकांचीं कांहीं पत्रें, तर कांहीं ठिकाणीं व्याख्यानें देण्यास आलेलीं आमत्रणें, कांहीं हिदी राजकारणी पुरुषांनी केलेला पत्रव्यवहार, तर कांही पैशांच्या अडचणींत सांपडलेल्या, किंवा सांपडलो आहों म्हणून सांगणाऱ्या विद्यार्थ्यांचीं पत्रे, इत्यादि संभार त्यांच्या पुढे टेबलावर दिसत होता. गजपतराय या प्रकारचीं बरींच पत्रें आलीं म्हणजे डरत होते अशांतला भाग मुळींच नव्हता. पैसे मागण्यासाठीं "अडचणीं" तल्या विद्यार्थ्यांनां व इतर मंडळींनां उत्तर देणे कठिण नव्हते. "मी स्वत: कोणासहि कोणतीहि पैशाची मदत करण्यास असमर्थ आहे, आपण इंडिया ऑफिसला लिहावे ते आपणास अडचणीत मदत करतील अशी आशा आहे." या अर्थाची ठराविक वाक्यें लिहून त्यांस तशा पत्राची बोळवण करतां येई. चहाचीं किंवा जेवणाचीं आमंत्रणें स्वीकारण्याचे गौरवाचे पत्र लिहावयास लाला गजपतरायासारख्या लेखन-पटूस अडचण ती काय? वर्तमानपत्रकारांकडून आलेल्या पत्रांस उत्तर देण्याचे विशेष कारण नसे, कां की, बहुतेक पत्रे लाला गजपतराय यांनी पाठवू केलेला लेख आमचे वाचक ज्या गोष्टी वाचूं इच्छितात अशांतला नाहीं, किंवा हिंदुस्थान-विषयक लेख या सालांत आम्ही पुष्कळ प्रसिद्ध केले आणखी लेखांनां स्थळ नाहीं इत्यादि कारणें देऊन लेख नाकारणारींच असावयाचीं. अशा तऱ्हेचीं उत्तरें वाचून या लुच्चा इंग्रज पत्रकारांनीं हिंदुस्थानावर हिंदुस्थानी लेखकाने लिहिलेल्या लेखास स्थानच द्यावयाचें नाहीं असा कट तर केला नसेलना? अशी त्यांस शंका येई. हिंदुस्थानी लेखकाच्या लेखास स्थानच द्यावयाचें नाहीं असा सपादकांचा कट असल्याची जी समजूत गजपतराय यांची झाली होती तिचे कारण तसा कांही कट होता अशांतला भाग मुळींच नाहीं. वर्तमानपत्राचा संपादक नेहेमीं विचार असा करणार कीं अमुक लेख घेतला तर त्याच्या योगाने पत्राच्या खपाला मदत काय होईल. याप्रकारे विचार करतां हिंदुस्थानचीं गाऱ्हाणीं सांगणारा हिंदुस्थानी मनुष्याचा लेख घातल्यानें आपल्या पत्राचा खप वाढेल असें वर्तमानपत्रकारास वाटत नसे व त्यामुळे पत्रकार तसले लेख नको म्हणत, एवढेंच.

आजचीं पत्रे तर विशेष महत्त्वाचीं होतीं. अमेरिकेस जाण्याचा विचार त्यांचा झाला असून तो विचार त्यांनीं आपल्या पूर्वपरिचित विद्यार्थ्यांस व कांही अमेरिकन नागरिकांस कळविला होता. हीं अमेरिकेचीं पत्रे त्यास मोठीं महत्त्वाचीं वाटत होती. कां की, आपण अमेरिकेत जाऊन कांहीं तरी काम करूं अशी भावना कशामुळें तरी लालागजपतराय यांच्या मनांत उत्पन्न झाली होती. ते पूर्वी अमेरिकेला दोन तीन आठवडे राहिले होते त्यावेळेस अमेरिकन लोकांनां आपण इंग्लंडचें वर्चस्व झुगारून दिलें याबद्दल त्यांस कसा अभिमान वाटतो, आणि हिंदुस्थाननें अमेरिकेचा कित्ता कां गिरवू नये म्हणून अमेरिकन लोक प्रश्न कसा विचारतात, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अमेरिकन लोक हिंदुस्थानास स्वातंत्र्य मिळावें या विचारास कसे अनुकूल आहेत इत्यादि गोष्टी ते लाहोरच्या हायकोर्टाच्या बॅरिस्टरकोठींत, तसेच क्लबांत वारंवार बोलत. व कांहीं अमेरिकन बायकांनीं "वेद" आणि "आर्यसमाज" यांसंबंधाने माहिती किती उत्सुकतेने विचारली हे सांगत; व त्यामुळें त्यांनां हिंदुस्थानच्या धर्माबद्दल किती आदर आहे याचेहि, सहानुभूतिपूर्ण

श्रोता मिळाला म्हणजे ते वर्णन करीत असत. मात्र अलीकडे अलीकडे त्यांनीं हें सांगणे बंद केले होते, कां की अमेरिकेला जाऊन आलेली नवीन मंडळी, अमेरिका हिंदुस्थानला कःपदार्थ समजते, प्रेसिडेंट रूझवेल्ट हा हिंदुस्थानाला उंदराप्रमाणे फळणाऱ्या तीस कोटी लोकांनीं भरलेला देश असे म्हणतो; आपली जगांत किंमत कांही नाही. जेथे मोठ्या प्रमाणावर उत्पादन नाहीं आणि जेथली प्रजा सुशिक्षित व गरजा वाढलेली नाही तो देश जंगली लोकानींच भरलेला असे आजची अमेरिका समजते असें सांगून दे. गजपतरायांच्या आशाचित्रावर आडव्या उभ्या दुष्ट रेघोटया ओढीत होते. त्यांतल्यात्यांत दुःखाची गोष्ट अशी होती कीं ही नवीन मंडळी गजपतराय यांच्यापेक्षां अधिक सुशिक्षित व जास्त वर्षे विदेशीं राहिलेली होती; ही नवी मंडळी लाहोरला आल्यापासून गजपतरायांचे, अमेरिका हिंदुस्थानला स्वतंत्र होण्यास मदत कशी करील याच्यावरचे भोजनोत्तर पद्धतीचें व्याख्यान जरासे कमी झालें होतें.

लाला गजपतराय याचा दैनिक कार्यक्रम येणेंप्रमाणें होता. ते सकाळी नियमाने ८ वाजतां उठत व प्रातर्विधि वगैरे आटपून ब्रेकफास्ट घेऊन नऊ वाजतां दैनिक उद्योगास लागत. त्यांचा दैनिक उद्योग अनेक प्रकरचा होता. ते लंडनला चळवळीसाठीं सार्वजनिक पैशानें आले होते, पण त्यांच्याजवळ प्रिव्ही कौन्सिलचीं अपीलेहि होती. त्या अपीलांमुळे त्यांनां प्रवासखर्च, वकील फी मिळून २९ हजार रुपये प्रत्येकीं मिळणार होते. हे जाणार असें ठरल्यानंतर अपीलें मिळालीं. अपीलांसाठीं जावयाचें असून फंडांतले पैसे आपण घेतले नाहीत हें ते बजावून सागत. अपीलाच्या कामाकडे त्यांचा वेळ जातच असे. पण "राष्ट्रीय" मंडळी भेटली म्हणजे ते काम फार थोडया वेळाचे आहे व त्यांत प्राप्तीहि विशेष नाहीं; इकडे आलों म्हणून पत्करले आहे असें ते सांगत, आणि प्रत्येक पक्षकाराला, तुमच्या खटल्यामुळें लंडनला जाऊन राष्ट्रकार्य करता येते असें सांगत. सकाळीं आपली पत्रे-कांही खाजगी पत्रे-स्वतः लिहीत, कोणाकडे भेटावयास जायचे तर जात. आणि सामान्यतः दुपारचे दोन ते सहापर्यंतचा वेळ सेक्रेटरीमार्फत पत्रें लिहिणे इत्यादि कामाकडे खर्च करीत. त्यांनां काथलीन मर्फी नावाची एक सेक्रेटरी मिळाली होती. ती एका आयरिश स्नेह्यामार्फत त्यांच्याकडे कामाला आली होती व ती त्यांचे काम मोठया उत्साहाने करीत असे. तिला त्यांचे काम करतांना असे वाटे की, आपण आयरिश चळवळ व हिंदुस्थानांतील चळवळ याच्यांमधील दुवा आहोत. व आपले महत्त्व तिला स्वतःला वाटे तितके लोकांसहि वाटावे म्हणून तिची धडपड असे. त्या खटपटीतला एक भाग असा होता कीं, हिंदुस्थानांतील चळवळ असेल त्यापेक्षां अधिक जोराची आणि इग्रजी साम्राज्यास भयप्रद आहे असें दाखविणें. याकडे तिच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति होत असे. कां कीं, [illegible] चळवळ जितकी भयप्रद तितके लालाजींचें महत्त्व अधिक आणि तितकेच तिचे आयरिश देशाभिमानी मंडळीत महत्त्व अधिक. कां कीं, आयरिश चळवळीला जोर म्हणून हिंदुस्थानांत जर गडबड उडवून द्यावयाची झाली तर ते कार्य आपल्या मार्फत होणार. आयरिश चळवळीला हिंदुस्थानची शक्ति मिळवून देणे आपल्या हातांत आहे अशा तऱ्हेची तिनें आपली समजूत करून घेतली होती. तिच्या मनांत लाला गजपतरायविषयी मोठा आदर वाटत होता. आणि त्यांच्या ठायीं ती अनेक प्रकारची शक्ति कल्पीत असे. गजपतराय पंजाबचे. पंजाबी शीख म्हणजे मोठे लढवय्ये, ब्रिटिश सरकारचे आधारस्तंभ आणि गजपतराय हे तर त्यांचे पुढारी. व गजपतराय यांनां तर हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याबद्दल किती तरी उत्कट इच्छा! गजपतराय यांनां कार्यप्रवृत्त केले म्हणजे हिंदुस्थानांतील ब्रिटिश

सत्तेला धोका आलाच, इत्यादि विचार तिच्या मनांत येत असत. तिच्या मार्फत अनेक आयरिश तरुण गजपतराय यांस भेटावयास येत त्यावेळेस गजपतरायहि आपल्या अंगात निराळे अवसान आणीत. इंग्रजी सत्तेला हिंदुस्थानांतून झुगारून द्यावयास काय वेळ आहे पण आमच्या पुढाऱ्यांत एकमत झालें नाही, इत्यादि गोष्टी ते बोलत! जणूं काय एकमत झाल्यावर हे मोठे दिवेच लावणार आहेत !!

लाला गजपतराय इंग्लंडास या वेळेस कोणत्या प्रकारचे राजकारण करण्यासाठी आले होते हे नक्की समजण्यासारखें नव्हतें. हिंदुस्थानाला स्वराज्य पाहिजे म्हणून हिंदुस्थानांत जी चळवळ चालली होती त्या चळवळीला पाठिंबा देण्यासाठी जी बरीच मडळी इंग्लंडांत होती, त्यांपैकीं ते एक होते. पण आपल्या या प्रकारच्या प्रयत्नाचा उपयोग काय आहे याविषयी त्यांच्या मनात अविश्वास होता. त्या वेळेस राष्ट्रसंघ नुकताच स्थापन झाल्यामुळे हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांस हिंदुस्थानाचे इंग्लंडविरुद्ध गाऱ्हाणें सांगण्यासाठीं एक स्थान नवीन झाले म्हणून निराळ्या आशेचे अंकुर उत्पन्न झाले होते. त्यांतल्यात्यांत प्रेसिडेंट विल्सनला अमेरिकेच्या विजयामुळे जे प्रामुख्य मिळाले त्या प्रामुख्यामुळे सर्व राष्ट्रांच्यावर असलेली संस्था त्यास निर्माण करतां येऊन प्रजेनें, आपणांवर कोणी राज्य करावे यासारख्या गोष्टींमध्ये स्वयंनिर्णय करण्याचा हक्क आहे, इत्यादि तत्त्वेहि त्यास प्रसृत करतां आली, आणि त्यामुळे सर्व राष्ट्रे सद्वर्तनाबद्दल सर्वांत वडीलपण ज्या राष्ट्रास आले त्या अमेरिकेस आणि तिच्या जनतेस जबाबदार झालीं आहेत, व हिंदुस्थान हे अमेरिकेप्रमाणेच राष्ट्रसंघाचें सदस्य झाल्यामुळें हिंदुस्थानाचें गाऱ्हाणें अमेरिकेस सांगणें ही गोष्ट कायदेशीरच झाली आहे, इत्यादि गोष्टी हिंदी पुढाऱ्यांस भासूं लागल्या होत्या. शिवाय 'गदर' चळवळ अमेरिकेत झाली, व ती मोडून टाकण्याच्या कामी अमेरिकेनें जें इंग्लडला साहाय्य केलें त्यामुळे अमेरिकेस इंग्लंडला हिंदुस्थानसबंधाने दोन गोष्टी सांगण्याचा अधिकार उत्पन्न झाला, एवढेंच नव्हे तर नैतिक दृष्टीनें हिंदुस्थानला असली मदत करणे हे अमेरिकेचें कर्तव्यच झालें आहे, इत्यादि गोष्टी हिंदुस्तानांतील पुढारीवर्ग बोलूं लागला, आणि आतां हिंदुस्थानसंबंधाने अमेरिकन लोकमत जागृत करण्याची आवश्यकता आहे असेहि भासूं लागलें.

अमेरिकेत जाऊन चळवळ करावी म्हणून तें काम आपल्या अंगावर घ्यावे असें लाला गजपतराय यांस वाटून त्यांनीं त्या कार्याकडेसच आपलें लक्ष दिले. त्यांचा इंग्लंडांत काम करण्यावर विश्वास नव्हता. ते मधून मधून म्हणत, "इंग्लंड आमचे शत्रु, ते आपल्या फायद्याकरितां हिंदुस्थानास ताब्यात ठेवीत आहे, तर इंग्लंडमध्यें चळवळ करण्यांत मतलब काय? हिंदुस्थानातर्फे इंग्लंडांत सांगावयाचें तें काय, तर आम्हांस स्वराज्य द्या! आपले अनेक लोक तें सांगतच आहेत, तर मी तेथें हवा कशाला आणि इंग्लंडांतील मजूरपक्ष हिंदुस्थानास स्वराज्य देण्याच्या गोष्टी बोलतच आहे. ते बोलतात त्यांत प्रामाणिकपणा आहे कीं हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यासाठीं त्यांनी प्रयत्न करण्यांत त्यांचा मूर्खपणा आहे हे मला कळत नाही." इंग्लंडचा फायदा हिंदुस्थानाचें द्रव्यशोषण करण्यांत आहे, आणि हे द्रव्यशोषण जर इंग्लंडने चालविलें तरच इंग्लंडांतल्या मजुरांनां काम मिळेल असें असतां हे बेटे गाढव मजूर हिंदुस्थानाला न्याय देण्याच्या गप्पा बोलतात तें कां? हे आमच्या लालाजींनां कोडें पडलें होतें. त्यांनीं त्या प्रश्नाचे उत्तरहि आपल्या मनाशीं देऊन ठेविलें होतें तें असें. मजूरवर्ग अडाणी, विचार न करणारा आणि जें दिसण्यांत सुंदर असेल तें बोलणारा असा आहे. मजूरवर्गाचे पुढारी म्हणजे मध्यम वर्गांतलेच इंग्रज. म्हणजे हिंदुस्थानावर राज्य

करणाऱ्या ब्यूराक्रसीच्याच वर्गांतले आणि त्यांचेच आप्तसंबंधीं. हिंदुस्थानानें बंड करूं नये म्हणून त्याला न्याय देण्याची भाषा जशी इंग्रज लोक बोलतात तसेंच हे मजुरांचे पुढारी बोलत आहेत. मजूरपक्षाची पार्लमेंटांत सरशी म्हणजे नोकरशाहीला पाठिंबा देणाऱ्या निराळ्या आडनांवांच्या लोकांची सरशी एवढेंच, दुसरें कांहीं नाहीं. कदाचित या मजुर पुढाऱ्यांनां हिंदुस्थानास स्वातंत्र्य द्या इत्यादि स्वातंत्र्यप्रियतेचीं गोजिरीं वाक्यें बोलून त्यांस निवडून यावयाचें असेल. त्यांनां लिबरल आणि कांझरव्हेटिव्हपक्षापेक्षां आमची तत्त्वें उच्च व पवित्र आहेत असा बहाणा करावयाचा असेल, आणि निवडणूक जिंकावयाची असेल. कोणता शहाणा इंग्रज हिंदुस्थानाला स्वातंत्र्य देऊं इच्छील? अर्थात जे सुशिक्षित इंग्रज हिंदुस्थानास स्वातंत्र्य देण्याची भाषा बोलत आहेत ते ढोंगी असले पाहिजेत, असेंच त्यांस वाटत होतें. तथापि या ढोंगी मनुष्यांनां आपण हातांशीं धरून जें मिळवावयाचे असले ते मिळवावे, पण इंग्रज लुच्चे आहेत ही खुणगांठ मनाशीं बांधून ठेवावी असे त्यांनीं मनाशीं ठरविलें होते. हिंदुस्थानांतून इंग्लंडला गेलेल्या पुढाऱ्यांच्याकडे तेथील विद्यार्थीवर्ग जमावयाचाच. तो गजपतराय यांच्याकडेहि जमत असे. व तो जमे त्या वेळेस कॉफी आणि केक विद्यार्थ्यांस मिळत असे, आणि त्यामुळें संभाषणप्रसंग आनंदांत जाई. त्या वेळीं कांहीं विद्यार्थी लालाजी जें म्हणत तें ब्रह्मवाक्य समजून त्याच मतांचा पुनरुच्चार करीत. व तसें लालाजींनीं पाहिलें म्हणजे तरुणपिढीस आपल्या अनुभवाचें ज्ञान देऊन तिला तयार करण्याचें उपयुक्त कार्य आपण करीत आहोंत असे लालाजींस वाटे. लालाजी इंग्लंडला दोन तीनदां आले असल्यामुळें आणि इंग्रज मुत्सद्द्यांच्या गांठीं घेत असल्यामुळें आणि त्या गाठींत काय बोलणें झालें याची खास माहिती कांहीं विद्यार्थ्यांस "गुप्तपणानें" तथापि "मोकळ्या मनानें" सांगत असल्यामुळें राष्ट्राच्या भवितव्याच्या आणि अस्सल राजकारणाच्या मसलतींत आपणांस घेतलें आहे असे वाटून विद्यार्थी कृतज्ञ होत. कधीं कधीं विद्यार्थ्यांच्या अमुक अडचणी आहेत, त्यांनां हिंदुस्थानांत गेल्यावर सरकारी नोकरींत शिरण्यास उत्तेजन कसे मिळत नाहीं तर त्यांची व्यवस्था अगोदर झाली पाहिजे इत्यादि गोष्टीहि इंग्रजी प्रधानमंडळापाशी बोलल्याचे ते हळूंच सांगत. इत्यादि गोष्टींमुळें ते विद्यार्थीवर्गास इतके प्रिय झाले होते कीं आपण इतक्या मोठ्या मनुष्याच्या सान्निध्यांत आहो याबद्दलच विद्यार्थ्यांस मोठा अभिमान उत्पन्न होई, आणि तो देखील इतका कीं त्यांच्याकडे जाणारे विद्यार्थी आपण इतर विद्यार्थ्यांच्यापेक्षां जरा उच्च कोटींतील आहो, राष्ट्राच्या भवितव्याविषयीं विश्वासांत घेतलेल्या व्यक्ती आपण आहों असें समजत. कांहीं विद्यार्थ्यांची तर, आपण लालाजींच्या अत्यंत विश्वासांतले म्हणवून घेण्याबद्दलच चुरस लागली होती. अर्थात या प्रकारचे विद्यार्थी लालाजींनां अत्यंत प्रिय होते यांत शंका नाहीं. या तऱ्हेनें विद्यार्थ्यांत अत्यंत लोकप्रिय रहाण्याचें महत्त्व लालाजी पूर्णपणे ओळखून होते. मागें जेव्हां ते इंग्लंडांत आले होते त्यावेळेस ज्या अनेक विद्यार्थ्यांशीं त्यांचा परिचय झाला, त्या विद्यार्थ्यांचा ते परत येऊन आपली ब्यारिस्टरीची प्राक्टिस करूं लागल्यावर पुढे होणाऱ्या निवडणुकींत मदत करण्यास उपयोग कसा झाला याची लालाजीस पक्की आठवण होती.

त्यांच्याकडे येणारे सर्वच विद्यार्थी त्यांच्या मतांचाच पुनरुच्चार करण्यांत कृतकृत्यता मानणारे नव्हते. त्यांनां भेटण्यास जी तरुण मंडळी येत त्यांपैकीं कांहीं अर्थशास्त्राचे विद्यार्थी होते, व त्या विद्यार्थ्यांमध्यें कित्येक सोशालिस्ट आणि मजूरपक्षाच्या अर्थशास्त्रज्ञ प्रोफेसरांचे विद्यार्थीहि होते.

ते म्हणत कीं सर्वच इंग्रज जेव्हां हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याची भाषा बोलतात ते लुच्चे नाहींत. त्यांची मतेंच अशीं झालीं आहेत की कोणत्याहि मनुष्याचें दुसऱ्या मनुष्याला आपल्या गुलामगिरीत ठेवून कल्याण होत नाहीं. गुलाम मनुष्य स्वतंत्र झाला म्हणजे आपल्या पोटापाण्याची काळजी त्यावरच पडते आणि त्यामुळें त्याला मेहेनत करून पोटाला मिळवावें लागतें, आणि जास्त मेहनत केली म्हणजे त्याचा फायदा त्यालाच मिळतो, आणि मनुष्य जास्त काम करूं लागला म्हणजे त्याच यंत्रावर आणि त्याच जागेंत माल-काला अधिक काम काढून मालकाचा फायदा जास्त करून देतो. त्याप्रमाणेंच देशाचें आहे. जेव्हां देशाला स्वातंत्र्य असेल तेव्हांच तो देश भरभराटेल, आणि तो भरभराटला याचा अर्थ जास्त काम करूं लागला, व जास्त जिनसा वापरूं लागला; आणि असें झाल्यास त्या देशाशीं व्यवहार करण्यानें व्यवहार करणाऱ्या देशाचें कल्याणच होतें इत्यादि नवीन मतें मजूरवर्गाचे अर्थशास्त्रज्ञ विद्यार्थ्यांस शिकवीत आहेत. ही सर्व त्यांची लबाडीच आहे काय? असा प्रश्न अर्थ-शास्त्रज्ञ विद्यार्थी लालाजींस करीत. अशा तऱ्हेची कणी मांडणी केली म्हणजे लाला गजपतराय त्या विद्यार्थ्यास "दूधखुळा" म्हणत आणि सांगत "बाबारे! "पॉलिटिक्स" तुला अजून समजावयाचेंच आहे. अरे, तूं वर्गांत होतास म्हणून असलीं मिठ्ठीं मते इंग्रज प्रोफेसर बोलत असेल, तो आपल्या इंग्रज विद्यार्थ्यांनां एकीकडे घरीं बोलावील आणि आपलें निराळें हृद्गत त्यांनां सांगेल. तुला काय समजलें आहे? अरे बाबा, पर-हिताचीं तत्त्वे बोलणें हें पालिटिक्स आहे. इंग्र-जांच्या बोलण्यावर कधींहि विश्वास ठेवूं नका."

हें बोलणें बोलतांनां लालाजी त्यांची स्वयं-सेविका सेक्रेटरी क्याथलीन इच्याकडे स्मितयुक्त मुद्रेनें पहात; आणि क्याथलीन देखील, खरें राज-कीय सत्य आपल्यालाहि ठाऊक आहे. आणि इतर मंडळींनां या गोष्टी कळायच्या नाहीत अशा भावनेनें हास्य करीत असे. क्याथलीन मर्फी ही एक आयरिश मुलगी होती. ती पक्की होमरूलर होती. तिला हें पक्कें ठाऊक होतें कीं आयर्लंडला होमरूल पाहिजे आहे, पण लुच्चें इंग्रज राष्ट्र तें देणार नाहीं. कां कीं आयरिश राष्ट्रानें व लोकांनीं पैसेवाले होऊ नये ही इंग्लडची खरी इच्छा आहे.

लाला गजपतराय यांच्याविषयीं सामान्यतः विद्यार्थी मंडळीमध्यें आदरबुद्धि होती. त्यांच्या-ठायीं हिंदु भावना दृढ होती, आणि त्यांच्या सद्वर्तनाबद्दल हिंदुस्थानांत त्याप्रमाणेंच इंग्लंड-मधील हिंदुस्थानी मंडळीमध्येंहि चांगला लौकिक होता. जे मोठे हिंदुस्थानांतले पुढारी इंग्लडला आले म्हणजे बायकांच्या बाबतींत आपले गुण पाघळूं लागतात त्याप्रमाणें लालाजींनीं कधीं केल्याचें लोकांस ठाऊक नाहीं, आणि हिंदु विद्यार्थ्यांचें बरेवाईट वर्तन जेव्हां दृष्टीस पडेल तेव्हां त्याचे समर्थनच करण्याचा जो कांहीं लोकप्रिय होऊं पहाणाऱ्या पुढाऱ्यांनीं प्रयत्न केला त्याबद्दल उलट लालाजींनीं दुसऱ्या पुढाऱ्यांचे कान उपटले असें म्हणतात. अनेक पुढाऱ्यांस इंग्लंडमध्यें आल्यापासून मोकळेपणा वाटे. त्यांनां स्वतःला पिक्याडिली रात्रीच्या वेळेस धुंडाळाविशी वाटत असे, त्यांत त्यांचा कांहीं वाईट हेतु नसे, त्यांनां केवळ "सोशिआलाजी" अभ्यासावयाची असे त्यामुळेंच ते रात्रीं संशयित जागीं हिडतांना दिसत! ते हिंदु विद्यार्थ्यांनां असा उपदेश करीत कीं, बीज पेरून ठेवा. पुढची पिढी हिंदु-स्थानाविषयी सहानुभूति बाळगणारी होईल. या-प्रमाणें परस्त्रीगमन आणि वेश्यागमन हीं देशाभि-मानी कृत्ये आहेत असें ते दाखवीत असत. मोक्षा-साठीं पाप करा म्हणणारा रासपुतिन रशियांत झाला पण देशाभिमानासाठीं परस्त्रीगमन करा

असें म्हणणारे कांही हिंदुस्थानी पुढारी इंग्लंडमध्यें दिसतातच ! लालाजीच्या इतकी तीव्र देशभक्ति असलेले एक पुढारी त्यावेळेस पैशाच्या अडचणींत होते, आणि त्यांची उपजीविका विद्यार्थ्यांपासून पैसे उसने काढून ते परत द्यावयास विसरून आणि पुन्हां पैसे उसने काढण्यास दुसरा एखादा विद्यार्थी गांठून चालत असे. हे पुढारी विद्यार्थ्यांनां सांगत कीं इंग्रज हिंदुस्थानी बायकानां खराब करतात. तर तुम्ही त्याचा सूड घ्या; तुम्ही इंग्रज पोरी खराब करा. तसें करण्याने तुम्ही देशकार्यच कराल. असे बोलणारे पुढारी कांहीं तरुण विद्यार्थ्यांत लोकप्रिय होत यांत शंका नाहीं ! लालाजी जरी या प्रकारच्या पुढाऱ्यांचा व दुर्वर्तनी विद्यार्थ्यांचा निषेध करीत तरी ते त्यांच्या वर्तनपावित्र्याच्या लौकिकामुळे विद्यार्थ्यांत आदरणीयच झाले होते. अनेक गुण पाघळणाऱ्या पुढाऱ्यांनां इंग्लंड सोडतांनां त्यांचीं गुह्यें ठाऊक झालेल्या त्यांच्याच प्रांतांतील विद्यार्थ्यांची "इंग्लडांत ठाऊक झालेल्या गोष्टीची आठवण स्वदेशास जातांना इंग्लिश चानलमध्यें टाकून द्या" म्हणून ज्याप्रमाणे विनवणी करावी लागे तशी लालाजींनां करावी लागली नाहीं. व याशिवाय लालाजींच्याबद्दल आदर वाढण्यास दुसरा एक गुण कारण झाला. आणि तो म्हटला म्हणजे इंग्लंडमध्ये गेलेले अनेक पुढारी दुसऱ्या पुढाऱ्यांस सरकारचा हेर म्हणत किंवा सरकारकडून विशिष्ट कृपेची अपेक्षा असलेले मिंधे म्हणत. जर पुढारी नरम भाषणें करणारा असला तर तो सरकारचा मिंधा आहे असे म्हणावयाचें; आणि जर तो गरम भाषणे करणारा असला तर त्यास सरकारचा हेर म्हणावयाचे, याप्रमाणे इतर पुढाऱ्यांवर टीका करून आपण मात्र खरे देशभक्त आहोंत असे हिंदु विद्यार्थ्यांनां खास बैठकींत कांहीं पुढारी गुप्तपणानें सांगत. व त्यामुळें आपण आपली किमत विद्यार्थीमंडळींत वाढविली असे त्यांस वाटे. पण विद्यार्थी अशा पुढाऱ्याची किमत तत्काळ ओळखीत. लालाजी उघडपणें मनुष्याच्या तोंडावर जरी त्याची हजेरी घेण्यांत पटाईत होते तरी पाठीमागे आपल्या व्यवसायबंधूंची निंदा करीत नव्हते ही गोष्ट विद्यार्थ्यांस ठाऊक झाल्यामुळें त्यांचें विद्यार्थ्यांत वजन अधिकच वाढलें होतें.

लाला गजपतराय यांची एकंदरींत स्थिति जरा विचित्र झाली होती. आपण लंडनला हिंदुस्थानची केस मांडण्याकरतां जात आहो म्हणून इकडे सार्वजनिक निधीचे पैसे घेतलेले, त्यांतल्या त्यांत दुसरे कोणी जाण्यापेक्षां आपणच जावें, दुसरा कोणी काम बिघडवील अशी त्यांची व त्यांच्या अभिमानी मंडळीची भावना. पण बोटींत पाऊल ठेवतांक्षणींच त्यांच्या मनावर निराशेचे साम्राज्य उत्पन्न झालें. आपल्या प्रयत्नास यश येईल काय ? नाही, असेंच त्यांचे मन त्यांनां सांगूं लागले. बोटींत बसण्याचा हा त्यांचा पहिलाच प्रसंग होता असें नाहीं. राजकीय मिशनवर पूर्वी एकदां ते गेले होते, एकदां प्रिव्ही कौन्सिलपुढे केस लढण्यासाठीं गेले होते. व ते विद्यार्थी असतां अगदी तरुण वयांत गेले होते. तिन्ही वेळांपेक्षां त्यांच्या मनांत यावेळी अधिक साशंकता उत्पन्न झाली होती. स्वराज्य आपणांस पाहिजे असे आपण बोलत आहों, पण स्वराज्य चालविण्याची आपल्या लोकांच्या अंगीं खरोखर पात्रता आहे काय ? लाहोरच्या म्युनिसिपालिटीत आपण काम करीत होतो व आपणांस बऱ्याच लोकांचा पाठिंबा होता, तरी देखील आपण कितपत काम करूं शकलों. अधिक स्वच्छता ठेवण्यासाठी खर्चाची योजना करतांना आपणांस लोकांचें पाठबळ कितपत मिळे, व सुशिक्षित लोकहि घाणेरड्या शहराला स्वच्छ करण्यास कितपत तयार आहेत, इत्यादि गोष्टींचा विचार त्यांच्या मनांत येई. पुष्कळदां त्यांनां असेहि वाटे कीं, जर इंग्रजांनीं वारंवार फटके मारले नाहींत तर आपले लोक अगदीं

आळशीपणानें सार्वजनिक कामें करतील, व हाताखालचे अधिकारी लोकमतास बेफिकीर होतील. आपल्या लोकांनां आपल्या लोकांच्या मताची तरी किंमत किती आहे? एखादी चांगली लोकहिताची गोष्ट आपण कितीहि उरस्फोड करून सांगितली तरी पास होत नाहीं. पण डेपुटी कमिशनरकडून तसे डेमी ऑफिशिअली मत आले आहे असें सांगितल्याबरोबर हूं का चूं न करतां पास होतें. आणि या गोष्टींची आपल्याला जाणीव होऊन आपणच चांगल्या योजनांस कलेक्टरची संमति आणवून नंतर त्या पास करून घेतल्या की नाहीं. तर लोकांचें मन असे असतां आपण सुशिक्षित मध्यम वर्गातल्याहि अगदीं थोडया वर्गानें स्वराज्याची गोष्ट कशासाठी पुढे मांडावी! आपल्या लोकांनां स्वराज्य हवे आहे कीं इंग्रज राज्य हवे आहे? याविषयी विचार करतां आपल्या लोकांनां स्वराज्य हवे आहे असे म्हणण्याकडे त्यांचें मन धांवेना. जर आपल्या लोकांनां स्वराज्य नको आहे तर आपण स्वराज्याची मागणी करण्याची वकीली तरी कोणासाठीं पत्करिली! कंत्राटदारांनां कत्राटें देणारा एक्झिक्युटिव्ह एंजिनीअर यूरोपीयन असावा असें वाटते, शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांनां नेटिव्ह इन्स्पेक्टर असण्यापेक्षां यूरोपीअन इन्स्पेक्टरनें शाळा तपासावी असें वाटते, आईबापांनां आपला मुलगा कॉलेजांत पाठवावयाचा झाला तर ज्या कालेजांत प्रोफेसर यूरोपीयन असतील तिकडे आपला मुलगा शिकण्यासाठी ठेवावा असें वाटतें, पक्षकारांनां न्यायाधीश युरोपीयन असावासें वाटतें, आणि बऱ्याच सुशिक्षित वर्गास देशी लोकांचें प्राधान्य असलेल्या म्युनिसिपालिटींत रहाण्यापेक्षां क्यानटोनमेंट म्याजिस्ट्रेट कारभार करीत असलेल्या क्यानटोनमेंटमध्ये रहावेंसें वाटते, व सामान्य शेतकऱ्याला एवढेंच वाटतें कीं आपली दाद तहसिलदार बरोबर घेणार नाहीं, तर वरचा यूरोपीयन अधिकारीच लवकर घेईल. फार कशाला, प्रत्यक्ष सरकारविरुद्ध चळवळ करणाऱ्या वर्गास आपली केस यूरोपीयन म्याजिस्ट्रेटनेंच ऐकावी असे वाटतें, एवंच सर्व जनतेचा यूरोपीयन लोकांवर विश्वास आणि आपण तर स्वराज्य मागतों, तर आपण खरोखर प्रतिनिधि कोणाचे? आपण सुशिक्षित मध्यम वर्गाचे प्रतिनिधि म्हणवावें तर या वर्गास तर साहेबांचेंच महत्त्व विशेष आहे? हा वर्ग यूरोपीयनांच्या हाताखालींच काम करावयास तयार आहे. नेटीवांच्या हाताखालीं काम करण्यास कोठे तयार आहे? अर्थात जें स्वराज्य आपण मागत आहो तें आजची वास्तविक गरज म्हणून मागत नसून तें केवळ आपलें ध्येय म्हणून मागत आहों. आज आम्हांस स्वराज्य कां पाहिजे तर जगाच्या चढाओढीत हिंदुस्थानास अधिक कार्यक्षम करण्यासाठीं पण हिंदुस्थानास अधिक कार्यक्षम करण्याची बुद्धि लोकांस कोठें झाली आहे? आम्ही स्वराज्य. मागतें याचें खरे कारण तें मागणे बरे दिसतें म्हणून. तसे आम्ही मागत राहिलो म्हणजे लोक आपणांस चांगले म्हणतात, आणि आपणांस अधिक महत्त्वाच्या जागा मिळतील असें आपल्या लोकांस वाटते म्हणून. आम्ही मागतो याचे कारण प्रत्येक देशांतल्या लोकांवर राज्य त्या लोकांनींच करावे हे तत्त्व श्रेष्ठ आहे म्हणून. येणेप्रमाणें विचार लालाजीच्या मनांत घोळत होते. स्वराज्य हवे याविषयींच त्यांची खात्री होईना. मध्यें तर त्यांच्या मनांत असा विचार येऊं लागला की स्वराज्य असण्यापेक्षां नसलेलेंच बरें. स्वराज्य म्हणजे निरनिराळ्या जातींतून निघालेला आणि इंग्रजी शिक्षणामुळे सदृश बनला आहे अशा वर्गाचे राज्य या कृत्रिम वर्गामध्ये सर्व जनता एकवटली आहे काय? व या वर्गानें आपल्यापुढें ध्येय तरी काय ठेवावयाचें; याचा विचार करूं लागलो म्हणजे मारामारी आलीच. हिंदूंनां नागरीशी संबद्ध अशा लिपी पाहिजेत, मुसुलमानांस फारशी लिपी पाहिजे

तर हीं भांडणें कधीं तरी मिटतील काय? तर आपण स्वराज्य मागतो तें मागण्याचें सोडून देऊन आपला धंदा बरा व आपण बरें असें कां करूं नये, असाहि विचार त्यांच्या डोक्यांत येऊं लागला. पण थोडया वेळाने तोहि विचार गेला. कां कीं लालाजींनां असें वाटले कीं धंदा करावयाचा तो तर आपण करीतच आहोंत. रुक्ष धंद्यांत गढलो असतांना आयुष्यक्रमण करण्यास राजकारणाचा जो मिरचीमसाला उपयोगी पडतो तो कां घालवावा. असो. गजपतरायांचें त्या दिवशी आलेल्या पत्रांपैकी एका विशिष्ट पत्रानें लक्ष ओढलें होतें तें पत्र अमेरिकेहून आले असून त्यांत येणेंप्रमाणे मजकूर होता—

" प्रिय गजपतराय,

अमेरिकेमध्ये मी आल्याला एक वर्ष देखील झालें नाहीं. येथे स्थाईक झालेल्या मंडळीपैकीं सर्वांची ओळख झाली नाही. न्यूयॉर्क, बोस्टन, शिकागो,सानफ्रान्सिस्को इत्यादि ठिकाणीं जे आपले लोक आहेत त्या सर्वांची माहिती मला देतां येणार नाहीं. पुष्कळ मंडळींनां असे वाटते कीं, अमेरिकेस गेलेल्या दोन हिंदुस्थानी मंडळींची स्वाभाविकपणे ओळखभेट व्हावी, तसे होत नाही. न्यूयॉर्कपासून फ्रिस्कोपर्यंतचे अंतर म्हणजे मुंबई कलकत्ता या अंतराच्या तिप्पट तरी आहे हें विसरून कधीं कधी लोक आपणांस फ्रिस्कोच्या अमुक मनुष्यास अमुक सांगा म्हणून पत्रे लिहितात. येथें न्यूयॉर्कचा मनुष्य फ्रिस्कोची हिंदी मंडळीची बरीचशी बातमी हिंदुस्थानी पत्रांतूनच मिळवितो अशी स्थिति आहे. तथापि अलीकडे हिंदुस्थानी मंडळींचा अंतस्थ पत्रव्यवहार वाढल्यामुळें थोडी अधिक माहिती तडक एकमेकांस कळूं लागली आहे. मी तुम्हांस जी अमेरिकेतील हिंदी, मंडळी संबंधानें माहिती देत आहें ती मुख्यत्वेंकरून पूर्वेकडील लोकांसंबंधानें आहे. आणि जी मतें लिहीत आहे ती येथल्या अनेक मंडळींचीं मतें आहेत.

येथे हिंदी मंडळी थोडी आहेत पण त्यांत एकोपा नाही. अनेक कारणांवरून लोकांत द्वैत उत्पन्न झालें आहे. कांही मतविषयक द्वैत आहे तर कांहीं द्वैत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींमुळे आहे. येथील महाराष्ट्रीय व बंगाली विद्यार्थी यांचें नेहमीं जुळतें असें नाहीं. हिंदी मंडळींत आपणांस प्रामुख्य असावे अशी दोघांत स्पर्धा आहे तर कांही लोकांची भांडणें फार बारीक सारीक कारणांमुळें आहेत. अमेरिकन लोकांपुढे जर कांहीं नाटकबिटक करावयाचें झालें तर प्रत्येकास असे वाटते कीं आपल्या भागांतील चाली काय त्या शिष्ट व दुसऱ्याच्या अ[illegible]ांनां असें वाटतें कीं आपले लोक अधिक सुधारलेले व बंगाली लोक म्हणजे केवळ जंगली पण इंग्रजांनी त्यास सुधारलें. ज्याप्रमाणे रानटी लोक नागडेपणा सोडून दिला म्हणजे पाटलोण घालतात, पण धोतरवाल्यास पाटलोनीकडे जाणे जड वाटते, त्याप्रमाणें बंगाली लोकांच्या प्रगतीची स्थिति आहे, असें महाराष्ट्रीय देशबंधू बंगाल्यांच्या सुधारणेचे स्पष्टीकरण करतात. बंगाली मंडळींनां आपलें उच्चत्व स्थापन करणें सोपें आहे. ते सर जगदीश बोस, रवींद्रनाथ टागोर इत्यादिकांचीं नावे घेतात. बंगाली आणि मराठी वाङ्मयांत अधिक उच्च कोणते हा वाद न्यूयॉर्कच्या हिंदी मंडळींत संपावयाचा नाहीं. बंगाली कवीने नोबेल प्राईझ मिळविलें. पण तें खरोखर श्रीमंत टागोरची जाहिरात अधिक झाली म्हणून. नाहींतर महाराष्ट्रीय कवी त्यांच्या पेक्षाहि मोठे पडले आहेत. विवेकानंदाने केलेली राष्ट्रसेवा महाराष्ट्रीयांस मुळींच कबूल नाहीं. "त्यानें काय केलें" म्हणून ते विचारतात. रवींद्र टागोरच्या लोकप्रियतेची उपपत्ति ते येणेंप्रमाणें करतात: रवींद्राची कविता इंग्रजींत भाषांतरली गेली, त्यांत त्याने ईश्वरास "आई" म्हटलें ही गोष्ट इंग्रजास नवीन वाटली. आणि त्यामुळे त्याचा इंग्रजांनीं बडेजाव केला. पण ती कल्पना खरोखर रवींद्राची

नसून हिंदुस्थानांतील भक्तिसंप्रदायाची सामान्य कल्पना होती. कृष्णाई, विठाई असें मराठी कवी सातशे वर्षांपूर्वीच बोलले होते. तर सामान्य हिंदी-कल्पना रवींद्राच्या कवितेंत यूरोपीयांस प्रथम दिसल्या म्हणून रवींद्राची स्तुति केली. पण खरोखर रवींद्र कांहीं मोठा कवी नाहीं. एकंदर बंगाली वाङ्मय–मग तें कादंबऱ्या असोत–किंवा नाटकें असोत किंवा कविता असोत–तें पौरुषात्मक नाहीं. त्याच्यामध्ये बायकीपणा भरला आहे. आणि तो बायकी कोमलपणा रवींद्रांतहि आला आहे. असल्या तऱ्हेचें वाङ्मय यूरोपला नवीन वाटल्यामुळें यूरोपियन लोकांनीं त्याची स्तुति केली आहे. पण या तऱ्हेचे वाङ्मय खरोखर पहातां देशास अभिमानकारक न होतां ते लज्जास्पद झाले पाहिजे. कां की ते नाजुकपणाचा गौरव करणार आणि दौर्बल्याची जोपासना करणार! अर्थात रवींद्राचे वाङ्मय हिंदुस्थानांत प्रसार पावण्यास नालायख आहे. आणि आपटे यांच्या ऐतिहासिक वाङ्मयाचा कणखरपणा हिंदुस्थानच्या सर्व ठिकाणच्या वाङ्मयांत शिरेल तो सुदिन होय; महाराष्ट्रीयांची ऐतिहासिक भावना हिंदुस्थानांत शिरेल तो सुदिन होय; इत्यादि विचार महाराष्ट्रीय विद्यार्थी वारंवार बोलतात. येथील महाराष्ट्रीयांचा पुढारी म्हटला म्हणजे गोगटे नांवाचा एंजीनियर आहे. या गृहस्थाचे विचार वारंवार बदलतात, आणि त्याच्या वारंवार बदलणाऱ्या विचारांप्रमाणें सर्व लोकांनीं नाचावे असें त्यास वाटतें. हा दुसऱ्यांदां अमेरिकेला आलेला आहे. हा पूर्वी हिंदुस्थानांत कोणच्याशा कॉलेजांत फिजिक्सचा प्रोफेसर होता. आणि गीतेवरहि व्याख्याने देत असे. हा वयानें इतर महाराष्ट्रीयांपेक्षां वडील आहे आणि येथील कांहीं प्रसिद्ध महाराष्ट्रीय हिंदुस्थानांत असतां त्याचे विद्यार्थी होते. त्यामुळें याची प्रौढी ते चालूं देतात. (हा हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांनां मूर्ख पोरें म्हणतो) आणि इंग्रज त्यांनां केवळ बागडवीत आहेत असें म्हणतो. हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांनां राजकारणाची तर ए. बी. सी. अजून शिकावयाची आहे असें म्हणतो, अर्थात हा सर्वज्ञासारखा वागतो. आपण येथें येऊन काय उपदेश करणार म्हणून प्रश्न विचारतो, तथापि आपण येणार आहां म्हणून आनंद दाखवितो, व त्याचे कारण काय तर येथें दोन गोष्टी शिकून जाल आणि हिंदुस्थानांतल्या पुढाऱ्यांचे कान उपटण्यास उपयोगी पडाल! त्यांनीं अलीकडे जुन्या स्थानिक हिंदी मंडळींनां कांग्रेसच्या अभिमानी मंडळीपासून निराळे करण्यासाठीं सेटलर्स असोसिएशन म्हणून काढली आहे आणि तिचे प्रो. गोगटे हे स्वतः अध्यक्ष झाले आहेत." या पत्रांतील पुढील मजकूर जरा अधिक खासगी स्वरूपाचा असल्यामुळें तो येथें देत नाहीं. हें पत्र वाचल्यावर लालाजी कांहीं वेळ त्यावर सचिंत मुद्रेनें विचार करीत बसले. इतक्यांत त्यांस दुसऱ्या एका पत्राची आठवण झाली. तेव्हां त्यांनीं तें पत्र पुन्हां एकदां पाहिलें आणि खिशांतून घड्याळ काढून दहा वाजावयास किती अवकाश आहे तें पाहिलें. ते पत्र पुढीप्रमाणें होतें–

"प्रिय गजपतराय,

मी येथील एक महाराष्ट्रीय व्यापाऱ्याची पत्नी आहें. मी उद्यां आपणांस एका दुसऱ्या महाराष्ट्रीय स्त्रीस घेऊन भेटावयास येईन. या स्त्रीस आपल्या नवऱ्यास जाऊन मिळण्यासाठीं अमेरिकेस जावयाचें आहे, आणि आपणहि अमेरिकेस जाणार आहांत तर आपणां उभयतांची ओळख व्हावी. आणि शक्य झालें तर त्या बाईनीं आपण ज्या बोटीनें जाणार असाल त्याच बोटीने जावें असा इरादा आहे. हे वि. आपली

नर्मदाबाई गोळवलकर

हें पत्र वाचल्यानंतर लालाजी आपणांस भेटावयास येणाऱ्या व्यक्तींचीच वाट पहात बसले. पण त्यांनां फारशी वाट पहावी लागली नाहीं. घराच्या

पुढचा दरवाजा ठोठावला गेला आणि नंतर दोन मिनिटाच्या आत घरच्या मोलकरणीने, दोन हिंदी स्त्रिया भेटावयास आल्या आहेत म्हणून सांगितले, आणि तें ऐकून लालाजींनीं सामोरे जाऊन त्यांस सत्कारपूर्वक दिवाणखान्यांत आणून कोचावर बसावयास सांगितले.

लालाजी इंग्रज स्त्रियांबरोबर मोकळेपणानें व सहज बोलत असत, पण हिंदु स्त्रियांशीं त्यांस सहज बोलतां येईना. ते एक मिनिटभर स्तब्ध बसले. तेव्हां आलेल्यांपैकी एकीने "आम्हांस यावयास जरा उशीर लागला नाहींना?" अशा प्रश्नानें स्तब्धतेचा भंग केला.

"छे! छे! दहा मिनिटे उशीर म्हणजे कांहीं फार नाही. निदान इंडियन मंडळींनां तरी तो फार वाटावयाचा नाहीं." लालाजी उत्तरले. व ते पुढे म्हणाले "अमेरिकेला तुमच्यापैकीं कोण जाणार?"

"ही स्त्री जाणार" म्हणून बोलण्यास सुरवात करणारी स्त्री दुसरीस उद्देशून म्हणाली.

"आपण आपल्या पतींनां जाऊन मिळणार - आपले पति अमेरिकेत स्थाईक झाले आहेत काय? ते काय करतात तेथे?"

"ते स्थाईक झाले असेच म्हटले पाहिजे. ते काय काम करतात हे मला बरोबर माहीत नाहीं. आज नऊ वर्षे ते तिकडे आहेत, त्यांच्याकडची बातमी मला अनेक वर्षे मिळत नसे. सध्या ते कोणच्याशा कारखान्यांत काम करतात एवढेच कळतें."

"आपले परदेशास गेलेले तरुण आपल्याच कुटुंबाविषयीं किती बेफिकीर असतात पहा! ९ वर्षे परदेशांत रहावयाचें आणि आपली हालचाल आपल्या बायकोपासून गुप्त राखावयाची--त्याला तसेंच कांहीं तरी कारण पाहिजे, मला आपल्याविषयीं फार वाईट वाटतें. अनेक वाईट गोष्टी समजण्यास तुम्हीं आपलें मन घट्ट केलें पाहिजे. घरीं बायकोला टाकून देऊन एका रखेलीबरोबर रहाणारे तरुण तेथें कितीतरी आहेत."

"माझ्या नवऱ्याची निंदा माझ्या समोर न करण्याची कृपा आपण करावी."

"अहाहा! हिंदु स्त्रीचे खरे अंतःकरण येथें दिसून येतें. महाराष्ट्रा, तुझ्या स्त्रिया अजून प्राचीन ध्येयापासून सुटल्या नाहीत, नवरा कर्तव्यपराङ्मुख झाला तरी त्यास दोष दिलेला महाराष्ट्रीय साध्वीस आवडत नाहीं."

"पण माझे पति कर्तव्यपराङ्मुख झाले नाहींत. त्यांच्या कर्तव्याच्या कल्पना निराळ्या असतील एवढेंच."

"म्हणजे?"

"आमच्या भगिनीचे यजमान राज्यक्रांतीच्या खटपटींत सांपडले होते, आणि त्यामुळें त्यांस हिंदुस्थानांत जातां आले नाहीं." असें मध्येंच नर्मदाबाई बोलल्या.

गजपतराय एकदम म्हणाले "काय, राज्यक्रांतीच्या बाबतीत? छे! छे! मी आपल्या पतीविषयीं विनाकारण दुष्ट कल्पना केली; आपलें नांव काय बरें?"

"मिसेस् रुक्मिणी परभणीकर."

"परभणीकर हें नांव मला स्मरतें, सध्यां ते मेक्सिकोकडे आहेत कीं अमेरिकेत आहेत हे मात्र मला ठाऊक नाहीं."

"त्यांना अमेरिकेस यावयास परवानगी मिळाली आहे. अमेरिका महायुद्धांत इंग्लंडला मिळाली तेव्हां ते मेक्सिकोला गेले. आतां ते परत अमेरिकेला गेले आहेत."

"आपण जर मजबरोबर जाऊं इच्छीत असाल तर मला आनंद होईल, पण माझें जाणें आतांच होतें कीं कांहीं महिन्यांनीं होतें हें मला सांगतां येत नाहीं. आपण यांच्यासंबंधानें आणखी पत्रव्यवहार ठरवूं."

---

## प्रकरण ७ वें.

## रघुनंदन आणि लीला.

रघुनंदन कामत यास उत्साही अमेरिकन तरुणाचा उत्तम नमुना म्हणतां येईल. याचें बहुतेक शिक्षण न्यूयॉर्कमध्येंच झालें होतें, आणि हा कोलंबिया युनिव्हर्सिटीचा अंडर ग्रयाज्युएट असतांना अट्टल खेळाडूंमध्यें मोडला जाई. पांच फूट अकरा इंच उंची, शरीरयष्टि सडपातळ पण मजबूत, आणि चापल्य चांगलें, यामुळें तो फुटबाल चांगला खेळे, पण त्याचें वैशिष्ट्य होडी वल्हविण्यांत दृग्गोचर झालें असून कोलंबिया व कॉर्नेल यांच्या "बोटरेस" मध्यें कोलंबियाच्या तर्फेनें हा खेळला होता, आणि त्यामुळें कॉलेजच्या तरुण मडळीमध्यें बराच लोकप्रिय होता. तसाच हा ज्यूनिअर बी. ए. मध्यें असतांना आपल्या वर्गाचा व्हाईस प्रेसिडेंट झाला होता. या निवडणुकीमध्यें त्याला विद्यार्थिनींचीं बरींच मतें मिळालीं होतीं कां कीं हा मुलींमध्यें बराच लोकप्रिय होता. हा पक्का "फासर" म्हणून ठरला होता. अनेक मुलींमध्यें जाऊन गप्पा मारावयाच्या, त्यांत चावटपणाचीं, म्हणजे अश्लील न होतां प्रेमाचीं—पण नाटकी प्रेमाचीं भाषणें करावयाचीं पण तीं सर्व आपलें हृदय न गमावतां करावयाचीं, पोरींमध्यें बागडावयाचें पण ते सर्व, माजरीचीं पिल्लें एकमेकांशीं खेळत असतां जशीं बागडतील तसें बागडावयाचें, इत्यादि गोष्टींमध्यें तो पुरा वाकब होता, हा "टोबोगनिंग"चाहि भोक्ता होता. टोबोगनिंग म्हणजे एका मोठ्या उंच उतरणीवरून घसरत जाणें. उतरणीवर बर्फ पडून ती उतरण पुरी निसरडी झाली म्हणजे वरून टोबोगन सुटतें आणि ती मोठ्या वेगानें टेंकडीच्या तळाशीं येते. यांत थोडासा धोका असतो पण त्या धोक्यामुळेंच तो खेळ लोकप्रिय होतो. रघु टोबोगनिंगचा भोक्ता होता, तरी आपल्या पुढें किंवा पाठीशीं एखादी तरुण मुलगी असल्याशिवाय "टोबोगनिंग" तो अपूर्ण समजे. टोबोगन घसरणीवरून घसरतां घसरतां वेगांत आली म्हणजे मुलगी अर्धी आनंदयुक्त आणि अर्धी भीतियुक्त किंकाळी देई. किंवा किंकाळी दिल्यानें फलप्राप्ति काय होतें हें समजून किंकाळी देई. अर्थात त्या किंकाळीचें फळ म्हणजे मुलीच्या पाठीशीं असलेला तरुण मुलीला निर्भयत्व देण्यासाठीं आपल्या बाहुपाशांत घट्ट धरतो हें होय. तरुण मुलींनां याप्रमाणें निर्भयत्व देण्याची आमच्या रघुनंदनास फार आवड होती. स्केटिंगमध्येंहि रघुनंदनानें प्राविण्य मिळविलें होतें. रघुनंदनाचें बी. ए. पर्यंतचें शिक्षण चालू असतांच त्याची आणि मत्तमयूरीची गांठ पडली. तीं दोघें फिरावयास एकत्र गेलीं तर विजोड दिसत नसत. मयूरी जरी त्याच्यापेक्षां वयानें थोडी मोठी होती तरी तो उंच होता आणि त्यामुळें तीं दोघेजण एकत्र असतां विजोड दिसत नव्हतीं. मत्तमयूरीचा हिंदु पोषाख, तिची भरजरीची साडी, आणि तिच्या कानांतील पाणीदार मोत्यांच्या कुडयांनीं खुलणारें तिचें मुख आणि हिंदुस्थानांतील गौरवर्ण मुलींचा सुंदर नमुना शोभणारी तिची कांति, याप्रकारचें एकंदर स्वरूप पाहून तिला आपल्याबरोबर घेऊन फिरावें असें रघूस वाटलें. आणि विशेषें करून जेव्हां तो तिला कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या एका सामाजिक प्रसंगीं बरोबर घेऊन गेला त्या वेळीं त्या दोघांच्याकडे सर्व लोकांचें लक्ष लागलें. हिंदु मुली अमेरिकन लोकांनीं क्वचितच पाहिल्या होत्या, त्यांत जर हिंदु मुली कोणी पाहिल्या असतील तर त्या गरीबींत वाढलेल्या आणि मिशनची स्कॉलरशिप घेऊन गेलेल्या, अशा असत पण हिऱ्यामोत्यांचे दागिने अंगावर घालणाऱ्या उंची शालू नेसणाऱ्या गौरवर्ण व शरीरमंडनाच्या विद्येंत कुशल व अत्यंत मोहक हास्यानें युक्त अशी मुलगी तर कोणाच्याच

दृष्टीस पडली नव्हती त्यामुळें मत्तमयुरीकडे सर्वांचें लक्ष ओढलें गेले यांत नवल नाही. त्यांनां असे वाटले की अरेबियन नाईट्समधील ही कोणी ओरिएंटल राजकन्याच अवतरली आहे काय? अर्थात याप्रकारच्या मुलीच्या हातांत हात घालून हिंडण्यामध्ये कोणत्या तरुणास अभिमान वाटणार नाहीं ! कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या प्रेसिडेंटपासून अनेक लहानथोर परिचितांनी रघुनंदनाकडे स्मितयुक्त पण अर्थपूर्ण मुद्रेनें पाहून त्याचें स्वागत करण्यास कमी केलें नाहीं. थोडयाच दिवसांत कोलंबिया युनिव्हर्सिटीभर नवीन दिसलेल्या मुलीचा बोलबाला झाला. "तू कामतची 'गर्ल' पाहिली आहेस कां" म्हणून जो तो एकमेकांस विचारी. रघुनंदन तरुण मुलीशीं ओळखी करण्यांत आणि प्रेमसाधनांत कौशल्य दाखविण्यांत एकाएकीं पटाईत झाला नाहीं. त्याला हा गुण यत्नाने पैदा करावा लागला, आणि तो आईबापांच्या नकळत करावा लागला. रघुनंदन आणि लीला यांनीच बरोबर फिरावयाला जावें ही कामत यांच्या घरची शिस्त होती. दुसऱ्या कोणा तरी मुलीबरोबर रघुनंदन यानें जावें आणि कोणा तरी अमेरिकन मुलाबरोबर लीलेनें जावें हे गोविंदराव कामत आणि शांताबाई यांस नको होतें. पण भावांबहिणींनी बरोबर फिरायला जाणें हे दोघांसहि मिळमिळीत वाटे. लीलेस स्वतःच्या भावाबरोबर फिरावयास जाण्यापेक्षां दुसऱ्या कोणातरी मुलीच्या भावाबरोबर फिरणें अधिक प्रिय होते. पण आईबाप याला बरेच विरुद्ध. रघुनंदनाची स्थितीहि याचप्रमाणें होती. रघुनंदनला शेवटीं लीलेस आपल्या विश्वासांत घ्यावें लागले. व कांहीं दिवस या दोघां बहीणभावांबरोबर कधीं कोणी मुलगी तर कधीं कोणी तरुण मनुष्य असावा अशी सुरवात झाली कधीं कधीं विष्णु सरंजामे यांची रस्त्यांत गांठ पडे. लीला व रघु या दोघांनांहि तरुणाशा व तरुणांशीं पत्रव्यवहार करावयाला पाहिजे होता. पण तो आईबापांच्या नजरेस पडावयास नको होता. तेव्हां रघुनंदन कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या पत्त्यावर आपली पत्रे मागवी. तर लीला पोष्टमास्तरच्याच पत्त्यावर पत्रें मागवी. अमेरिकन विद्यार्थ्यांबरोबर लीला कधीं कधी फिरायला जाई व रघुनंदन अमेरिकन मुलींबरोबर जाई, पण त्यांतल्यात्यांत असें होई कीं, लीलेनें अमेरिकन विद्यार्थ्यांबरोबर फिरावयास जावयाच्या ऐवजीं हिंदुस्थानी तरुणांबरोबरच फिरावयास जावें असें रघूस वाटे, आणि तसेंच उलटपक्षीं लीलेस वाटे. तथापि न्यूयॉर्कमध्ये हिंदुस्थानांतले विद्यार्थी पुष्कळ होते; विद्यार्थिनी अगदीं थोडया होत्या आणि त्या सर्व रघूपेक्षां वयानें बऱ्याच अधिक होत्या. त्यामुळें लीलेस, केवळ हिंदु मुलींची संगति तू धरावीस असा रघूस आग्रह करतां येईना.

जेव्हां मत्तमयूरी न्यूयॉर्क येथें आली तेव्हां लीलेस आनंद झाला. आणि आपल्या भावास तिच्याबरोबर जितके जास्त हिंडायला मिळेल तितकें मिळूं द्यावें असें तिनें ठरविलें. आणि त्या दोघांचें प्रेम जितके जुळवून देतां येईल तितके चांगले असें तिला वाटून तिनें या मार्गांत आपण साहाय्यक होण्याचा प्रयत्न केला. पण प्रेमाचा व्यवहारच असा आहे की त्या बाबतीत दुसऱ्यांचे साहाय्य कधीं कधीं काम बिघडवितें ! व तसेंच या वेळेस होण्याचा प्रसंग येणार होता. मत्तमयूरी अमेरिकन अनुनयखेलास अपरिचित होती. अनुनय करण्याचा प्रयत्न करणें ही गोष्ट देखील तिला जरा अयोग्यपणाची भासत होती, त्या मत्तमयूरीस त्यावेळचे अनुनयखेल म्हणजे अंतःकरण शाबूत ठेवून केलेले नुसते अनुनयाचे चाळे आहेत हे कसें समजणार! प्रेम नसतांना जो प्रेमाविर्भाव करावयाचा तो तिला रसिक मनुष्याचा अनुनयखेल वाटण्याऐवजीं "खोटें प्रेम दाखविण्याची

लबाडी " वाटूं लागली, आणि ती त्याच्या-संबंधानें वाईट मत बनवून घेऊं लागली. याच-वेळेस लीलेनें थोडी घाण केली! "तुमचें एक-मेकांवर प्रेम जडत चाललें आहे. संभाळा बरें काय होईल तें! रघू, तूं अजून पैसे देखील मिळवूं लागला नाहींस. इतक्यांतच देखणी मुलगी पाहिली की तिच्याशीं प्रेम जुळवावयाचें व त्या मुलीला तुला पैसा मिळेपर्यंत ताटकळत ठेवायचें हे ढंग कांहीं चांगले नाहींत!' असे लीलेनें बोलावे" या तऱ्हेचे लीलेचे बोलणे मयूरीनें ऐकलें म्हणजे तिला असें वाटे कीं, मी त्याची बायको व्हावी अशी रघूची खरोखरच इच्छा आहे, पण त्याच्या हृदयांत खरें प्रेम तर नाहींच, तेव्हां तो करीत असलेले प्रेम प्रदर्शन हे सर्व नाटकी सोंग आहे. त्याला इतर मुलींचीं जशीं चुंबने घ्यावयास पाहिजेत, तसेच जरा तोंडपालट म्हणून माझेंहि चुंबन घ्यावयास पाहिजे, पण हा कांहीं माझ्यावर खरोखरच प्रेम करीत नाही. तर मग माझ्याशी इतकी लगट कां, त्याचें प्रेम माझ्या-वर जडलें आहे अशी कल्पना करून मी त्याच्या मागें लागावें एवढया करतांच याचे प्रेमाचें नाटक चालू आहे.

मत्तमयूरीस रघुनंदन कामत याविषयी साशंक होण्यास दुसरें एक कारण झालें. मि. कामत यांच्या-कडे एकदां जेवणाच्यावेळीं मुंबईच्या गोष्टी निघाल्या. त्या वेळेस गोविंदराव कामत यांनीं तिच्या वडिलांच्या अनेक गोष्टी सांगितल्या. त्यांत ते प्रार्थनासमाजाचे सभासद असतां कांहीं कार-णामुळें रागावून त्यांनीं प्रार्थनासमाज कां सोडला आणि प्रार्थनासमाजाची मंडळी बोलण्यापुरती जातिभेदाच्या विरुद्ध आहेत, पण कृतीची वेळ आली म्हणजे जातीकडेच काय पण पोटजाती-कडे लक्ष देतात इत्यादि गोष्टी डॉक्टर पांडुरंग बोलत इत्यादि गोष्टी सांगितल्या. आणि गोविंद-राव कामत यांनी तें त्यांचें म्हणणें अक्षरशः खरें होतें म्हणून आपलें मत दिलें. त्याच वेळेस लीलेनें डॉ. पांडुरंग यांची जात कोण असा प्रश्न केला, तेव्हां गोविंदरावांनीं त्या प्रश्नाकडे लक्ष न देतां पुढे बोलणे चालविलें. व लीलेचा प्रश्न ऐकून शांताबाईंनीं डोळे वटारले व हा प्रश्न विचारूं नको म्हणून तिला खुणविलें. मत्तमयूरीच्या तेहि दृष्टीस पडलें. तेव्हां तिच्या मनाला असें वाटले कीं आपली सर्व कुळ-कथा गोविंदरावास माहीत आहे व ती रघूसहि माहीत असेलच तर आपण जरा अघळपघळ वर्तनाच्या कुलांतील स्त्री आहों असें तर रघुनंदन सम-जत नसेलना? आणि मयूरी ज्याअर्थी स्वाभि-मानी स्त्री होती त्याअर्थी तिनें रघुनंदनपाशीं अत्यंत तुटकपणाचें वर्तन ठेवण्यास सुरवात केली. रघुनदनला, मयूरी आपल्याशीं अत्यत तुटक-पणाने कां वागते हे समजेना, आणि त्यानें जरी यासबंधाने तिला प्रश्न केला तरी तिला आपल्या मनांतील संशय त्यास स्पष्ट करून सांगतां येईना.

मयूरी जेव्हां प्रथम अमेरिकेस गेली तें साल १९१४ होते. त्यावेळेस ती वीस वर्षांची होती व हिंदुस्थानांतील मेडिकल कॉलेजमध्ये तिचे दोन तीन वर्षाचे शिक्षण झालें होते. त्यावेळेस रघु हा तिच्यापेक्षां २ वर्षांनीं लहानच होता आणि लीला ही सोळा वर्षांची होती. त्यामुळें जेव्हां प्रथम मयूरी आाण रघु ही बरोबर बाहेर पडलीं त्या-वेळेस रघु हा लहान मुलगा आहे याला मयूरी-बरोबर जाऊं देण्यास कांही हरकत नाही असेच मि. कामत आणि शांताबाई यांस वाटलें आणि रघूचे जे चाळे "कोने आयलंड"मध्यें सुरू झाले ते लहान मुलाचे प्रेमाचे चाळे म्हणून मयूरीस प्रथम गंमतच वाटली असावी. आणि तिनें त्यास थोडेसें प्रोत्साहनहि दिलें असावे. रघूनें "माय-डार्लिंग" म्हटले तेव्हां मयूरीने देखील मौजेनें "माय स्वीटहार्ट" असे म्हटले. रघूशी जेव्हां तिचें वर्तन जरासें तुटकपणाचें होऊं लागलें तेव्हां रघु अधिकाधिक आकर्षिला जाऊं लागला.

त्याच्या परिचयाचे स्मितयुक्त मुख त्याला दिसेना. मत्तमयूरी दुसऱ्या लोकांशी बोलताना स्मितयुक्त बोले, पण रघूशीं बोलतांना गभीर मुद्रा करी, तें पाहून त्यास खरोखरच दुःख होऊं लागलें. मयूरी यापूर्वी जेव्हां रघूबरोबर फिरावयास जात होती तेव्हां एकसारखी स्मितयुक्तच नव्हती. कधीं रागाची मुद्रा दाखवी तर कधीं रुसल्याची मुद्रा दाखवी. पण ती रुसल्याची मुद्रा देखील इतकी मोहक दिसे की रघूला तीच अधिक आकर्षक होई, आणि ती मुद्रा तिचें चुंबन घेण्यास त्यास प्रवृत्त करी.

मयूरी न्यूयॉर्क सोडून शिकागोला गेली आणि तेथील वैद्यकशाळेंत अभ्यास करूं लागली. ती न्यूयॉर्क येथें असतांना तिच्या सहवासाचा मक्ता रघूनें घेतला होता, आणि मयूरी रा. कामत यांच्याकडे पाहुणी होती त्यामुळे रघूस तो मक्ता घेतांहि आला आणि न्यूयॉर्कच्या दुसऱ्या अनेक मंडळींस केवळ संध्याकाळच्या तास अर्धातास भेटीवर संतुष्ट व्हावें लागलें. पण मयूरी जेव्हां शिकागोला गेली तेव्हां तिला अनेक मंडळींस भेटण्याचें स्वातंत्र्य होतें, आणि त्या स्वातंत्र्यास तिनें उत्तेजनहि दिलें. न्यूयॉर्क येथें ती स्वतंत्र-पणे रहात नव्हती त्यामुळे तिचे हिंडणेंफिरणे किंवा इतर लोकांबरोबर वागणें यावर गोविंदरावआणि शांताबाई यांच्या सान्निध्याचा दाब पडे. तो दाब शिकागो येथें नव्हता. ज्याप्रमाणें पुष्कळ तरुणांस जितक्या तरुणींबरोबर ओळखी होतील तितक्या हव्याच असतात त्याचप्रमाणें मयूरीची स्थिति होती. शिकागो येथें तिला स्वतंत्र गृहिणीसारखे वागतां आलें. तिच्यापाशीं खर्च करायला पैसा होता. आणि मंडळींनीं आपल्याकडे यावें इत्यादि गोष्टींची तिला आवड होती, यामुळें थोडक्याच दिवसांत तेथील बहुतेक सर्व हिंदी तरुणांशीं तिचा लौकरच परिचय झाला. ती आपल्याकडे "हिंदु जेवण" करी. त्या जेवणाची उत्सुकतेनें सर्व हिंदुस्थानी मंडळी वाट पहात असत.

मयूरीला रघूचे प्रेमाचे चाळे म्हणजे मुग्धत्व आणि यौवन याच्या दरम्यान असलेल्या पोराचे चाळे वाटले. ती रघूला पोरगाच समजे आणि हा पोरगा इतक्या लहान वयांत आईबापांच्या दुर्लक्षामुळे चावट झाला आहे, याच्या प्रेमांत खोलपणाहि नसणार आणि हा उद्यां दुसऱ्या एखाद्या मुलीकडे जाणार. याच्या अनुनयाकडे लक्ष देण्यांत अर्थच नाहीं, याचा चावटपणा आतां थोडें दुर्लक्ष आणि ताठरपणा दाखवून बंद केला पाहिजे असे तिनें मनांत योजिलें. याशिवाय आपल्यापेक्षां कमी वयाच्या तरुणाला नादीं लावल्याचा दोष आपल्यावरच येईल असेहि तिला वाटे.

रघूविषयीं तिची याप्रकारची वृत्ति असल्या-मुळें ती त्याच्या पत्रांना उत्तरहि देईनाशी झाली. तिचें उत्तर जसजसें दुर्लक्षाचें होऊं लागलें तसतशीं रघूचीं पत्रें अधिकाधिक भावनापूर्ण होऊं लागलीं. पहिली पत्रे " तूं वेडी मुलगी आहेस, मुलींबरोबर मुलांचें वर्तन कसें असावें याविषयीं तुझ्या कल्पना हिंदुस्थानी असतील, पण माझ्या अमेरिकन आहेत. इत्यादि अर्थाचीं होतीं. " पुढे " तुला मी लहान मुलगा वाटतो काय आणि माझ्या वागण्याचा तूं रागहि मानीत नाहींस, किंवा त्याला फारसें महत्त्वहि देत नाहींस असे तूं म्हणतेस, ते वाचून मला वाईट वाटतें. जे तरुण आहेत त्यांचे प्रेमशब्द विश्वसनीय नाहींत असें वाटतें काय ?" अशा अर्थाची वाक्यें असत. या पत्रांमध्यें केवळ प्रेमाचीच भाषा किंवा चर्चा होती असें नाहीं. घरची बातमी असे, गंगाधर-पंतांची चौकशी असे आणि त्याचप्रमाणें कॉले-जची बातमी देखील असे. "कोलंबिया आणि कार्नेल" यांची जी बोटरेस होईल ती बोटरेस तूं पहावयास आलें पाहिजे" असें एका पत्रांत आमंत्रणहि होतें. दुसऱ्या एका पत्रांत ती बोट-रेस पहावयास मयूरी आली नाहीं म्हणून दुःख प्रद-र्शित केले होतें—"माझ्या खेळामध्यें मीं जें प्रावीण्य

मिळविलें तें प्राविण्य पहाण्याची जिज्ञासा तुला कशी नाहीं? अमेरिकन मुली खेलपटूंवर किती आसक्त होतात आणि तुला खेलपटूची मुळींच किमत नाही. बोटरेसच्या अखारांमध्ये मी आलों म्हणून येथील हिंदी मंडळींपैकीं कांहींनां अभिमान तर कांहीनां मत्सर वाटत आहे, व तुला माझ्या या यशाविषयीं कांहींच वाटत नाहीं काय?" म्हणून तिच्याविरुद्ध तक्रार त्या पत्रांत होती. त्याला तिनें उत्तर दिलें नाहीं. पुढे कांहीं दिवस त्यानेच पत्रव्यवहार रागावून बंद केला होता. तो पत्रव्यवहार अगदीच बंद पडणे मयूरीस नको होतें. म्हणून तिनेहि एक पाऊल पुढें टाकलें. त्याच सुमारास तेथील पत्रामध्ये या बोटरेसचे वर्णन आलें होतें. आणि त्या वर्णनांतच रघूची स्तुति आली होती तेव्हां त्या वर्तमानपत्रांतील उतारा कापून त्याच्याच बाजूला 'हुशार छोकरा' असे लिहून तो तुकडा मयूरीनें रघूकडे पाठविला.

मयूरीची रघूसंबंधानें जी वृत्ति होती तिचे ती शिकागो येथे होती तोपर्यंत स्वरूप येणेप्रमाणे होतें. उंच, देखणा, चपळ मुलगा या दृष्टीनें तिला तो आवडत होता, आणि तिला साधारण आवडत्या कुत्र्याचें गळ्यांत हात घालणे किंवा चाटणे हे जसें आनंददायक होते तसे तिला रघूचे बागडणें किंवा गोजारणे आनंददायक होई. पण त्यानें फार पुढे जाऊं नये असें तिला वाटे. प्रियकर या नात्यानें रघूचा स्वीकार करावयास ती तयार नव्हती, ज्यास आपण प्रियकर म्हणून कबूल करावें तो आपल्यापेक्षां वयानें मोठा असावा, आपल्यापेक्षां अधिक सुशिक्षित असावा, आणि शक्तीने देखील तो असा असावा कीं, ज्याला आपण आपलें आश्रयस्थान समजूं. ज्याच्या रुंद छातीवर आपण डोके टेकलें आहे आणि जो आपली समजूत करीत आहे अशा तऱ्हेचें कल्पनाचित्र ज्याच्याविषयीं काढतां येईल अशा तऱ्हेचा प्रियकर तिला हवा होता. रघु उंच होता तरी तिच्या इतर कल्पनांशीं तो जुळता नव्हता. तो प्रियकर म्हणून जरी तिला कबूल नव्हता तरी त्याच्याशी स्नेहसंबंध असावा, त्याची जगांत बढती व्हावी व ती आपण वडील बहिणीप्रमाणें कौतुकानें पहावी असेहि तिला वाटे. त्यानें आपणांस आपलें प्रेमपात्र समजूं नये अशी जरी तिची इच्छा होती तरी त्याची प्रेमयुक्त वाक्यांनीं भरलेली पत्रे तिला नकोशीं होतीं असें मुळींच नाहीं. प्रेमपत्रे हा एक करमणुकीचा भाग म्हणून तो चालूच राहिला तर तिला हवा होता, आणि तिला असें वाटे कीं, रघूनें प्रेमाचीं पत्रें चालूंच ठेवावीं, आणि आपण त्यास स्नेहयुक्तता दाखवावी पण प्रेम दाखवूं नये.

प्रेम आणि तदुत्तर विवाह ही गोष्ट हिंदुस्थानांत नसल्यामुळें आणि अमेरिकेंत असल्यामुळे मयूरी प्रेमाचा व्यवहार समजण्याविषयीं कांही अंशी उत्सुक असे. तिला याविषयीं एकंदर जिज्ञासा पुष्कळ असल्यामुळे तिने विवाहविषयक, प्रेमविषयक व संसारसुखविषयक पुस्तकें पुष्कळच वाचली. ती अनेक प्रकारचीं होतीं. त्या पुस्तकांत कांही प्रेमी जनांनीं एकमेकांशीं कसें वर्तन ठेवावें हें सांगणारी होतीं. कांहीं तरुण मुलींसाठीं अनुभवी स्त्रियांनीं लिहिलेलीं होतीं कांही विवाहविषयक आंकडेशास्त्र सांगणारी होती. त्यांतल्यात्यांत तिचे एका पुस्तकाकडे लक्ष गेलें. त्यांत असें दिले होतें की, स्त्रियांचीं लग्नें व पूर्वकालीन प्रेम यांत संबंध थोडाच असतो. लग्ने ज्या आर्थिक नियमांप्रमाणे होतात ते नियम म्हटले म्हणजे, मनुष्य मिळवता असला म्हणजे लग्न करतो. एखाद्या विशिष्ट गांवांत होणारी शंभर लग्ने घेतलीं (लग्ने बहुतेक मुलीच्याच घरीं म्हणजे गांवी होतात) तर त्या लग्नांपैकीं शेंकडा ६५ लग्ने त्या गांवांत धंदा किंवा नोकरी करणाऱ्या लोकांशी होतात, शेकडा १५ त्या गांवाच्या आसपासच्या शेतांत काम करणाऱ्यांशी होतात आणि उरलेलीं लग्नें वाटेल तिकडच्या पुरुषांबरोबर होतात. म्हणजे शेंकडा ८० पुरुष लग्ने मिळवते

झाल्यानतर करतात आणि ते मिळवते झाले म्हणजे त्यावेळेस ज्या स्त्रिया त्यांच्या आसपास असतील त्यांच्याशींच करतात. असें जर आहे तर तरुण वयांतील प्रेमसाधनेची किंमत ती काय असा प्रश्न मयूरी आपल्या मनास विचारूं लागली.

आज रघुनंदनाच्या दृष्टीस मी पडल्यामुळें तो मजकडे आकर्षिला जात आहे, पण उद्यां तो कामधंदा करायला लागेल तेव्हांच तो लग्नाचा विचार करणार, त्यावेळेस ज्या गांवांत तो रहात असेल त्या गांवातल्या तरुणीवर त्याचे प्रेम जाणार, ती त्यास दररोज दिसणार आणि त्यावेळेस मी मुंबईत असणार, इत्यादि गोष्टी मयूरीच्या मनांत आल्यावांचून राहिल्या नाहींत. त्यांतल्यात्यांत तिला असें वाटूं लागले कीं, आपण इस्टेटवाली बाई आहोंत व पुन्हां डाक्टरीण म्हणून आपण पैसे मिळविणार,तर जो पुरुष अमेरिकेलाच जन्मला आणि अमेरिकेसच रहाणार त्याच्याशी आपले लग्न झाले तर आपणांस घरची सर्व मालमत्ता विकून येथेंच राहिले पाहिजे. पण ती देखील वस्तुत: वाईट गोष्ट नाहीं. आपलें मुंबईस तरी निकट आप्तांपैकीं कोण आहे. आणि आपल्यापाशीं इतका पैसा असूनहि आपणांस मुंबईतल्या समाजांत जातीच्या कल्पनांमुळे चांगल्या प्रकारची पदवी प्राप्त होत नाही या तऱ्हेचेहि विचार मधून मधून तिच्या मनांत येत. छे ! अमेरिकेतच ज्यास आयुष्य काढावे लागणार अशाशीं लग्न झालें तर वाईट गोष्ट नाहीं. आपण सर्व चीजवस्त विकून अमेरिकेस येऊन राहूं पण रघुनंदनाऐवजी जर कोणी गरीब तरुण मिळाला तर जास्त चांगले, असेहि तिला वाटे. गगाधरपंत चांगल्या वर्तणुकीचा आहे, गरीब आहे, त्याच्या आयुष्यांत त्याला दिशा नाहीं, तो शिकागोसच राहिला व त्याच्याबरोबर लग्न करून तेथेंच मी राहिलें तर काय वाईट इत्यादि विचार तिच्या मनांत येत. पण गंगाधरपंतांचे लग्न झाले आहे हें तिला कळल्याबरोबर एकदम तिच्या मनाला धक्का बसला. त्यानंतर थोडक्याच महिन्यांनीं एम. डी. होऊन तिची हिंदुस्थानांत जाण्याची जेव्हां वेळ आली तेव्हां एक तऱ्हेच्या निराशामय वृत्तीनें तिचें मन व्यापिले होतें. त्यावेळेस हिंदुस्थानांत जाण्यासाठीं जेव्हां ती न्यूयॉर्क येथे १९१८साली आली तेव्हां तिला रघुनदन पुन्हां भेटला, त्यावेळेस त्याच्या ठायीं तारुण्य मुसमुसत असून त्याचें कोवळें पोरपण गेलें होतें. व तेव्हां त्याच्या त्यावेळेच्या स्वरूपाचा तिच्या मनावर जरा निराळा परिणाम झाला. पूर्वीच्या वेळेस त्याच्याशीं त्यास कोवळे पोर समजून जशी ती वागत असे तशी न वागतां त्याला पुरुष समजून ती अधिक संकोचाने वागूं लागली. आणि तोहि अधिक सभ्यतेने वागूं लागला. त्यावेळेस मयूरीस असें वाटलें कीं, जरी हा स्नेहबुद्धीने आपल्याशी वागत आहे तरी याच्या हृदयाची स्वामिनी दुसरी कोणी तरी असावी. रघुनंदनालाहि तसेंच वाटलें. बोटीवर मयूरीला पोचविण्यासाठीं जेव्हां रघुनंदन गेला, तेव्हां मात्र तो मयूरीस म्हणाला, मयूरी तूं मला कांहींच आशा देत नाहींस काय? त्याचे त्यावेळचे आतुर शब्द ऐकून मात्र मयूरीच्या डोळ्यांतून अश्रु निघाल्याशिवाय राहिले नाहींत. ती म्हणाली, रघु, कदाचित मी तुझ्यासंबधाने गैरसमज करून घेतला असेल. पण योगायोग असेल तर आपली पुन्हां भेट होईल आणि तेव्हां भवितव्य जो काय निकाल लावावयाचा असेल तो लावील.

मयूरी हिंदुस्थानांत परत आली, व आल्या नंतर कांहीं महिन्यांनीं तिची आणि रुक्मिणीची भेट झाली. हिदुस्थानांतील एकंदर आयुष्यक्रम तिला नीरस वाटूं लागला. तिच्या बरोबरीचे जे दुसरे डॉक्टर होते ते धंदा करीत होते, त्यांचीं लग्ने झालीं होतीं. जे लोक परदेशीं गेले नाहींत ते तिला आपल्यापेक्षां कमी योग्यतेचे वाटूं लागले

होते, आणि जे जाऊन आलेले होते त्यांचीं लग्नें देखील होऊन गेलेलीं होती. अमेरिकेत असतां आपल्याला येऊन तरुण मंडळींनीं भेटावे, आपल्याला फिरायला घेऊन जावे याची तिला संवय झाली होती. आणि हिंदुस्थानांत तर या प्रकारचे तिच्याविषयीं दाक्षिण्य दाखवावयास कोणीच नव्हतें. रघूचीं पत्रें येत होती, तींच तिचें मनोविनोदन करीत.

रुक्मिणी जेव्हां अमेरिकेस जाण्यास निघाली तो एप्रिल महिना होता. एप्रिलपासून जूनपर्यंत आपण महाबळेश्वरास जाऊन रहावें या हेतूनें तिनें तयारी करून ठेवली होती. आपल्याला मदतनीस एक डॉक्टरीण तिनें ठेवलीच होती, तिनें आपल्या महाबळेश्वरच्या गैरहजेरींत काम करावे असें तिनें योजिले होतें, तेव्हां तिच्या मनांत अशी कल्पना आली की, थंड हवेसाठी महाबळेश्वरला जावयाचें ते इंग्लडला कां जाऊं नये! अशा तऱ्हेची कल्पना येऊन मयूरी रुक्मिणीबरोबरच इंग्लंडला गेली. तिने आपला इंग्लंडला जाण्याचा मनोदय रघूला तारेनें कळविला. आणि रघूची तार अशी आली कीं, मलाहि इंग्लडमध्ये जावयाचे आहे.

लीलेची कथा थोडीशी गुंतागुंतीची आहे. गंगाधरपंत तिचे मराठीचे शिक्षक होते आणि ते बराच वेळ न्यूयॉर्कमध्यें होते. ते तेथें असतां अशा तऱ्हेनें रघूस आणि लीलेस शिकवीत की, ज्या भावना आपल्या मनांत वागत आहेत त्यांचे प्रतिबिंब आपल्या दोघांहि शिष्यांत उठावें. या शिकविण्याचा परिणाम जरासा निराळा झाला. कांहीं तरी ध्येयाने आपले आयुष्य क्रमणारा पुरुष लीलेस कधीं दिसलाच नव्हता. प्रत्येक व्यक्तीचे ध्येय काय, तर पैसा मिळविणें, ऐटीनें रहाणें इत्यादि. तथापि अशा व्यक्तींच्या योगानें लीलेस कांहीं उच्च भावनांच्या वातावरणांत आहोंत असे वाटलें नाहीं. पण गंगाधरपंतांशीं बोलत असतां आपण उच्च वातावरणांत आहो असे वाटे. तिला कांहींतरी उच्च भावनांच्या क्षेत्रांत असावेसें वाटे. ती तहान केवळ गंगाधरपंतांच्या साहाय्यानेच तृप्त होई. जेव्हां मयूरी न्यूयॉर्क येथें प्रथम आली त्याच्या अगोदर सात आठ महिने गंगाधरपंत न्यूयॉर्क सोडून शिकागोला गेले होते. त्यांचे न्यूयॉर्क येथील केमिकल एंजिनिअरचें शिक्षण पुरें होऊन त्यांस शिकागो येथील एका लष्करी स्फोटक द्रव्यांच्या कारखान्यांत नोकरी मिळाली होती. जेव्हां गंगाधरपंत शिकागोला गेले तेव्हां लीलेच्या आणि गंगाधरपंतांच्या पत्रव्यवहारास सुरवात झाली. हिंदुस्थानची सेवा हेंच आपलें ध्येय आहे काय? हिंदुस्थानाची सेवा म्हणजे काय इत्यादि तात्त्विक प्रश्नापासून पत्रव्यवहारास चर्चा सुरू झाली. पहिलीं कांहीं प्रत्रोत्तरे लीलेनें आईबापासहि वाचून दाखविलीं. तेव्हां "मुलीला हिंदुस्थानविषयीं प्रेम राहावें म्हणून आपली खटपट यशस्वी झालीना" असा प्रश्न गोविंदरावांनीं शांताबाईस केला. शांताबाईनीं समाधान व्यक्त केले. पुढे आईबापांचें दोघांच्या पत्रव्यवहाराकडे दुर्लक्ष झाले. मध्यें मयूरी न्यूयॉर्कला आली असतां गंगाधरपंतांचें एक पत्र मयूरीस लीलेनें वाचून दाखविलें. त्या पत्रामध्यें भावनापूर्ण भाषा नव्हती, पण हिंदुस्थानामध्ये आतां राजकीय भावनांच्या बाबतींत किती औदासिन्य उत्पन्न झाले आहे कांग्रेसला कोणीहि कसे जात नाहीं, सुशिक्षित वर्ग केवळ सिव्हिलसर्व्हिसच्या जागांसाठींच भांडत आहे इत्यादि गोष्टी लिहिल्या होत्या. त्या वाचून मयूरी म्हणाली कीं गंगाधरपंत वर्णन करतात तशी स्थिति आज हिंदुस्थानांत आहे खरी.

लीलेस गंगाधरपंतांशीं होणारा पत्रव्यवहार विशेष आवडीचा होई, याचें एक कारण असें होते कीं गंगाधरपंत काय तो तिला, ही केवळ लहान मुलगी, हिच्यापाशीं काय बोलावयाचें अशी वृत्ति न ठेवतां तिला सर्व प्रकारच्या गोष्टी समजाव्यात व त्यांची चर्चा हिच्यापाशीं करण्यास हरकत नाहीं

या वृत्तीनें वागत असे, व तिला तशींच पत्रें लिहित असे, व यामुळे आपणांस आपल्या मनांतील हितगुज बोलावयास योग्य व्यक्ति गंगाधरपंत आहे असें लीलेस भासे.

लीलेचें अंतःकरण जरी गंगाधराकडे ओढलें जात होते, तरी तिनें आपल्यावर प्रेम करावें अशी इच्छा करणारा एक तरुण होता. मागें फेरीबोटींतील जो संवाद दिला आहे तो संवाद होण्यापूर्वी कांहीं महिने कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या आसपास पुढील संवाद झाला. "लीले, आपण इतके दिवस बरोबर फिरावयास जातों, एका रेस्टरंटमध्ये " लंच " खातो आणि अनेक विषयांवर इतके दिवस आपली संभाषणे झाली तथापि जेव्हां तुझ्याबरोबर मी पहिल्या दिवशी फिरावयास आलों त्या दिवसापेक्षां आज मी तुला अधिक जवळचा झालो असेल असे मला वाटत नाहीं." हे म्हणणारा तरुण डॉ. विष्णु सरंजामे होय.

"तूं असें कसें म्हणतोस, परिचयाच्या वाढीबरोबर तुझ्यासंबंधाने मला अधिकाधिक आदर वाढत गेला नाही असे तुला वाटलें काय? आपण अर्थशास्त्रीय अनेक प्रश्नांवर चर्चा केली, तशीच जीं राष्ट्रे संस्कृतींत मागसलीं आहेत त्यांचे भवितव्य कसे सुधारेल यासंबंधाने चर्चा केली आणि आतां या प्रश्नांवर आपले विचार आज अधिकाधिक सारखे होत जात नाहीत काय?"

"तूं म्हणतेस तें खरें असेल लीले! पण मी कांहीं केवळ विचार प्रसवणारी व्यक्ति नव्हे. मी हाडामांसाचा मनुष्य आहे, आणि मला अंतःकरणहि आहे. केवळ माझे विचार तुला पटले म्हणून आनंद मानणारा विचारप्रवर्तक तत्त्ववेत्ता मी नाहीं."

" मग आणखी कोणत्या बाबतींत जवळपणा अपेक्षितोस?"

"मला तुझ्या व माझ्या अंतःकरणांचें एकत्व पाहिजे आहे. माझ्या यशाबद्दल आनंद वाटावा; माझा गौरव पाहून तुला अभिमान वाटावा. थोडक्यांत सांगावयाचे म्हटल्यास तुला माझ्याविषयी आपलेपणा वाटावा अशी माझी अपेक्षा आहे."

" विष्णु, तुझ्याविषयीं मला अभिमान किंवा आनंद वाटत नाहीत असें नाहीं, तथापि मला तुझ्याविषयी आपलेपणा वाटावा ही अपेक्षाच तूं कधीं दाखविलीस; किंबहुना तुझ्या मनांतच कधी उत्पन्न झाली? तुझी आणि माझी आज बरीच वर्षे ओळख आहे, पण तुझ्याकडून मीं कधींहि प्रीतिसूचक शब्दहि ऐकला नाहीं, तुझ्याविषयीं मला आपलेपणा वाटावा यांत तुला आनंद वाटेल किंवा त्याचें कांहीं महत्त्व तुला असेल अशी माझी कल्पनाहि झाली नाहीं.

" पण आपण आज अनेक वर्षें फिरावयास जात आहों? "

" खरें आहे, पण त्यावरून काय समजावयाचे? बरोबर फिरावयास घेऊन जाणें, म्हणजे कांहीं आपली भावना समजाविणे नव्हे. "

"पण इतकीं वर्षें तुझा सहवास ठेवण्याचा मी प्रयत्न करीत आहें त्यावरून तुझा सहवास मला किती आनंदकारक होतो हें तुला समजलें असें मला वाटलें. "

"उलटपक्षीं मी असें म्हणेन कीं आपण इतकीं वर्षे बरोबर फिरावयाला आलों, आणि तुझ्याकडून आतुरता, किंवा भावनेची उत्कटता यांपैकीं कांहींच दृष्टीस पडलें नाहीं."

"दृष्टीस पडलें नाही याचें कारण मीं त्या भावना कष्टाने दाबून टाकल्या. मला अशी भीति वाटे कीं माझ्या मनांत प्रेमभावना जागृत झाल्या आहेत असें तुला कळलें आणि तुझ्या मनांत जर तशी भावना जागृत नसली तर तूं माझ्याबरोबर फिरायला येण्याचें देखील टाळशील, आणि आजचें सान्निध्य मला मिळत आहे ते देखील उद्यां मिळणार नाहीं."

"मनांत प्रेम उत्पन्न झालें असतां त्या प्रेमास योग्य प्रत्युत्तर मिळणार नाहीं, या भीतीनें जर तरुणांनीं प्रेम व्यक्त करण्यास भ्यावयाचें तर प्रेम व्यक्त करणे हें स्त्रियांचें काम आहे काय?"

" प्रेम प्रथम व्यक्त करणें हे स्त्रियांचें काम आहे असें मी म्हणत नाहीं, पण प्रेमाच्या लहान लहान अभिप्रायसूचक धक्क्यांस प्रत्युत्तर म्हणून स्त्रियांकडून लहान लहान प्रतिध्वनी ऐकूं येतील तरच ते धक्के अधिकाधिक स्पष्ट करण्यास पुरुषांस धैर्य येईल, एरव्हीं येणार नाहीं!"

"तर मग तुझें असें म्हणणें आहे काय कीं, प्रेमव्यक्ति करून प्रत्युत्तराची अपेक्षा करणारा प्रयत्न तुझ्याकडून झाला."

"तुझ्याबरोबर रहाण्यासाठीं मी जो एकसारखा प्रयत्न करीत आहे तो माझा अभिप्रायसूचक पहिला प्रयत्न झाला."

" त्यास प्रत्युत्तरहि मिळालें, मी तुझ्याबरोबर फिरावयास येऊं लागलें."

" लीले, खरें सांग पाहूं, कीं तुझ्या व माझ्या-मध्यें आज जी दूरपणाची भावना आहे तिचें कारण केवळ माझ्याकडून प्रारंभयत्नाचा अभाव हेंच आहे काय?"

" आपण आज अनेक वर्षे लोकांमध्यें एकत्र दिसत आहो. जर तूं आपली भावना वर्षा–दीड वर्षापूर्वीच व्यक्त केली असतीस तर तिला आज काय फल आले असते हे कोणी सांगावें–"

" खरें सांग बरें लीले, कीं, तुझें अंतःकरण अव्यास आहे काय? "

" हा प्रश्न मुलीला कोणी कधीं विचारूं नये–पंधराव्या वर्षापासूनच काय पण त्याच्याहि अगोदर तरुण मुलगी कोणावर तरी प्रेम करूं लागते–"

" तर मग तुला सरळच विचारतों कीं गंगा-धरपंतांवर तुझें प्रेम जडलें आहे काय? "

" गंगाधरपंतांवर प्रेम जडलें कीं काय हें मला ठाऊक नाहीं. प्रेमामध्यें, किंवा आवडीमध्यें इतके प्रकार आहेत कीं कोणावर कोणत्या तऱ्हेचें प्रेम आहे याची सूक्ष्म तपासणी केल्याशिवाय त्याचें स्वरूपहि समजणार नाहीं. गंगाधरपंतांच्या आयुष्यक्रमांत आपण सहकारिता करावी असें मात्र पुष्कळदां वाटते. "

"पण लीले, मला सांग की, तुझें चित्त गंगा-धरपंतांवर कां जडलें आहे. गंगाधरपंतांचे लग्न झालें आहे हें तुला ठाऊक नाहीं काय?"

" आपले लग्न झालें आहे ही गोष्ट गंगाधर-पंतांनीं मजपासून लपवून कधींच ठेवली नाही. त्यानीं आपल्या बायकोचा फोटोहि मला दाखविला होता–तरी देखील माझें अंतःकरण दुसऱ्या कोण्याहि मनुष्यापेक्षां त्यांच्याचकडे ओढ घेई, मी एकटी असतां गंगाधरपंतांचीच आठवण होते ही गोष्ट कबूल केली पाहिजे. ज्या पुरुषाच्या आयुष्यक्रमामध्यें आपण सहका-रिता करावी असे वाटत असेल त्याचें लग्न झालें असल्यास काय बिघडले. गंगाधरपंत मला दुष्प्राप्य असेल पण मी त्याच्यावर प्रेम करूं नये काय? मी तुम्हांस यशस्वी पुरुष समजतें तर गंगाधरपंतांस दुर्दैवी पुरुष समजतें आणि त्यांच्या दुर्दैवी स्थितींत त्यांचे सहकारी व्हावें असे मला वाटतें. काय असेल तें असो मी पराभूतांच्या बाजूची नेहमीं असतें!"

" मला या तुझ्या भावनेची चांगली कल्पना आहे, आणि मला जर तूं पूर्ण आकर्षण केलें असशील तर याच भावनेमुळे. मी कांहीं दिवसां-पूर्वी शिक्षकांसाठी लिहिलेली मानसशास्त्रावरील पुस्तकें वाचीत होतों त्यांत मानवी मनोरचनेचा हा प्रकार वर्णिला होता. त्यांत असें सांगितलें कीं कित्येक मुलें वर्गांत दोघा मुलांची मारामारी झाली म्हणजे कित्येक विजयी पक्षाचें अभिनंदन करतात तर कित्येक पराभूत मुलास आपली

सहानुभूति देतात. त्याचप्रमाणें शिक्षकाशीं व शिक्षकिणीपाशीं देखील त्यांची सहानुभूतीची वृत्ति दृष्टीस पडते. जी मास्तरीण विद्यार्थ्यांमध्यें प्रिय असते तिच्यावर फुलांचा वर्षाव होतोच, पण जी मास्तरीण लोकप्रिय नसते तिची दया येऊन कांहीं विद्यार्थी आणि विद्यार्थिनी तिला फुलें आणून देतात. त्याचप्रमाणें आपल्या मास्तरणीला शिस्त किंवा दाब ठेवतां येत नाहीं म्हणून मास्तरणीची दया येऊन, आपणच आत्मसंयमन करून शिस्त ठेवतात आणि विद्यार्थ्यांस शिस्त ठेवण्यास प्रवृत्त करतात."

"हे सगळें पुस्तकांत लिहिलें आहे? मला असें वाटे कीं, व्यक्तीप्रमाणें प्रकृति तर त्या सगळ्या वर्णन तरी कशा केल्या जाणार! तथापि तुमच्या या वाचनाने आणि प्रकृतीच्या सूक्ष्म ज्ञानानें मला मधून मधून तुमची भीति वाटते. मला अशी शंका येऊं लागते कीं, तुम्ही मला मित्र समजतां की केवळ शास्त्रीय दृष्टीनें अभ्यास करण्याची वस्तु या दृष्टीने मजकडे पहातां!"

"छे! छे! लीले, मानसशास्त्र मनुष्य शिकूं लागला म्हणजे आपल्या प्रत्येक परिचित व्यक्तीमध्यें पुस्तकांत वाचलेले मानसशास्त्र किती प्रत्ययास येतें हें पहात असेल, पण तो आपल्या सर्व परिचित वर्गास केवळ "आपल्या शास्त्राचा अभ्यासाचा विषय" एवढेंच समजून परिचितांविषयीं सर्व भावना गुंडाळून ठेवतो असें नाहीं."

"तर मग तूं माझ्याकडे कोणत्या दृष्टीनें पहातोस?"

"मला हवी असलेली मुलगी या नात्यानें पहातों"

"आणखी ज्या तरुणाचें लग्न झालें आहे त्यावरच आपलें चित्त गमावणारी वेडी मुलगी या दृष्टीनें पहातोस नाहीं!"

"या दृष्टीनें तुजविषयीं जरी विचार करीत असलों तरी तो आतां यापुढें करणार।"

"आणि तो कां, एखाद्या विचित्र मुलीच्या मनोरचनेची घटना समजण्यासाठीं काय?—"

"केवळ कौतुकासाठीं मला पृथक्करण करावयाचें नाहीं. तर या मुलीला मी आपली करण्यासाठीं काय उपाय केला पाहिजे याविषयीं विचार करतां यावा म्हणून."

---

### प्रकरण ८ वें.

## दोन संस्थांचीं भांडणें.

जेव्हां "हिंदुस्थानी सेटलर्स असोसिएशन" स्थापन झाली तेव्हां "इंडो अमेरिकन असोसिएशन" च्या चालकांस थोडेसें वाईट वाटलें. या नवीन संस्थेचे अध्यक्ष प्रो. गोगटे होते, आणि उपाध्यक्ष कामत होते व डॉक्टर सरंजामे हे त्या संस्थेचे उत्साही सेक्रेटरी होते. सरंजामे हे इंडो-अमेरिकन असोसिएशनच्या कर्त्या सभासदांपैकीं असल्यानें ते नवीन संस्थेस मिळाल्यानें जुन्या संस्थेचे खरोखरच नुकसान होणार होतें. कामत हे नवीन संस्थेंत सामील झाले म्हणजे त्यांचें जुन्या संस्थेवर प्रेम कमी होणार व जुन्या संस्थेस जी त्यांच्याकडून बिदागी पोंचत असे ती कमी होत जाणार असे जुन्या संस्थेच्या चालकांस वाटत होतें. या नवीन संस्थेचे अध्यक्ष प्रो. गोगटे यांच्यावर जुन्या संस्थेच्या कार्यकारी मंडळीचा राग विशेष होता, कां कीं, नव्या संस्थेच्या स्थापनेस कारण तेच झाले होते. ही नवी संस्था, जुन्या संस्थेपेक्षां आपलें कार्य आणि उद्दिष्ट निराळें आहे, आम्हांस हिंदुस्थानच्या राजकारणांत प्रामुख्याने शिरावयाचें नाहीं, इत्यादि गोष्टी पुढें मांडून स्थापन झाली. तेव्हां तिला सोंवळी, देशद्रोही, इत्यादि शिव्यांचा वर्षाव जुन्या संस्थेच्या अभिमान्यांकडून कांहीं दिवस झाला, तथापि जेव्हां गंगाधरपंत परभणीकर आणि इतर गदर चळवळींतील प्रमुख महाराष्ट्रीय माणसांस या नवीन संस्थेनें

आपले सभासद केलें. तेव्हां तर ही संस्था गोगटे यांनीं महाराष्ट्रीय मंडळीस निराळें काढण्याची क्लृप्ति म्हणून काढली अशी चर्चा करण्यास सुरवात झाली. पण तोहि आक्षेप फार दिवस टिकूं शकला नाहीं. गंगाधरपंतांनंतर बरेच पंजाबी या संस्थेस मिळाले. "हिंदुस्थानी सेटलर्स असोसिएशन" स्थापन होण्याचें कारण झालें तें असें:— जुनी संस्था "इंडो-अमेरिकन असोसिएशन ऑफ युनायटेड स्टेट्स अँड कानडा" ही प्रथमत: हिंदी आणि अमेरिकन लोकांमध्यें सलोखा वाढावा आणि हिंदु विद्यार्थी मंडळींनां काम मिळवून देण्यांत पुढाकार घ्यावा, आणि हिंदु मजूर आणि इतर रहिवासी यांस सौख्य मिळवून देण्याचा प्रयत्न करावा या हेतूनें, म्हणजे केवळ स्थानिक, सामाजिक व आर्थिक अडचणींच्या निराकरणासाठीं स्थापन झाली. ही स्थापन झाली ती फार जुन्या काळांत म्हणजे १९०५।०६ च्या सुमारास झाली असली पाहिजे. त्यानंतर तिकडे जे हिंदी विद्यार्थ्यांचे, व्यापाऱ्यांचे किंवा मजुरांचे स्थानिक संघ होते त्यांपैकीं बरेचसे संघ या असोसिएशनला "फेडरेट" झाले. प्रत्येक स्थानिक संघाला आपले जुनें नांव कायम ठेवावयाचें होतें. तसेंच सर्व मिळून एखादी संस्था निघावी अशी इच्छाहि होती. त्यामुळे अशी तोड निघाली की प्रत्येक संघाने आपल्या स्वतंत्र नोटपेपरवर आपल्या संस्थेच्या नांवाखालीं, "मेंबर ऑफ इंडो अमेरिकन असोसि....कानडा." इतकें नांव लिहावें असें ठरलें. पुढें एक दोन वर्षांनीं असोसिएशनचें नांव वर आणि स्थानिक संघाचें नांव खाली कौंसांत छापावें अशी रीति सुरू झाली. या रीतीला प्राधान्य येण्याचें एक कारण असें होतें कीं, तशी तडजोड कबूल केल्यास प्रत्येक स्थानिक संघास २००० पर्यंत फुकट नोटपेपर व एनव्हेलप्स पुरविण्याचें मुख्य संघानें योजिलें; आणि तेवढ्यामुळें म्हणजे सुमारें ३९ डॉलरच्या काटकसरीसाठीं स्थानिक संस्थांनीं तें कबूलहि केलें. तथापि सार्वराष्ट्रीय संघाच्या नांवाची मान्यता वाढण्यास दुसरेहि एक कारण होतें. जुने लोक परत जात आणि नवीन लोक येत, तेव्हां नवीन लोकांत स्थानिक नांवाची आवड आणि अभिमान कमी असल्यामुळें मध्यवर्ती संस्थेचेच नांव चोहोंकडे अधिकाधिक प्रसृत होई. थोड्याच दिवसांत इंडो-अमेरिकन असोसिएशनचेंच नांव हिंदुस्थानी मंडळीस मान्य होऊन बरीचशी चोहोंकडची मंडळी तिची सदस्य झाली आणि हिंदी मडळीच्या लोकमताची निदर्शक सभा म्हणून तेथील वर्तमानपत्रे देखील तिचा उल्लेख करूं लागलीं. या संस्थेमध्ये हिंदी लोकांविषयीं सहानुभूति दाखविणारे कांहीं अमेरिकन लोक देखील होते, पण ते ऑनररी सभासद असून त्यांनां मत नव्हते.

या संस्थेची वाढ होऊं लागली आणि तीमध्यें तेथील सर्व प्रकारचे लोक आले पण तेव्हां अमेरिकेंत गदर चळवळ सुरू होती. तेव्हां ती चळवळ या संस्थेस सर्वसंमत नसल्यामुळे किंबहुना त्या चळवळीस बऱ्याच पैसेवाल्या व्यापाऱ्यांचा विरोध असल्यामुळें ही संस्था गदर चळवळीपासून अलिप्त ठेवावयाची असें या संस्थेचें धोरण ठरलें. पण भोंवतालच्या वातावरणांत कांहींतरी परिणाम झालाच. हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीकडे थोडें तरी लक्ष संस्थेच्या चालकांस द्यावें लागलें. आणि कांग्रेसचें ध्येय जें हिंदुस्थानास इंग्रजी अंमलाखालीच स्वराज्य मिळविणे त्या धोरणाच्या पुरस्कृतीसाठीं या संस्थेनें कांहीं प्रकाशितें प्रसिद्ध केलीं, त्यांत विल्यम जेनिंग्ज ब्रायन याचे हिंदुस्थानी राज्यव्यवस्थेसंबंधानें टीका हें एक होतें. हिंदुस्थानी दुष्काळाशी झगडण्यासंबंधानें ब्रिटिश राज्यव्यवस्थेची असमर्थता दाखविणारें दुसरें एक पत्रक होतें, आणि त्याप्रमाणेंच ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं हिंदुस्थानी लोकांस स्वराज्यास पात्र करावें म्हणून जे विचार व्यक्त

केले होते त्यांचाहि संग्रह होता, आणि इंडियन न्याशनल कांग्रेसवर एक प्रकाशित होतें. येणेप्रमाणे जरी या संस्थेचें कर्तव्य स्थानिक हिंदी मंडळींनां संघशक्तीने मदत करण्याचें होतें तरी तें बाजूला राहून पैसा मुख्यतः हिंदुस्थानी स्वराज्याला मदत करण्यासाठी लोकमत बनविणारी प्रकाशितें छापण्याकडे व त्यांचा प्रसार करण्याकडे खर्च होऊं लागला. आणि येणेंप्रमाणे या केवळ स्थानिक हिताच्या संस्थेचे स्थानिक स्वरूप बाजूलाच राहून हिंदी राजकीय चळवळीच्या तुतारीचें स्वरूप तिला येऊं लागलें.

यापुढें हिंदुस्थानच्या कांग्रेस कमेटीशी पत्रव्यवहार होऊं लागला आणि कांग्रेस कमेटीशीं अधिकाधिक पत्रव्यवहार होतांच ही संस्था हिंदुस्थानच्या कांग्रेसलाच जोडली जावी अशा तऱ्हेचे धोरण होऊं लागलें, आणि ते धोरण जेव्हां हिंदुस्थानी नवे नवे विद्यार्थी येऊं लागले तेव्हां वाढूं लागलें. या तऱ्हेने ही संस्था रूपांतर पावत आहे, हिंदुस्थानची राजकारणाची हस्तक ही संस्था होत आहे, अमेरिकेत हिंदी लोकांचे हितसंबंध अधिकाधिक जपण्यासाठीं खटपट करणारी ही संस्था राहिली नाहीं असा आक्षेप या संस्थेतील जुनी मंडळी घेऊं लागली. याच आक्षेपक वर्गांत प्रोफेसर गोगटेहि होते. मिस्तर विलकाक्ससारखे हिंदुस्थानी मंडळींविषयी प्रेम बाळगणारे परंतु मत नसलेले अमेरिकन गृहस्थहि होते. ते म्हणत कीं, येथील हिंदुस्थानी मंडळीनां हिंदुस्थानी राजकारणासंबंधानें प्रामुख्याचा भाग कधींच घेतां येणार नाहीं, आणि यासाठीं मुख्य लक्ष स्थानिक प्रश्नांवर ठेवून वर्षाअखेरच्या अ[illegible] भाषणांत हिंदुस्थानच्या राजकीय स्थितीचे सिहावलोकन करीत जावें. अमेरिकेंतील हिंदुस्थानी मंडळीनें यापलीकडच्या भानगडींत पडूं नये; ज्यांस हिंदुस्थानी राजकारणांत पडावयाचे असेल त्यांनीं हिंदुस्थानांत जाऊन नंतर पूर्णपणें पडावें असे होते. तथापि बऱ्याचशा तरुण मंडळीस तें नको होतें. त्यांनां हिंदुस्थानांत ब्रिटिश लोक हिंदु लोकांस वाईट तऱ्हेनें वागवितात यावरच व्याख्यानें द्यावयाला, आणि हस्तपत्रकें काढावयाला हवीं होतीं, हिंदुस्थानी मंडळींच्या रहाण्यासाठी कोआपरेटिव्ह सोसायटी काढून आपली रहाणी अमेरिकन लोकांच्या तोडीची करणें, हिंदुस्थानी मंडळीस हस्तसामुद्रिक किंवा फलज्योतिष या प्रकारच्या संशयित स्वरूपाच्या धंद्यापासून मोकळे करणें, इत्यादि प्रयत्न करावयास नको होते; कां कीं, त्या प्रकारचे परिश्रम जर बरेच दिवस झाले तरच हिंदी वसाहतीची स्थिति सुधारेल, पण अमेरिकेत आलेल्या तरुणांचा त्यामुळे स्वदेशांत डंका होणार नाहीं. पुष्कळ तरुणांनां हिंदुस्थानच्या स्थितीविषयीं एखाद्या गांवीं जाऊन व्याख्यान द्यावे आणि त्या व्याख्यानाचा सारांश स्थानिक पत्रांत प्रसिद्ध झाला म्हणजे त्या स्थानिक पत्राची एक प्रत हिंदुस्थानाकडे पाठवावी आणि आपल्या गांवाकडे कांग्रेस कमिटीच्या सेक्रेटरीला पाठवावी आणि त्याच्याकडून स्वराज्य संपादनाच्या पवित्र कार्याला मदत केल्याबद्दचें पत्र आणवावे आणि तें अमेरिकेतील इतर हिंदु मंडळीत दाखवावे या प्रकारच्या गोष्टी करण्याचाच हव्यास असे.

आल्यागेल्या हिंदुस्थानी मनुष्याचा या संस्थेवर पगडा असावा ही गोष्ट स्थानिक वसाहत करून राहिलेल्या मंडळींनां आवडत नव्हती. ते म्हणत की, ही संस्था देशांतील हिंदुस्थानी मंडळींच्या उपयोगाची होईनाशी झाली आहे, आणि त्या संस्थेच्या बदललेल्या वळणाला पूर्वीच्या रस्त्यावर आणण्याचे प्रयत्न होऊं लागले पाहिजेत. याच्या उलट ती संस्था कांग्रेसला जोडण्याचे प्रयत्न विद्यार्थ्यांकडून होऊं लागले. प्रो. गोगटे यांनी ही संधि पाहून कांग्रेसचे क्रीड कबूल करून कांग्रेसला ही संस्था जोडण्याचा जो ठराव जाही

झाला त्या ठरावाला सपाटून विरोध करावा आणि स्थानिक हिंदी मंडळीच्या प्रश्नाकडेसच लक्ष देणारी ही संस्था रहावी म्हणून जोरानें खटपट केली. त्यांनीं त्या क्रीडच्या ठरावाला विरोधाची नोटीस देऊन राजकीय कार्यक्रम संस्थेने अंगाबाहेर टाकावेत असा ठराव मांडला. त्यावेळेस प्रो. गोगटे यांचा ठराव जरी नापास झाला तरी त्यांस आपले अनुयायी निश्चितपणें कळून आले. आणि थोडक्याच दिवसानीं "हिंदुस्थानी सेटलर्स असोसिएशन" म्हणजे वसाहत करून राहूं पहाणारांची संस्था या नांवाखाली एक संस्था प्रो. गोगटे यांनी नोंदली, आणि ते स्वत: त्या संस्थेचे अध्यक्ष झाले. या संस्थेमध्ये आल्यागेल्या हिंदुस्थानी मनुष्यास सदस्यत्व ठेवलेच नाही. जे ५ वर्षे किंवा त्याहून अधिक अमेरिकेस राहिले असतील त्यांसच या संस्थेचें सदस्य होतां येई. या संस्थेचे अस्तित्व स्थानिक गरजेच्या दृष्टीनें खरोखर हवे होतें. पण ते असोसिएशनच्या अभिमान्यांस बराच राग येण्यास कारण झाले.

स्वतंत्र संस्थेचें अस्तित्व हवे आहे ही गोष्ट वसाहत करून राहिलेल्या बऱ्याच जुन्या मंडळीस पटली, आणि ती मंडळी नवीन संस्थेची सदस्यहि झाली. ही जुनी मडळी जुन्या संस्थेच्या चालकांस म्हणाली की स्वराज्यासाठी खटपट करणें हें कार्य चांगलें आहे. तिकडेच तुमचे लक्ष लागत असेल तर तें तुम्ही उत्साहानें करा. त्यास आमची हरकत नाहीं. आम्ही तुम्हांस मदत काय करायची ती करूंच पण अमेरिकेंत कायमची वस्ती करणाऱ्या मंडळींचे हितसंबंध पुष्कळ व्यापक आहेत व तुमच्यामार्फत संस्थेस स्वराज्यविषयक कार्य तुम्हांस एकनिष्ठपणाने करावयाचे आहे असे दिसते. कां की, तुम्हीं हिंदुस्थान कांग्रेसची क्रीड पत्करली आहे. तर ज्या इतर गोष्टी आम्हांस करावयास पाहिजेत त्या गोष्टी करण्यास आम्हांस संस्था पाहिजे म्हणून आम्हांस नवीन संस्थेची आवश्यकता आहे.

गदर चळवळ जेव्हां सुरू होती तेव्हां आपण त्या संस्थेत नाहीं असें दाखविण्यासाठींच जणूं काय कान्स्टिटयूशनल पद्धतीने हिंदुस्थानास स्वराज्य मागणाऱ्या इंडो-अमेरिकन असोसिएशनचें सदस्यत्व वाढले होतें, पण त्या प्रकारची मंडळी या नवीन संस्थेंत दाखल होण्याचा बराच संभव होता. शिवाय गदर चळवळीशीं सहानुभूति बाळगणारा वर्ग आपल्या संस्थेंत फारसा मिळूं नये म्हणून इंडो-अमेरिकन असोसिएशनची वृत्ति होती, आणि त्या वृत्तीचीं कारणे दोन होती: गदर चळवळीचीं माणसें जर या संस्थेत शिरलीं तर आजच्या महत्त्व पावलेल्या व्यक्तींचें संस्थेंतील महत्त्व जाईल हें एक कारण होतेंच, पण आमच्या संस्थेस कान्स्टिटयूशनल रस्त्यापासून सशस्त्र राज्यक्रांतीच्या रस्त्यावर जावे लागूं नये म्हणून आम्हांस गदरपार्टीचीं माणसें दूर ठेवलीं पाहिजेत असें ते म्हणत.

नवीन स्थापन झालेल्या सेटलर्स असोसिएशनला देशद्रोही, आप्पलपोटी वगैरे नावें ठेवण्यास इंडो-अमेरिकन असोसिएशनने सुरवात केली पण त्याचा परिणाम असा झाला की, उलट कडी म्हणून या वसाहतवाल्यांच्या संस्थेने गदरपार्टीच्या लोकांस उघडपणे आपल्या पक्षांत येण्यास आमंत्रण केले. तेव्हां तर प्रो. गोगटे यांच्यावर भडिमारास चांगलीच सुरवात झाली. ज्या सोंवळ्या प्रो. गोगटयांना "इंडो-अमेरिकन असोसिएशन" ही राजकीय संस्था आहे म्हणून तिच्यांतून फुटून जावेसें वाटतें तेच गोगटे उघडपणे बंडांत सामील झालेल्या लोकांशीं सहकारिता करू पाहतात याचा अर्थ काय? प्रो. गोगटे यांनी असें उत्तर दिलें की, आमची संस्था वसाहत करणाऱ्यांची आहे. आणि जी मंडळी ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंड करणारी आहेत, त्यांच्याशीं बंडाच्या प्रयत्नाखेरीज इतर गोष्टींत सहकारिता करण्यास आम्हांस कोणत्याहि तऱ्हेनें

प्रत्यवाय नाहीं. आणि विशेषेंकरून त्यांचें आणि आमचें मत आतां एकच झालें आहे. बंड करण्यांत फायदा नाहीं, तें यशस्वी होणार नाहीं असें आम्हीं केवळ तर्कानें म्हणत होतों, आणि गदर पार्टीची मंडळी तर त्या दिशेनें प्रयत्न करून व अपयश पावून त्याच निर्णयास पोचली असतील. अर्थात त्यांचे ज्ञान प्रयोगसिद्ध असल्यामुळें आमच्या पेक्षां त्यांचें कर्तव्यपरिज्ञान उच्च आहे,व ते आमची संस्था बंडांत ओढतील अशी आम्हांस भीतीच वाटत नाहीं. याशिवाय हेहि लक्षांत ठेवले पाहिजे कीं, आम्हांस अमेरिकेंत कायमची वस्ती करणारे लोक एकत्र करावयाचे आहेत, केवळ हिदुस्थानांत जाऊन नोकरी करणारे लोक आम्हांस नको आहेत. बंडांत भाग घेतल्यामुळे जे डागळले गेले आहेत आणि जे स्वदेशी जाऊ शकत नाहींत तेच येथें खरे वसाहत करणारे लोक आहेत. व अमेरिकेस आलेल्या भारतीयांचा इतिहास गदरांच्या सघी-करणाच्या कालापासून सुरू होईल. प्रोफेसर गोगटे यांची वृत्ति बऱ्याच तरुण मडळीस नापसत होती, आणि ती त्यांच्यामार्फत हिदुस्थानांतील पुढारी वर्गास कळली, आणि लाला गजपतराय यांनांहि समजली. गजपतराय यांस असे वाटले की हिदुस्थानांतून अमेरिकेस गेलेली मंडळी बह-कली आहेत. ते विनाकारण भांडत आहेत. हिदु-स्थानची मंडळी कोठेहि गेली तरी त्यांची भांडणे मिटावयाची नाहींत, या "अज्ञानी" लोकांस आपण चार गोष्टी सांगितल्या पाहिजेत. "एकी करा आणि स्वराज्य मिळवा" हा उपदेश त्यांनां पाहिजे आहे. प्रो. गोगटे वयाने अधिक असून जी तरुण उत्साही मंडळी कॉंग्रेसचे म्हणजे हिंदुस्थानचें पवित्र कार्य करू इच्छितात त्यांच्या विरुद्ध विनाकारण जात आहेत, तर प्रो. गोगटे यांची कानउघाडणी आपण केली पाहिजे, गोगटे महाराष्ट्रीय ब्राह्मण आहेतना! त्यांनां खिशांत घालणें कठिण गोष्ट नाहीं, शिवाजीची स्तुति केली, महाराष्ट्राच्या शूर पुरुषांविषयीं आणि कवींविषयीं आदर दाखविला आणि महाराष्ट्रीय मंडळी नेतृत्वास योग्य आहेत असें म्हटले म्हणजे आपण पुण्यांतली साधी भोळी मंडळी आपलीशीं करून कशी घेतों, इत्यादि गोष्टी त्याच्या मनांत आल्याशिवाय राहिल्या नाहींत. लाला गजपतराय यांनीं जेव्हां अमेरिकेस जाण्यासाठी बोटीवर पाय ठेवला तेव्हां कॉंग्रेसचें ध्येय अमेरिकेंतील हिंदी मंडळींत चांगल्या तऱ्हेने पसरवूं अशी त्यांस मोठीच उमेद होती.

---

## प्रकरण ९ वें.

## शंकरराव गोगटे.

प्रो. गोगटे ही एक व्यक्ति होती. नागपूर किंवा इदूर येथे ते बरेच लोकांच्या चर्चेचा विषय होते. नागपूरला ते विद्यार्थी असतांच कल्पक म्हणून प्रसिद्ध होते. १८८४ च्या सुमारास जेव्हां ते हायस्कुलांत होते, तेव्हांपासून ते बरेच गुण दाखवीत होते. त्यांचे आवडीचे मुख्य विषय म्हटले म्हणजे तीन: गणित, पदार्थविज्ञान आणि संस्कृत. ते इतिहासाचेहि भोक्ते होते. आणि नागपूरच्या तरुण मंडळींत ज्या लोकांस इंग्रजी राज्याला आग लावण्यासाठी कांही तरी करावे असे वाटत होते अशांपैकीं ते एक होते. शुक्रवार तलावाच्या बाजूने बर्डीवर जातांना नक्की कोणत्या ठिकाणीं अप्पासाहेब भोसले इग्रजास शरण गेले, ती जागा त्यांनां कळली होती, आणि त्या जागेवरच त्यांनीं आपला राग काढला, तो असा: रस्ता दुरुस्त करण्यासाठीं म्युनिसिपालिटीचे मजूर थोडा रस्ता खणीत होते, तेव्हां एका मजूराच्या जवळून कुदळ मागून घेऊन मोठया त्वेषानें त्यांनी त्या जागेपैकीं कांही भाग खोदून काढला. पुष्कळ मंडळींनां हा मुलगा इतका राग जमीनीवर कां काढीत आहे हें समजलें नसेल. मास्तरनें वर्गांत छडया लगावल्या

असतील म्हणून कोणावर तरी राग काढण्यासाठीं हा जमीन कुदळीनें फोडून काढीत आहे, असेंच वाटले असावें. त्या तेरा चौदा वर्षांच्या अंतःकरणांत ज्या प्रकारचा संताप आला होता त्या प्रकारचा संताप येण्याइतपत सुशिक्षित माणसें थोडींच होतीं, त्यावेळेस भोसलेशाही जाऊन इंग्रजी झाल्याला तीस वर्षेंहि झालीं नव्हतीं आणि त्यावेळचा सुशिक्षित वर्ग म्हणजे, जिल्हेकचेरी, कमिशनेरी, आणि ज्युडिशिली आणि सेक्रेटरीएट येथील कारकून; ते [illegible] इंग्रजीत पगार कसा वेळच्या वेळेवर मिळतो हेच सांगण्यांत चूर असत. तेथील सुशिक्षितास जर राग कशाबद्दल येत असला तर तो "पुणेकर" लोकच फार आले एवढयाबद्दल येत होता, तर अशा वेळेस ज्या जागेवर भोंसले इंग्रजांस शरण गेले त्या जागेवर राग काढणाऱ्या बापू गोगटयाचे अंतःकरण इतरांस कसे समजणार? शंकरराव गोगटे पुढे शिकत शिकत एम. ए. झाले आणि पुढे ते इंदूरला प्रोफेसरी करूं लागले. त्यांच्या डोक्यांत नेहमीं नवीन यांत्रिक युक्त्या शोधून काढण्यासाठीं खळबळ चालू असे. यांत्रिक युक्त्या आणि देशाभिमान यांचा संबंध त्यांनीं असा लावला होता कीं, ज्यास यांत्रिक युक्त्या अधिक ठाऊक असतील तोच अधिक देशाभिमानी, इंग्रजांनां या यांत्रिक युक्त्याच जास्त ठाऊक असल्यामुळे ते देशी राज्यांस चिरडते झाले.

गंगाधर कॉलेजमध्ये असताना तो प्रो. गोगटे यांचा फार अभिमानी होता. मराठेशाहीविषयीं अभिमान गंगाधराप्रमाणे अनेक विद्यार्थ्यांच्या मनांत जागृत होण्यास प्रो. गोगटेच कारण. यशवंतराव होळकराच्या युद्धविषयक धडाडीविषयीं गोगटे फार गोष्टी सांगत; आणि तीनशे तोफा चार महिन्यांत ओतणे ही क्रिया किती कठिण आहे व शंभर वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत किती कठिण होती हें सांगून आपल्या इंदुरांत ३०० तोफा चार महिन्यांत यशवंतरावानें कशा ओतल्या असतील याविषयीं चर्चा करीत. इंग्रज दगेबाजी करून होळकरांचे राज्य खालसा करावयास आला तर होळकरांनां आपलें सरक्षण करणे शक्य आहे काय इत्यादि प्रश्नांची चर्चा ते उघडपणें करीत असत. त्यात ते इतके खुल्या दिलाने बोलूं लागले की त्यांचे बोलणें ऐकावयाचीच बऱ्याच मंडळींनां भीति वाटे. या अशा गुणामुळें जरी प्रो. शंकरराव गोगटे विद्यार्थ्यांमध्यें बरेच प्रिय झाले होते तरी तेथील महाराष्ट्रीय मुत्सद्दी मंडळींनां असें वाटे की त्यांच्या अशा धिटाईच्या बोलण्यानें दिल्लीवाल्या मंडळींनां पोलिटिकल एजंटच्या आफीसमध्यें महाराष्ट्रीय नोकरांविरुद्ध खलबत करून त्यांच्या नोकऱ्या घालविण्यास एक साधनच होईल. पुढे अशा गुणांनीं प्रो. शंकरराव यांची नोकरी मात्र गेली. आणि पुढें एक वर्ष ते बंगालमधील एका कॉलेजांत प्रिन्सिपालकी करून पुढे अमेरिकेस गेले.

प्रो. शंकरराव यांस हिंदुस्थानचा अभिमान कितपत होता हे सांगतां येत नाहीं. त्यांनां महाराष्ट्रीयत्वाबद्दल मात्र मोठा अभिमान होता. त्यांनां विवेकानंद, स्वामी रामतीर्थ यांचे कार्य फारसें पसंत नव्हतें, किंवा त्यांचें त्यांस महत्त्व वाटत नसे. विवेकानंद तर तुच्छ; कां कीं, तो बंगाली होता, अशी त्यांच्या मनांत अगदीं चोरखणांत अर्धीमुर्धी निजलेली आणि अर्धीमुर्धी जागृत अशी भावना असे. स्वामी रामतीर्थ यांच्या एका अमेरिकन शिष्यानें एका हिंदी विद्यार्थ्याची काळजी फार चांगल्या तऱ्हेनें घेतली आणि त्यास उपजीविकेच्या मार्गास लावलें, [illegible] रावांस स्वामीचे कार्य कांहीं तरी चांगले [illegible] पाहिजे असे वाटे.

प्रोफेसर गोगटे न्यूयॉर्कला [illegible] र्थ्यानेंच प्रोफेसर गोगटे यांस भेटण्याची इच्छा दर्शविली होती. कां कीं, रा. कामत यांच्या [illegible]

असें कळलें कीं, तेथील हिंदुस्थानी मंडळींपैकीं जॉ अनेक वर्षे अमेरिकेतच निवास करीत आहेत अशी हिंदुस्थानी मंडळी प्रो.गोगटे यांच्या सल्ल्यानें चालतात. तेव्हां त्या गृहस्थानें प्रोफेसर गोगटे यांस एकदां जेवणास आमंत्रण केलें. त्या वेळचा संवाद जरासा मनोरंजक असल्यामुळें तो पुढच्या प्रकरणांत दिला जाईल. त्या गृहस्थाचें नांव विलकाक्स असें होतें. व हा गृहस्थ पूर्वी अगदी गरीबींत असून पुढें कारखानदार झाला होता. प्रो. गोगटे यांस मि. विलकाक्सच्या उदाहरणावरून हिंदुस्थानविषयी सहानुभूति असलेला वर्ग अमेरिकन लोकांत उत्पन्न होणें शक्य आहे हे पटलें.

प्रो. गोगटे यांचा मानसिक इतिहास लिहिला असतां तो फारच मनोरंजक होईल, त्यांनां महाराष्ट्रीयत्वाविषयीं देखील जो अभिमान होता, तो महाराष्ट्राच्या इतिहासामुळें होता किंवा कोंकणस्थ ब्राह्मण जात महाराष्ट्रीय आहे म्हणून होता हें सांगतां येत नाहीं.

अगदीं अल्पवयांत गोगटे अट्टल कोंकणस्थ होते. देशस्थ आणि कऱ्हाडे ब्राह्मणांस देखील ते आपल्या बरोबरीचे समजत होते कीं नाहीं याविषयीं शंका आहे. एका कोंकणस्थ मुलीचें त्यांच्या तरुण वयांत देशस्थाबरोबर लग्न झाले याबद्दल त्यांस फारच वाईट वाटलें. शंकररावांच्या दृष्टीने देशस्थ आणि कऱ्हाडे ब्राह्मण जर कोंकणस्थापेक्षां हलके तर सारस्वत आणि कायस्थप्रभु तर कितीतरी कमी योग्यतेचे! प्रो. गोगटे यांनां असें वाटत होतें कीं, हिंदुस्थानविषयक खरें "मौत्सद्य" कोंकणस्थ ब्राह्मणाखेरीज इतरांस कळणारच नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि जातीचा देशाभिमान कोंकणस्थ ब्राह्मणाच्या देशाभिमानाच्या पासंगाला उतरणार नाहीं. पण हीं त्यांचीं मतें ते फारसे बोलत नसत.

प्रोफेसर गोगटे यांच्या हिंदुस्थानी आयुष्यांत त्यांचीं मतें निश्चित असल्याचा लौकिक कधींच नव्हता; ते टिळकांच्या पक्षाचे आहेत किंवा गोखल्यांच्या पक्षाचे, हें वर्गीकरण सदाशिवपेठी पुणेकरांस न करतां आल्यामुळे त्यांनीं त्यांस विक्षिप्त म्हणून ठरविलें होतें. त्यांचा विद्यार्थी गंगाधर याला हिंदुस्थान सोडावे लागेपर्यंत गोगटे यांनां आपल्या [illegible] हेतूची जाणीव झाली असेल किंवा नाहीं, हें कोण जाणें! कित्येक लोक तर असें म्हणत कीं स्वत: मात्र नोकरीला चिकटून रहावयाचे आणि औद्योगिक उन्नतीच्या आणि तरुणांनीं नोकरींत पडूं नये, व्यापारांत पडावें या प्रकारच्या गप्पा मारण्यांत पुढाकार घ्यावयाचा असें त्यांचें आयुष्य आहे. प्रो. गोगटे अमेरिकेला जाण्यापूर्वी त्यांचा विद्यार्थी गंगाधर हाच अमेरिकेला गेला. गंगाधरानें कॉलेज सोडले त्या वेळेस त्याचा आणि प्रोफेसर गोगटे यांचा जो संवाद झाला तो थोडासा लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्या संवादाची गोगटयासच अमेरिकेत असतां वारंवार आठवण होई.

" केवळ देशोद्धारासाठी जी मंडळी हातीं घेतलेले कार्य टाकून देण्यास प्रवृत्त होतात ती केवळ उनाडकी करतात असा अनुभव आहे " असे जे प्रोफेसर शंकरराव गोगटे म्हणत ते वाक्य इंदूर येथें असतांनाच ते उच्चारीत असत. व तें वाक्य गंगाधरपंतांच्या चांगल्या तऱ्हेनें लक्षांत राहिले होते. शंकरराव म्हणत कीं " जे लोक राज्यक्रांतीच्या गोष्टी बोलतात त्यांचे ज्ञान आणि अनुभव काय तर काव्य वाचून बी. ए. झाले असतात, पुढे एल्‌एल्. बी. होतात, पुढें वर्तमानपत्र चालवूं लागतात आणि झोकबाज आणि जोरदार लेख लिहिण्याचें कौशल्य त्यांनां लाभलेलें असतें, आणि हे जोरदार लेख लिहिण्यांत त्यांची जी तयारी झालेली असते ती विशेषेंकरून आपल्या आसपासच्या मोठया लोकांची निंदा करण्यांत कौशल्य खर्चून झालेली असते. अमक्या अमक्या कॉलेजच्या प्रोफेसरची कशी काढली; हें दाखवूनच

ते लोक महत्त्व पावतात, आणि राज्यक्रांति कशी करावी या प्रश्नावर अधिकारी वक्ते बनतात. आणि ते लोक गुप्त मंडळ्या यूरोपांत कशा बनविल्या गेल्या ते सांगतात, आणि आपल्या मुलाला मात्र सरकारी अधिकाऱ्याच्या कृपेत रहावें म्हणून सल्ला देतात. आपण सावकारी करीत असतां शंभर रुपये तारणाशिवाय किंवा कमी व्याजानें ते देणार नाहींत आणि भोवतालच्या उत्साही तरुणांस, तुम्हांस आपला जीव धोक्यांत घालण्याचें साहस नाहीं, म्हणून चिडवितात; असल्या प्रकारच्या उपदेशकांपासून हिंदुस्थान केव्हां सुटेल तो सुटो! त्यांनां त्याच्या दुष्कृत्यांचे फळ मिळेल आणि ते त्यांच्या नादीं लागलेल्या त्यांच्या कट्टया चहात्यांकडून मिळेल. पण तुम्हां तरुणांचे आयुष्य मात्र आज खराब होत आहे. एका साधु बनलेल्या ..ंि.ि.न ने अनेक सुशिक्षित लोक आपल्या नादीं लावले, तथापि पुढे त्या साधूला जेव्हां त्याच्या शिष्यिणीपासून मुलें होऊं लागलीं, तेव्हां त्याच्या नागपूरच्या शिष्यांनीं त्या मठांतच जाऊन आपल्या गुरूची पादपूजा कशी केली याची कथा ते आपल्या स्नेह्यांस सांगत आणि त्याप्रमाणेच, या बदमाष राजकीय गुरूंचें पुढेंमागें होणार असें शंकरराव भाकीत करीत होते. गंगाधरपंत म्हणाले "ते गुरु बदमाष असतील पण आपल्याला त्यांच्याशीं काय करावयाचे आहे.त्यांनां आपल्या उपदेशाप्रमाणे आचरण ठेवतां येत नसेल पण ते त्यांचे दौर्बल्य आहे." गंगाधरपंतांनां जेव्हां कॉलेज सोडावें लागले तेव्हां, "शिवाजीउत्सव सरकारला मंजूर नाहीं, हें मला ठाऊक नव्हतें आणि मी इतःपर त्या उत्सवांत भाग घेणार नाहीं असें म्हणून तुम्हीं आपल्यावरचा आक्षेप दूर करून घेऊन कॉलेजांत रुजू व्हा" असे त्यांस प्रोफेसर शंकरराव यांनीं सांगितलें, आणि एवढें कबूल करीत असाल तर तुम्हांस कॉलेजांत पुन्हां घेण्याची खटपट करतों म्हणून देखील आश्वासन दिलें. पण त्याला गंगाधरानें उत्तर दिलें कीं "सर, असें खोटें बोलून तात्पुरती सोडवणूक होईल. कॉलेजमध्यें मी प्रविष्ट होईन, आणि शिवाजीचा उत्सवहि कदाचित् राजमान्य होईल पण मी मात्र आपल्या मनाविरुद्ध कां होईना पण प्रतिज्ञा केल्यामुळे शिवाजीउत्सवाला मुकेन कीं नाहीं! म्हणजे लबाड लोकांनी हें राज्य प्रासिलें आहे, त्यांनां टोपी फिरवावयास वेळ नाही, पण त्यांच्या मताबरोबर आपण आपले मत फिरवीत जाणें आणि त्यांच्या लबाड वर्तनाबरोबर आपण लबाड वर्तन करीत जाणे ही गोष्ट खरोखर प्रजेच्या कल्याणाची। नाही. जर तुम्हांस माझ्याकरतां कांहीं खटपट करावयाची असेल तर तुम्हीं सर्व मंडळी मिळून माझ्याविरुद्ध जो निकाल झाला आहे त्या निकालाविरुद्ध निषेध करून मी जे केलें आहे तें योग्य ठरावें याप्रकारची खटपट करा."प्रो.शंकरराव यांनी तसें केलें नाहीं. ते म्हणाले "आपणांस येथें रहावयाचें आहे. जेव्हां दरबार म्हणजे पोलिटिकल एजंट शिवाजी उत्सवाविरुद्ध असेल तेव्हां तो ते उत्सव बंद करील आणि त्यावेळेस तो उत्सव करणे गुन्हा होईल, पण जेव्हां पो. एजंट हा उत्सव मंजूर करील तेव्हां तो करण्यास हरकत नाहीं. तर ज्यावेळेस जे मना असेल तें न करणे आणि ज्यावेळेस जें मंजूर असेल तें करणें याप्रकारच्या आचरणांत गैर तें काय आहे?" गंगाधरपंत म्हणाले "जर या राज्यांत चांगल्या गोष्टी गैर ठरूं लागल्या तर त्या राज्यांत रहाणेंच नको—

**'त्यांत पळ न वसावें**
**ज्यांत दुरित भीति, धर्म, नय नाहीं**
**तृणचरमुखें सुखें अव-**
**लोकावीं खळमुखें न नयनांहीं.'**

हेंच तत्त्व मला पटतें."

"मला हें तत्त्व मंजूर नाहीं" शंकरराव म्हणाले. "जर राज्य वाईट असेल तर तें सुधारण्याचा प्रयत्न करणें व्यक्तीचें कर्तव्य आहे.

राज्यव्यवस्था वाईट आहे म्हणून राज्याचाच त्याग करणें हें कृत्य देशाभिमानी व्यक्तींस शोभत नाहीं!"

"राज्य सुधारणें ही गोष्ट देशाभिमानाची आहे खरी, पण तें शक्य कोणास आहे. जी मंडळी सरकारी नोकरींत वजनदार आहेत त्यांचेंच हें कर्तव्य होय, माझ्यासारख्या विद्यार्थ्यांचें कर्तव्य नव्हे. माझा स्वभाव अजून बनावयाचा आहे, तो जर मी या पाजी राष्ट्रांत बनूं दिला तर मी देखील बडगा पाहून भिणारा आणि वाटेल तें खोटें बोलण्यास कबूल होणारा मुत्सद्दी बनेन यांत शंका नाहीं. आणि मी तसा बनणे ही गोष्ट या राज्यास तरी हितावह होईल काय? बापाच्या तावडींत असलेला नवरा बायकोचा अपराध नसतां बापाला खूष करण्यासाठीं विनाकारण बायकोवर रागावतो, त्याप्रमाणें तुम्ही हे कॉलेजचे प्रोफेसर आणि प्रिन्सिपाल. विद्यार्थ्यांच्या स्वाभाविक सद्गुणांस तुम्ही दुर्गुण कां ठरवितां तर वरच्या वर्गास खूष करावें म्हणून. तुमची सदसद्विवेक बुद्धि जर चिरडली जात आहे तर तुम्ही आमच्या मनावर आपल्या उदाहरणानें संस्कार तो काय घडविणार?"

प्रो. गोगटे यांस गंगाधरपंतांचा बुद्धिवाद पटला नाहीं असें नाहीं. पण परिस्थिति जर विरुद्ध असेल तर तरुण विद्यार्थ्यांनीं परिस्थितीशीं झगडण्याची जबाबदारी आपल्यावर घेऊं नये असें त्यांस वाटत होतें. त्यांस असें दिसत होतें कीं अनेक विद्यार्थी या गुलामगिरीविरुद्ध बोलतात; शाळा किंवा कॉलेज सोडून देतात, आणि पुन्हां परिस्थितीच्या माऱ्याचे दोन वळसे आणखी मिळाले म्हणजे पुन्हां लाचार होऊन नोकरी मागावयास सरकारच्या दारीं येतात. आपल्या प्रिय विद्यार्थ्यांची स्थिति तशी होऊं नये अशीच त्यांची इच्छा होती.

"आम्ही काय करावें असें तुझें म्हण आहे?" प्रो. शंकररावांनीं विचारले.

"तुम्ही नोकरी सोडून द्यावी व त्यास कार सांगावें कीं जें राज्य आपल्या संस्थानाच्या आद संस्थापकाचा उत्सव करणे गुन्हा ठरविते त राज्याची नोकरी मला करावयाची नाहीं!"

"आम्ही नोकरी सोडून द्यावयाची आणि म करावयाचें काय?"

"प्रोफेसरसाहेब, तुमचा हा प्रश्न ऐकून मल आश्चर्य वाटते, पण आश्चर्य तरी कसलें? तुमच्य या प्रश्नानें माझे डोळे तर चांगलेच उघडले तुम्ही येथील प्रोफेसरांमध्यें अग्रगण्य समजले जातां तरी देखील आपली नोकरी गेली त आपण पुढें काय करावे हा प्रश्न तुमच्या पुढें पडल आहे! म्हणजे इतकें शिक्षण मिळून देखील तुम्हांस परावलंबित्व उत्पन्न होतें तर इतर लोकांची कथा काय? तुम्हांस मिळालेल्या शिक्षणाची जगाच्या बाजारांत किंमत फार कमी आहे अशी तुमचीहि भावना आहे; पण प्रोफेसरसाहेब, तुम्हांस एक गोष्ट सांगण्याची मी परवानगी घेतों, ती ही कीं, तुमच्यासारख्या स्वतंत्र वृत्तीच्या मनुष्यास या राज्यांत आपली नोकरी फार वेळ टिकवितां येणार नाहीं.—"

"तर मग तूं काय योजिलें आहेस?"

"मी असें योजिले आहे कीं ज्या शिक्षणाची किंमत राज्यांत उलटापालटी झाल्या तरी कमी होणार नाहीं—जें शिक्षण प्राप्त झालें असतां जगांत वाटेल तिकडे उपजीविका करतां येईल असेंच शिक्षण मला घ्यावयाचें आहे. या स्वराज्याच्या नांवाखालीं चालू असलेल्या परक्या राज्यामध्यें स्वतंत्र भावनांच्या प्रत्येक व्यक्तीस सरकारी अधिकारी त्याची गुरमी मोडण्याची खटपट करून नरम करीत रहाणार! तेव्हां या राज्यांत तर राहाण्याचाच विचार नको!"

"पण मग संस्थानच्या सुधारणेचें कर्तव्य कोणी करावें?"

"तुम्ही तरी कितपत करणार! जर तुम्हांस या संस्थानानें नोकरीवरून काढून टाकलें तर तुम्ही या संस्थानाच्या सुधारणेकडे लक्ष घाल कीं ज्या दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं नोकरी मिळेल तिकडे जाल—"

"परभणीकर, तूं मला आपल्या बोलण्यानें तर निरुत्तर करीत आहेस! तुझा बाणा पाहून मला आनंद होत नाहीं असें नाहीं. तुला आपल्या स्वतंत्र भावनांचें संरक्षण जरूर केलें पाहिजे, एवढेंच नव्हे तर यांचा विकासहि केला पाहिजे, हेंहि मी कबूल करता. तथापि या तऱ्हेच्या उच्च भावना तुझ्या अंगीं आहेत तेवढयावरच तुला आपलें भवितव्य सुखकर करतां येणार नाहीं, जर तूं कॉलेज सोडून गेलास तर तुला जवळ जवळ देशच सोडावा लागेल, कां कीं, या कॉलेजांतून तूं निघालास म्हणजे या देशांतील दुसऱ्या कोणत्याहि कॉलेजांत तुझा प्रवेश होणार नाही. विदेशीं जाऊन शिक्षण संपादणें म्हणजे फारच खर्चाची गोष्ट आहे."

"माझ्यापेक्षां कमी शिक्षणाचे अनेक मारवाडी गुजराथी चांगल्या तऱ्हेने पोट भरीत नाहींत काय? मी त्यांचाच मार्ग अवलंबीन, सुरळीत बी.ए. होऊन पुढे सुरळीत नोकरी करून मध्येच अधिकाऱ्यांच्या गैरमर्जीमुळें प्रसंग ओढवणार तो या तरुण वयांतच ओढवला तर बरें होणार नाहीं काय? मला सरळ सांगा कीं, माझी आजची स्थिति आणि तुमची आज नोकरी गेली असतां होणारी स्थिति यापैकीं कोणाची स्थिति आज बरी आहे असें तुम्हांस वाटतें?"

"मला वाटतें कीं, आज तुझीच स्थिति अधिक बरी आहे. मला तीनशें रुपये खर्च करण्याची संवय झाली आहे. आणि सरकारी नोकरी गेली तर मला दुसरीकडे कोठें शंभर रुपयेहि मिळतील की नाही हा प्रश्नच आहे! आज तूं सरकारी नोकरींत शिरलास तर तुला तींत पंचवीस तीस रुपये मिळतील व कोणा कंत्राटदाराकडे नोकरीला गेलास तर सुमारें तितकेच मिळतील, व पुढें तूं ज्या खासगी धंदा करणाराकडे नोकरी करूं लागशील त्या मनुष्याचा धंदा तुला समजूं लागला म्हणजे स्वतः देखील धंदा करूं लागशील."

"तर तुम्हीं असेंहि म्हणाल कीं मला काढून टाकलें नसतें तरी मी शिक्षणक्रम सोडून देऊन एखादा धंदा करणाऱ्याकडे नोकरी करणे श्रेयस्कर होईल—"

"तसें म्हणण्यास मला तरी हरकत दिसत नाहीं."

येणेंप्रमाणे कॉलेज सोडतेवेळेस प्रोफेसर गोगटे आणि गंगाधरपंत यांचे बोलणें झाले होतें आणि प्रो. गोगटे आपल्या या स्वतंत्र भावनेच्या विद्यार्थ्याचा भावी आयुष्यक्रम कसा काय होत आहे हें शिक्षकाच्या कुतूहलदृष्टीनें पहात होते.

कांहीं दिवसांनीं इंदूरचें वातावरण जरा निराळें होऊन प्रो. गोगटे यांसहि नोकरी सोडावी लागली. आणि ते पुढें दोन वर्षांच्या आंत अमेरिकेस आले. तेथें त्यांनीं विजेच्या मालाच्या कारखान्यांत प्रथमतः साधारण मजुराची नोकरी धरली. तथापि ते चांगले शास्त्रज्ञ असल्यामुळें त्या कारखान्यांत त्यांनां चांगलेंच महत्त्व आलें आणि त्या कारखान्याचे ते दुय्यम म्यानेजर झाले. त्यांनां पगार चांगला असल्यामुळें आणि त्यांच्या बुद्धिमत्तेमुळें तेथील हिंदुस्थानी मंडळींत त्यांनां बरेंच महत्त्व प्राप्त झालें.

---

## प्रकरण १० वें.

## रामतीर्थांचा शिष्य.

मि. विलकाक्स यांनीं "सेटलर्स असोसिएशन" स्थापन झाल्याबद्दल जी सहानुभूति

दाखविली होती तीमुळे प्रो. गोगटे आणि विलकाक्स यांची मैत्री अधिक दृढ झाली. हिंदुस्थानच्या उन्नतीसाठीं होणाऱ्या आपल्या प्रयत्नास माझा कांहीं उपयोग झाला तर आपण करून घ्यावा असे प्रो. गोगटे यांस मि. विलकाक्स यांनीं कळविलें होतें. प्रो. गोगटे एकदां भेटले असतां त्यांनीं मि. विलकाक्स यांस असा प्रश्न केला कीं, हिंदुस्थानी लोकांचें बरें व्हावे ही इच्छा तुम्हांस कशी झाली, देशाभिमानापेक्षां व्यापक भावना तुमच्या मनांत कशी उत्पन्न झाली? "हे सर्व स्वामी रामतीर्थांच्या प्रयत्नाचें फल होय" असें विलकाक्सनीं उत्तर दिलें. स्वामी रामतीर्थांनी तुम्हांस काय उपदेश केला असाहि प्रश्न प्रो. गोगटे यांनीं विचारला तेव्हां विलकाक्स यांनीं उत्तर दिलें कीं, आपण या विषयावर सवडीप्रमाणे बोलूं.

पुढें एके दिवशीं या विषयावर अघळपघळ बोलण्यासाठींच विलकाक्सनीं प्रो.गोगटयांनां जेवावयास बोलाविलें, त्या वेळचा जो संवाद झाला तो प्रो. गोगटयांची मते उर्फ सेटलर्स असोसिएशनचे धोरण निश्चित करण्यास बराच कारण झाला असावा अशी ,ष्कळांची कल्पना आहे.

"स्वामी रामतीर्थांनीं माझ्यासाठी जें केले त्याचा उतराई होणे मला अशक्य आहे. माझ्या आयुष्याचे स्वरूप ठरविण्यास स्वामी कारण झाले. १९०४ सालीं स्वामीजींचा उपदेश ऐकण्यास जेव्हां मी जात असे तेव्हां मी पसतीस वर्षांचा होतों. त्या वेळेस माझें स्थित्यंतर होत होतें. पूर्वी मी सामान्य यांत्रिक काम करणारा होतो, तो यंत्रशोधक आणि कारखान्याचा मालक व्हावें या अपेक्षेचा झालों होतों आणि शिवण्याच्या यंत्रासारखीं लहान यंत्रे, किंवा त्याहूनहि लहान यत्रे चालविण्यासाठीं विजेच्या मोटर करण्याच्या खटपटींत मी होतो. मला असे वाटे कीं, प्रत्येक मनुष्य कारखानदार आहे. प्रत्येक घरांत ज्या अनेक क्रिया होतात त्या क्रियांस अनुरूप अशी यंत्रयोजना कां होऊं नये? घरांतले बायकांचे श्रम वांचविण्यास आपल्या यांत्रिक विद्येचा उपयोग कां होऊं नये? यासाठी लहान मोटर करण्याच्या कामांत मी गुंतलो पण मोटर लहान केली तर ती टिकाऊ होईना! यंत्रांचे कारखानदार त्यांत पन्नास दोष काढू लागले आणि लहान मोटर कार्यकारी करण्यासाठी ज्या मी सुधारणा करू लागलो त्यांची किमत बाजारांत कांहीच होईना! प्रत्येक अमेरिकन मनुष्याच्या गृहाचें स्वरूप पालटणे व व्यक्तीचा आयुष्यक्रम सुलभ करणे हें माझे ध्येय मला सोडावेसे वाटेना. त्या वेळेस मी कामधंदा सोडून देऊन यांत्रिक शोधाच्याच मागे लागलो होतों, आणि मी पैसे मिळवीत नाही म्हणून माझी बायको मला नालायख ठरवीत होती."

"मी तुम्हाला नालायख कधीं म्हटले? प्रो. गोगटे, जिम जें म्हणतो ते सगळें खरे नाही. मी त्यांस नालायख कधीच म्हटले नाही. व जर मी एकटीच असते तर मीहि त्याच्याबरोबर उपासमार काढावयास तयार असतें, पण घरांत मुलांनां खावयास द्यावयास किंवा दुधासाठी पैसे नाहीसे झाले म्हणजे काय करावयाचे! मुले भूकभूक म्हणून ओरडूं लागली आणि त्यांनां खायला द्यायला आईजवळ काही नसले म्हणजे ती यांत्रिक शोधाच्या नांवाने ओरडणार नाहीं तर काय करॉल!" मिसेस विलकाक्स म्हणाली.

"मी तुझे ओरडणे गैर तरी कधीं म्हटले! माझ्या शोधकपणाचा घरावर काय परिणाम होत होता, आणि त्यामुळे माझी घरांत किमत काय होत होती एवढेच मी सांगितलें" मि. विलकाक्स म्हणाले.

"मी तुम्हां दोघांचे बोलणें ऐकले. पण माझें सर्व लक्ष पुढील हकीकतीकडे आहे." प्रो. गोगटे म्हणाले.

" माझ्या मनांत आमचीं घरचीं भांडणे तुम्हाला ऐकवून कंटाळा आणायचा नाहींच, मला एवढेच सांगावयाचे कीं माझी घराबाहेर जितकी किमत आहे, तितकी घरांत नाहीं, अशी आज स्थिति आहे आणि या परिस्थितीचा इतिहास फार दूरवर जातो. एवढेंच मी सांगतों." मि. विलकाक्स प्रो. गोगटे यांच्याकडे वळून डोळे मिचकावून म्हणाले.

"थांब, तुझे कान उपटते" मिसेस विलकाक्स म्हणाली,

"अग, आमची पूजा करणें आज वीस वर्षे चाललेच आहे, पण या पाहुण्यांच्या देखत तरी माझी अशी शोभा करूं नको!"

"प्रो.गोगटे, आमच्याकडे कोणी जेवायला आले म्हणजे आमच्या पतिराजांची लहर, मी कजाग बायकोच्या तावडीत सांपडलेली गरीब बिचारी व्यक्ति आहे असे दाखवून, पाहुण्याची स्वतःकडे आणि माझ्याविरुद्ध सहानुभूति मिळविण्याचा प्रयत्न करण्याकडे लागते. कोणाला वाटेल की, किती तरी गरीब बिचारा सालस नवरा, एखाद्या कैदाशिणीच्या हातीं लागला आहे !! आपल्याच घरीं आपण मुलाचे नोकर, बायकोचे बंदिवान आपला हक्क काय तर जे दोन घांस बायको खायला घालील तेवढे खाण्याचा आहे असें आपल्या गरीबपणाचे सोंग यांनां करायला पाहिजे असतें. हे आपला धंदा चुकले!! कारखानदार बनण्याच्या ऐवजी नाटकी बनले असते तर अधिक चांगलें झाले असते!" मिसेस विलकाक्स बोलल्या.

"अगदी बरोबर बोललीस, कधीं कधीं मलाहि असें वाटतें की मी मेक्यानिक आणि यंत्र-सशोधक बनण्याऐवजीं नाटक्याच बनलो असतो तर किती तरी बरें झाले असते, माझी बायको जी नाटक कपनी येईल तिच्या नाटकांतील नायकावर दर आठवडयास फिदा होते व त्या नायक-पार्टी नटाची तारीफ माझ्या, म्हणजे तिच्या नवऱ्याच्या, कानीं दररोज पडायची, हाहि प्रकार आमच्या घरांत चालतो, तेव्हां वाटते कीं मीच जर नट झालों असतो तर किती तरी चांगले झाले असतें!"

"पहा, माझ्या जिमला मी वेडा म्हणूं नको तर काय म्हणू, जिम जर नट झाला असता आणि कंपनीमध्ये मुख्य नट बनला असता तर मी त्याची फार तर एक आठवडाभर चहा केली असती, व ती देखील त्याला कळवली असतीच असे नाहीं. दुसऱ्या आठवडयाला दुसरा नट मला आवडला असता व मी त्याची तारीफ करायला लागले असते म्हणजे जिमने माझ्या डोक्यांत कांहीं तरी घातले असते, आणि बायको मेली म्हणून रडत बसला असता, आणि खुनी म्हणून संस्थानाच्या कोर्टाकडून "इलेक्ट्रोक्यूट" झाला असता (विजेनें फांशी जाता). नट झाला नाही हे बरे नाहीं झाले?"

"पण आता तुम्हींच म्हणाला होतानां कीं नट झाला असता तर ते चांगले झाले असते म्हणून?"

"पण ते केवळ त्यांच्या घरांत दिसून येणाऱ्या सोगाडेपणामुळे म्हटले. तेवढयाच सोगडेपणाच्या कलेवर त्यास पैसे मिळवितां येतील अशी माझी खात्री नाही. पण उच्च प्रतीच्या नटाचे जरी काम करता आले नाही तरी सामान्य प्रतीच्या नटाचे काम जिमला खास येईल असे समजण्यास हरकत नाही."

"बरे, मि. विलकाक्सनीं दुसरा धंदा पत्करला असता तर तो त्यांनां कसा काय करतां आला असता ही चर्चा नको. ती चर्चा आज तरी निरुपयोगी आहे." प्रो. गोगटे म्हणाले.

"तुम्ही निरुपयोगी असे कां म्हणतां, पुनर्जन्मावर तुमचा विश्वास नाहीं काय? मनुष्याला पुनर्जन्म कर्माप्रमाणे किंवा वासनेप्रमाणें मिळतो असे जर आहे तर आपण आपल्या जन्माची किंवा आयुष्यस्वरूपाची चर्चा करून आपलें पुढल्या जन्मींचें आयुष्य कसे जावे याविषयींची

इच्छा निश्चित करून ठेवावयास नको काय? मनुष्यास आपल्या वासना निश्चित करून पुनर्जन्माचे स्वरूप निश्चित करण्याची शक्यता नसेल तर कर्म आणि पुनर्जन्म यांचा सबध जोडणारे तत्त्वज्ञान आहे त्याचा उपयोगच काय?'' मि. विलकाक्स प्रो. गोगटे यांच्याकडे पाहून म्हणाले.

" आला, तुम्हीं आपल्या वादाच्या रगांत आला '' मिसेस विलकाक्स म्हणाली, आणि पुढे प्रो. गोगटे यांच्याकडे पाहून म्हणाली, ''पुनर्जन्म आणि कर्म यांची चर्चा हे करूं लागले म्हणजे रात्रीची सकाळ झाली तरी वादविवाद कधी संपावयाचा नाहीं!''

इतक्यांत जेवणाची घंटा झाली आणि अचानक वादग्रंथाचें पहिलें प्रकरण तेथे समाप्त झालें.

जेवतांनां गोष्टी रामतीर्थाविषयी एकाएकीं निघाल्या नाहींत. कांहीं गोष्टी कामताविषयीं निघाल्या; त्यावेळीं कामत याच्याकडून त्याच्या कारखान्यातील मालाला किती मागणी मिळाली या गोष्टी देखील झाल्या. मिसेस विलकाक्सने, मिस कामत आज अनेक वर्षे एका तरुण गृहस्थाबरोबर दृष्टीस पडते तो कोण आहे इत्यादि गोष्टी विचारल्या, पुनर्जन्मावर प्रो. गोगटे यांचा विश्वास कितपत आहे असा मिसेस विलकाक्सने प्रश्न केला, त्या प्रश्नाचे उत्तर देणे प्रो. गोगटे यांनी कोणती तरी एक क्लृप्ति वापरून टाळले आणि भाषणाचा ओघ इतर विषयावरून ओढीत ओढीत पुन्हां स्वामी रामतीर्थावर आणून ठेवला. तेव्हां शेवटी मि. विलकाक्सने आपल्या गुरूविषयीं बोलावयास प्रारभ केला.

''माझ्या आयुष्यास हेतु स्वामीनी उत्पन्न करून दिला. स्वामी म्हणाले कीं, प्रत्येक मनुष्य कांहीं तरी विशिष्ट कार्य करण्यास जन्मास येतो. प्रत्येक मनुष्यानें आपले अवतारकार्य ओळखावे. अवतार म्हणजे मोठ्या मनुष्याच्या ठायीं ईश्वरत्व जास्त वैशिष्ट्यानें प्रकट होतें ही भावना, दुसर कांहीं नाहीं, असे स्वामी वारंवार मला सांगत. प्रत्येक मनुष्य जर ईश्वराचा अंश आहे तर प्रत्येक सामान्य व्यक्तीस देखील अवतारकार्य आहेच. असे जे आम्हांस स्वामी सांगत, त्यामुळे आपल्या आयुष्यक्रमाच्या गांभीर्याची मला चांगलीच कल्पना आली, आणि ही भावना माझ्या हृदयात जागृत झाली याबद्दल मी स्वामींचा फार ऋणी आहे. प्रत्येक मनुष्य स्वतःच्या हितासाठीं फारच थोड्या गोष्टी करतो. मोठा कर्तृत्ववान मनुष्य पुष्कळ पैसे मिळवितो, मोठा कारखाना काढतो, मोठे घर बांधतो या सर्व गोष्टी जरी तो करतो तरी त्या गोष्टी त्याच्या हातून होण्यासाठीं आपला यांत फायदा आहे किंवा या गोष्टी यशस्वी होण्याने फायदा होणार तो माझा होणार अशी त्यास भावना असावी लागते. महत्त्वाकांक्षी कारखानदारास पैसे मिळविण्याच्या हेतूशिवाय त्याच्या हातून अनेक लोकांस एकत्र करून उत्पादन करण्याची क्रिया करण्याचे कार्य कसें होईल? यासाठींच त्याला फायदा करून घेण्याचें निमित्त त्यास कार्य करण्यास लावण्यास उपयोगी पडते, आणि त्याच्याकडून महत्कार्य करविते. व्यक्तीचा फायदा हें खरोखर साध्य नव्हे, अजाण व्यक्तीच्या हातून कार्य होण्यास ती एक ईश्वरी युक्ति होय. व्यक्तीचें अवतारकृत्य हे साध्य असून त्यास मिळणारा पैसा, त्याचे कार्य साध्य व्हावें म्हणून ही केवळ एक मधली पायरी आहे हें स्वामी मला सांगत.

''मनुष्य फायद्यासाठीं काम करतो पण फायदा हा केवळ लहान मुलाचा खाऊ आहे. जें मुलानें करावे असे आईबापास वाटते तेंच मुलाच्या हातून करविण्यास त्यांस खाऊचा मोह उत्पन्न करून तें त्यास करावयास लावावयाचे, पण मुलगा पुढें मोठा झाला, म्हणजे त्यांस आईबापांनीं जें पूर्वी सांगितले असेल ते करण्याचें प्रयोजन सांगून

कार्यप्रवृत्त करावयाचें, ही जशी लहानशा संसारांतील रीत तशीच जगाच्या ससारांतहि आहे. फायद्याचें आमिष मनुष्यास लागून मनुष्य कार्यप्रवृत्त होतो व तो दुसऱ्यासहि कार्यास फायद्याचे आमिष लावूनच प्रवृत्त करतो. जो फायद्याचे आमिष लावून दुसऱ्याकडून काम कमवून घेतो तो मनुष्याची किमत ओळखणारा म्हणजे त्या लहानशा मनुष्याच्या अवतारकार्याची मर्यादा ओळखणारा असतो. त्यांस वाटतें कीं अमक्या मनुष्याकडून अमुक कार्य ठीक होईल, असें म्हणूनच तो त्या मनुष्यास त्या कार्यास प्रवृत्त करतो. त्या मनुष्यास हळू हळू त्याने पत्करलेल्या कार्याचा अभिमान उत्पन्न होतो आणि तो आपलें आचरण आपल्या पत्करलेल्या कर्माच्या अभिमानानें करतो. तो पैशाकडेसच केवळ लक्ष देत नाहीं. सुतारास ओझें उचलण्याचें काम सांगितलें तर तो सुतार म्हणतो की हे माझें काम नव्हे. तर पैशाकरतां काम करणे ही पहिली पायरी होय. सामान्य मनुष्याचें अवतार कार्य दुसरे ठरवीत असतात. तर जास्त उच्च मनुष्याचें अवतारकार्य ज्याचा तोच ठरवीत असतो. प्राप्तीची किंवा द्रव्याची आशा ही केवळ विशिष्ट कार्यास मनुष्यास प्रेरित करते, मनुष्य सजाण झाला म्हणजे तो आपल्या कार्याचे महत्त्व ओळखतो. स्वामींनीं जेव्हां हे कार्याचें महत्त्व ओळखून कार्यापासून होणाऱ्या प्राप्तीला कमी महत्त्व द्यावें ही बुद्धि माझ्याठायी उत्पन्न केली तेव्हापासून माझ्या उदयास प्रारंभ झाला असे मी समजतों. जेव्हां मी आपल्या कार्याचे महत्त्व ओळखलें तेव्हां माझ्या झालेल्या द्रव्याविषयक निराशेपासून मला व्यथा होईनाशी झाली, आणि कर्तव्याची भावनाच मला प्रेरणा करूं लागली, आणि जो नेट मला द्रव्याच्या आशेनें उत्पन्न झाला नसता तो नेट मला कर्तव्याच्या महत्त्वाच्या ज्ञानाने आणि आपल्या अवतारकृत्याच्या कल्पनेनें उत्पन्न झाला. मला पूर्वी असें वाटत असे कीं अवतारकृत्य वगैरे कल्पना येशू, श्रीकृष्ण अशा लोकांच्या संबंधानेंच लागू आहेत मजसारख्या सामान्य मनुष्याला देखील अवतारकृत्य आहे ही मला कल्पनाच नव्हती. पण ही कल्पना माझ्या मनांत स्वामींच्या ससर्गानें इतकी ठसली कीं माझी काम करण्याची शक्ति तिच्यायोगानें कितीतरी पट वाढली, आणि जगांतील जे मोठमोठे कार्यकर्ते होऊन गेले त्यांच्याविषयीं माझ्यामध्यें आपलेपणा वाटू लागला, आणि मी देखील ईश्वरच आहे, असेंहि वाटू लागले. यानंतर मला स्वामींनी गीतेचे भाषांतर वाचावयास दिलें. आणि तेव्हां मला गीतेंतील प्रत्येक वाक्यांत काय जादू भरली आहे ती समजूं लागली. स्वामी नसते तर गीता मला समजलीच नसती, आणि ती समजली नसती तर आत्मोन्नतिकारक किंवा मानसोन्नतिकारक प्रेरणा माझ्या मनांत उत्पन्नच झाली नसती.

" मी आपले कार्य आनंदाने करीत होतों, व माझ्या कार्यासाठी मी दुसऱ्याचें वर्कशॉप वापरीत होतो आणि त्याचे भाडे देत होतो आणि माझ्याकडे जी त्या वर्कशॉपमधलीं माणसें जितकीं लागत होती त्याचे पगारहि देत होतो. पुढें मी स्वतःच्या कारखान्याचा मालक झालों पण खरोखर पहातां मी माझ्या कामकऱ्यापेक्षां माझ्या, फिटर व टर्नर यांपेक्षां दरिद्री होतों, पण फिटर आणि टर्नर यांचे परिश्रम माझ्या कल्पनेच्या म्हणजे माझ्या ध्येयाच्या पूर्णतेसाठीं लागत आहेत म्हणून मी आनंद मानीत होतो, एकदां मी असा विचार केला की मी जगाची प्रगति करण्याकरतां खटपट करतो पण प्रगतीचा सेवक जो मी तो दारिद्र्यांतच आहें आणि वेतनाचा सेवक जो माझा फिटर किंवा टर्नर तो भरपूर अन्न जेवीत आहे. हा जगांत काय बरें उलटा न्याय आहे, आणि हें माझें कोडें मी एकदां स्वामीपुढे ठेवलें.

"मी स्वामीजींस एकदां विचारिले कीं मनुष्य जो अत्यंत मेहनती आहे, अवतारकृत्य ओळखणारा आहे आणि समाजहितपर भावनेचा आहे तो नेहमी दारिद्र्यांतच राहणार काय? या प्रश्नास स्वामीजीनी जे उत्तर दिले त्यावरून स्वामी अर्थशास्त्रज्ञांचेच गुरू आहेत की काय अशी एक माझ्या मनांत कल्पना आली. मी या भगव्या कपड्यांत हिंडणाऱ्या आणि जवळ कांहींहि न बाळगणाऱ्या व्यक्तीस पक्के अर्थशास्त्रज्ञ म्हणून ओळखातो. त्यानीं मला सांगितले की जी सुधारणा लोकोपयोगी आहे ती सुधारणा जितक्या जास्त लोकांच्या उपयोगाची आहे त्या मानाने त्या व्यक्तीस पैसा हा मिळवयाचाच. परंतु तो कार्य करीत असतां चालू व्यवहारांतील एक स्वाभाविक गोष्ट या नात्यानें त्याच्याकडे यावयाचा. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य पुढचा पल्ला गाठीत असतां अलीकडच्या पल्लयावर ज्या गोष्टी असतील त्या गोष्टी त्यास दिसावयाच्याच, त्याप्रमाणेच जगांतील सर्व व्यवहारांत आहे. लाखाची प्राप्ति करून घेऊं इच्छिणारा मनुष्य हजारो रुपये स्वाभाविकपणेच मिळवितो. त्याप्रमाणेंच ज्या मानवी सेवेसाठी मनुष्य कार्यप्रवृत्त होत आहे त्या मानवी सेवेपासून होणाऱ्या प्राप्तीचे पैसे त्या मनुष्यास स्वाभाविकपणें मिळतीलच तर लोकसेवेचें ध्येय श्रीमंत होण्याच्या ध्येयाशीं विसंगत नाही. तर श्रीमती ही केवळ लोकसेवारूपी उद्दिष्ट स्थलीं पोहोंचण्यापूर्वी रस्त्यांत लागणारा एक मैलाचा दगड आहे. श्रीमंती अनेक अडचणीनंतर येते. केवळ श्रीमंतीसाठी धडपडणारा मनुष्य मध्यें नुकसानी आली तर कार्य सोडून देईल पण ध्येयापाठीमागे लागलेला मनुष्य मध्ये नुकसान आलें तरी कार्य सोडीत नाहीं; व त्यामुळें ध्येयापाठीमागें लागलेल्या मनुष्याचा परिश्रम अधिक विश्वसनीय आणि त्यामुळे अधिक किंमतीचा आहे. या सर्व गोष्टी सांगणारा मला अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ मंडळींत कोणीहि भेटला नाही. आणि या स्वामींच्या उपदेशाविषयी मी जसजसा विचार करूं लागतो तसतसे मला असे वाटू लागते कीं अर्थशास्त्र आणि अध्यात्म यांची सांगड घालणारा तत्त्ववेत्ता जगांत "स्वामी राम" यांच्याशिवाय दुसरा कोणीहि नाहीं. तुझा शोध जगात जर उपयोगी असेल तर त्या शोधाचा फायदा जितक्या जास्त लोकांस मिळेल तितक्या लोकांस मिळण्याची तेवढी खटपट कर, पैशाकडे लक्षहि देऊं नको असे त्यांनीं मला सांगितले आणि त्यामुळे माझ्या यंत्रांचा दहा लक्ष गृहांतून प्रसार व्हावा या दृष्टीनेंच मी योजना केली. त्यावेळेस मला असें दिसून येऊ लागलें की, यंत्र फारच थोड्या किंमतींत लोकांनां देतां येईल. आणि तसे करतां करतां म्हणजे केवळ प्रसाराच्या दृष्टीनेच काम करता करतां माझी पुंजी सहजच वाढत चालली."

"तुम्ही स्वामी रामतीर्थांस इतका मान कां देतां याचें कारण आतांपर्यंत माझ्या लक्षांत आले नव्हते. तुमच्या आयुष्यास त्यांनी हेतु उत्पन्न केला, आर्थिक भावनांचा क्षय होऊं न देतां त्याहून उच्चतर अशी भावना स्वामी रामतीर्थांनी तुमच्या ठायीं जागृत केली. तुमच्यासारख्या चार पांच कार्यकर्त्यांस त्यांनीं जर कार्यप्रवृत्त केले, आणि ते देखील उच्च भावना जागृत करून केले असेल तर त्यांचा आयुष्यक्रम आर्थिक दृष्ट्या फारच श्रेष्ठ प्रतीचा होऊन गेला असे मी म्हणेन. कां की कर्ते पुरुष हजारो लोकांनां कामास लावतात. तेव्हां कर्त्या व्यक्तीस जो उपदेश करून कार्यप्रवृत्त करतो तो कर्त्यांचा कर्ता होय. अर्थात तो अर्थशास्त्रीय दृष्टीने देखील "अत्यंत उत्पादक श्रम करणारा मनुष्य" होय. पण मला एक कोडें असे पडतें कीं, स्वामी रामतीर्थांसारख्या मनुष्यानें आपलें उपदेशामृत हिंदुस्थानी मनुष्यांस कां पाजलें नाहीं. हिंदुस्थानातील लोकांस

कर्तृत्ववान करण्याऐवजीं पाश्चात्त्यांचें कर्तृत्व वाढविण्याचें स्वामीजीनीं कां पत्करिलें. त्यांस देशाभिमान नव्हता की काय!"

मि. विलकाक्स म्हणाले, "स्वामीजींच्या संबधाने मला तो प्रश्न वारंवार उपस्थित होई. तेव्हां एकदा मी त्यांस तो प्रश्नहि केला, तेव्हां स्वामीजीनीं जें उत्तर दिलें तें माझ्या मनाला पटलें. त्या उत्तरानें तुमचें समाधान होईलच असे नाहीं, तरी तुम्हांस तें मी सांगतो."

"स्वामी याविषयीं काय म्हणाले?"

"स्वामी म्हणाले की, ज्याप्रमाणें व्यक्तीला अवतारकृत्य असतें त्याप्रमाणे राष्ट्रालाहि अवतारकृत्य असते, व्यक्ती आपले अवतारकृत्य करण्यासाठीच विशिष्ट भूमीचा आश्रय करतात, आणि ज्या भूमीचा त्या आश्रय करतात त्या भूमीवर राष्ट्र तयार होते, आणि त्या राष्ट्रामार्फत व्यक्तीचें सामुच्चयिक अवतारकृत्य दृष्ट होऊं लागतें."

"हिंदुस्थानास अवतारकृत्य नाहीं असें स्वामीचें म्हणणे होते काय?"

"असे त्यांचे म्हणणे मुळींच नव्हते, पण हिदुस्थानचे अवतारकृत्य करण्यास हिंदुस्थानी लोकांनी किंवा त्या लोकांतल्या कांहीं पुढाऱ्यांनी कांहीं काळ अन्य भूमीचा आश्रय करून आपली अवतारकृत्याची तयारी केली पाहिजे असें ते म्हणत. ते म्हणत की श्रीकृष्णाने आपली अवतारकृत्याची तयारी करण्यासाठीं मथुरा सोडून गोकुळाचा आश्रय केला नाहीं काय? हिंदुस्थानाला असें आपले अवतारकृत्य करण्यासाठी अमेरिकेस आले पाहिजे आणि तें करण्यासाठीं तयारी करण्याकरतां त्यांनी येथे यावे, म्हणून ही भूमि तयार करण्याचें काम "स्वामी राम" करीत आहे. स्वामी राम हें कार्य करील, आपला निरोप हिंदुस्थानाला देईल आणि नंतर स्वामी राम कैलासाला गमन करील!"

"स्वामी येथील भूमि योग्य कशी करणार होते?"

"माझ्यासारखे हिंदुस्थानाच्या अवतारकृत्याची जाणीव उत्पन्न झालेले व त्यांत मदत करूं इच्छिणारे लोक तयार करून."

"हिंदुस्थानचें अवतारकृत्य कोणतें याविषयीं स्वामी काय म्हणाले?"

"धर्मविषयक अत्यंत स्वतंत्र विचार उत्पन्न करणे, व प्रत्येक व्यक्तीस संप्रदायविशिष्ट धर्माच्या पलीकडेसच खरा जो धर्म आहे त्याची जाणीव करून देणें आणि जगाचे एकंदर स्वरूप पालटणे हे कर्म हिंदुस्थानच करील असें ते म्हणत. स्वामी म्हणत कीं खिस्तशकाच्या पूर्वी ५०० वर्षांपासून खिस्तोतर ५०० वर्षें हा काल घेतला तर त्यावेळेस बौद्ध संप्रदाय आणि हिंदुस्थानी शास्त्रज्ञ यांचा प्रसार सर्वत्र होत होता. त्या काळांत देखील यूरोपीय कला हिंदुस्थानास इतकी दिपवूं शकली कीं भारतीय नाटयकलेवरच मोठाले फेरफार झाले. तथापि हिंदुस्थानाचें वैशिष्टय त्याबरोबर जगभर पसरलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. तोच प्रकार आज होणार आहे. देशसंरक्षण करण्याचा धंदा पाश्चात्त्यांनीं आपल्या हातीं घेतला आहे तरी त्या बरोबर इतर धंदे करण्यास जग खुलें केलें आहे. हिंदुस्थानाच्या राष्ट्रीयत्वास मोठी अडचण आहे, कां की येथे हिदु आणि मुसुलमान आहेत आणि त्यांचा आयुष्यक्रम निरनिराळा झाला आहे. इतर ठिकाणीं राष्ट्रें संप्रदायाप्रमाणें विभागलीं आहेत. तुर्कस्तान खेरीज यूरोप खिस्ती आहे, तुर्कस्तानपासून अफगाणिस्तानपर्यंत प्रदेश मुसुलमानी आहे, व चीन आणि जपान हीं राष्ट्रें हिंदुस्थानाप्रमाणेंच राष्ट्रांतर्गत देवतांचीं उपासक पण निरनिराळ्या तत्त्वज्ञानानें बद्ध अशीं आहेत. आणि त्यांमध्यें खिस्ती व मुसुलमान या दोहोंचेंहि प्राबल्य नाहीं तर आज जरी या भिन्न प्रकारच्या लोकसमूहांचें एक राष्ट्र करण्याची क्रिया हिंदुस्थानला जड जात

आहे तरी ही क्रिया झाल्यानंतर हिंदुस्थानी लोकांची होणारी मानसिक वृत्ति सर्व जगभर होत जाणार आहे. हिंदुस्थान, चीन, अरबस्तान आणि ज्युडिया या सर्व ठिकाणच्या तत्त्ववेत्त्यांच्या वचनास सर्व लोकांनीं मान द्यावा, पण लग्न कोणाशीं करावयाचें इत्यादि प्रश्नांचा निकाल आपला बाप कोणत्या साधूला मान देणाऱ्यांच्या टोळींत होता याविषयींच्या अभिमानाने ठरविलें जाऊं नये ही वृत्ति प्रथम हिंदुस्थानांत तयार होईल आणि नंतरच तिचा जगभर प्रसार होईल."

"मला एका गोष्टीचे आश्चर्य वाटतें की तुम्ही जगाच्या व्यवहाराचे इतके जाणते असून गंगाधर परभणीकराला गदर चळवळीमध्यें पडण्यास उत्तेजन कसें दिलें."

" मी उत्तेजन मुळींच दिलें नाहीं."

" पण तुमची त्यास नेहमी मदत असे असे मी ऐकले होते."

"तेहि खोटें आहे."

"तुमच्याकडून त्याला कांहीच मदत झाली नाहीं?"

"पैशाची मदत करण्यास मी अनेकदा तयार होतों, पण तो छट ती स्वीकारावयास कोठें तयार होता! त्यांत त्याला हिंदुस्थानचा अपमान झालासे वाटे. एकदां त्याच्या सहामाही फीसाठीं मी पैसे दिले त्याची पाउणशे डालरची प्रामिसरी नोट त्याने करून दिली होती, ती त्यानें एका वर्षापूर्वी सोडविली. मी त्यास एवढीच मदत केली कीं माझे जे कांहीं ओळखीचे कामगार शिकागोला होते, त्यांनां गंगाधर हा "गुडफेलो" आहे म्हणून पत्रे दिलीं होतीं आणि त्यांपैकीच एकानें त्याचा स्फोटक द्रव्याच्या कारखान्यांत प्रवेश करून दिला."

"त्या कारखान्यांत त्याला पगार चांगला होता आणि तो आपली रहाणी काटकसरीची ठेवी. मला त्यानें असें लिहिले कीं, त्याची बायको येणार आहे आणि तो घर करण्याच्या अपेक्षेनें पैसा वांचवीत आहे."

"झालें तर मग, गंगाधर सरळ मार्गावर आलाच असे मी समजतो. मला जें करण्यासाठीं कष्ट पडणार होते ते काम त्याच्या बायकोनेच केलें आहे. त्याला आयुष्यांत कांहीं आशा उत्पन्न व्हावी, जगाकडे त्यानें केवळ विषण्णवृत्तीने पाहूं नये, यासाठींच मला खटपट करावयाची होती. आणि तुम्हांस त्यासंबंधानेच खटपट करा म्हणून म्हणणार होतों. पण ते कार्य आपोआपच होत आहे असें दिसते!"

---

## प्रकरण ११ वें.

## गदर चळवळीचें गंगाधरी स्पष्टीकरण.

डॉ. सरंजामे यांच्यापुढे मुख्य प्रश्न हा होता कीं, हिंदुस्थानांतील जे लोक अमेरिकेंत कायमची वस्ती करून राहिले आहेत किंवा ज्यांनां अमेरिकेंत रहाणें भाग आहे त्यांचें भवितव्य कसें सुधारेल. त्यांनां विशेषेंकरून तेथील सुशिक्षित हिंदी लोकांबद्दल काळजी विशेष वाटे. कां कीं, जे लोक मजूरी करीत ते क्रमाने शेतकरी बनत किंवा मजूरीचे पैसे ब्यांकेंत टाकून रहात. अमेरिकेंत राहिलेल्या हिंदी लोकांच्या नागरिकत्वांत येण्याची परवानगी मिळविणें व त्यासाठीं चळवळ करणें, तेथें हिंदी लोकांनां जमीन विकत घेण्यासाठीं जेथें प्रतिबंध असतील तेथें ते प्रतिबंध काढून टाकणे इत्यादि गोष्टी करण्यासाठीं खटपट त्यांस पाहिजे होती व त्या गोष्टीकडे त्यांचें लक्ष होतें. ते जुन्या इंडोअमेरिकन असोसिएशनचे एकदां सेक्रेटरी असतां त्यांनीं त्या कामास सुरवात केली होती, पण त्यावेळीं गदर चळवळ सुरू झालीच होती आणि ज्यांच्यासाठीं ही सर्व खटपट करावयाची त्या बऱ्याच हिंदी वसाहत करणाऱ्यांचें लक्ष त्या

प्रश्नावरून उडालें. त्यांनां हिंदुस्थानांत बंड उभारण्याचेच कार्य दिसत होतें. हें बंड यशस्वी होणार नाहीं म्हणून सरंजाम्यांनीं हिंदुस्थानी मंडळींनां समजावून देण्याचा प्रयत्न केला पण त्यांच्या म्हणण्याकडे कोणीच लक्ष दिले नाहीं. डॉ. सरंजामे यांची हा इंग्रजसरकारचा एजंट म्हणून कांही मंडळीकडून निंदा सुरू झाली होती. आणि त्यामुळें डॉ. सरंजामे यांच्या मनांतल्या बऱ्याचशा योजना कागदावरच राहिल्या. त्यांच्या मनांत ज्या योजना होत्या त्यांपैकी मुख्य योजना अशी होती कीं न्यूयॉर्क येथे हिंदी मंडळीच्या संस्थांचे मुख्य केंद्र असावे. कां कीं हिंदी मंडळी अमेरिकेत आणि कानडात मिळून पांच सात हजार, ब्रिटिश हांडयूरासमध्ये सुमारें पांचशे, जमेकांत सुमारे वीस हजार आणि ब्रिटिश गियाना आणि त्रिनिदाद मिळून प्रत्येकीं सुमारे दीड लाख याप्रमाणे तीनलाखांवर हिंदी मंडळी पश्चिम गोलार्धांत आहेत आणि त्या सर्वांची केंद्रवर्ती संस्था नाहीं. तशी संस्था असावी आणि त्या संस्थेचे मुख्य ऑफिस न्यूयॉर्कमध्ये असावें. या नवीन जगांत हिंदी मंडळीच्या ध्येयाची आणि नवीन प्रकारच्या आयुष्यक्रमाची नवीन जोपासना व्हावी.

त्यांची व लीलेची अनेक गोष्टींविषयीं चर्चा होई. ते आपल्या या प्रकारच्या योजना लीलेपाशीं बोललेहि होते पण या प्रकारच्या कार्यक्रमापेक्षां गदरपार्टीच्या कार्यक्रमाकडे लीलेचें लक्ष ओढलें जाई. लीलेला गदरपार्टी म्हणजे हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी म्हणजे पराभूत झालेल्या योजनेला देखील टेकू देणाऱ्या मंडळीची पार्टी वाटे आणि तिला ज्याविषयीं करुणायुक्त प्रेम वाटे, ती ज्याला मोठा वीर समजे तो गंगाधरपंत त्या कार्यांतच पडला नव्हता काय? विष्णु सरंजामे गदरपार्टीची निंदा करी, आणि ती निंदा तिला आपल्या गंगाधरपंतांचीच वाटे. विष्णु सरंजामे आणि गंगाधरपंत यांची चांगली ओळख नव्हती. साक्रामेंतोच्या परिषदेच्या वेळीं त्यानें गंगाधरपंतांस पाहिलें होतें एवढेच. त्यानें गंगाधरपंतांच्या अंगीं बरेच दुर्गुण कल्पिले असते, पण त्यास ज्या गृहस्थाविषयीं अत्यंत आदरबुद्धि वाटे असे प्रो. गोगटे हे गंगाधराविषयीं अत्यंत चांगले शब्द बोलत. आणि त्यामुळे त्यास गंगाधराविषयीं वाईट मत बनविण्यास जड जाई. विष्णूनें एकदां गोगटयांस म्हटलें कीं, "हा तुमचा विद्यार्थी होता, तर यास तुम्हीं आपल्या प्रयत्नानें गदरपार्टीच्या तडाक्यांतून सोडवीत कां नाहीं?" प्रोफेसर गोगटे म्हणाले "हा माझा विद्यार्थी पण मी दोन वर्षांनी नंतर अमेरिकेला आलो, त्याला तू असल्या पार्टीला मिळू नको म्हणून पत्रहि लिहिले होते, पण तो उलट लिहितो कीं ज्याप्रमाणे तुम्ही अमेरिकेला माझ्या मागे आला त्याचप्रमाणें तुम्ही गदरपार्टीला येऊन मिळाल अशी माझी खात्री आहे. गदरपार्टीच्या शिकागोच्या "चापटर" (शाखे)चा तो आतां अध्यक्ष आहे. त्यानेंच आतां गदरपार्टीला सोडली आहे व पुढे त्या पार्टीसच धोका येईल असें त्यास वाटत असेल.

गंगाधरपंताची व विष्णु सरंजाम्याची साक्रामेंतोच्या परिषदेच्या वेळेस गांठ पडली. पण त्या वेळेस विशेष परिचय झाला नाहीं. पुढें एकदां कांही कारणाने शिकागोला जाण्याची संधि विष्णुपंतास मिळाली तेव्हां तो गंगाधरपंताच्या बिऱ्हाडी गेला. व त्याने गदर चळवळीपासून कायमचे मोकळें होऊन आपल्या आयुष्यास नवे वळण द्यावें अशी इच्छा सरंजाम्यांनी व्यक्त केली. तथापि त्या प्रयत्नास यश आले नाहीं. "नेट" हा मुख्य सद्गुण होय असें गंगाधरपंताचें मत झालें होतें. आपल्या आयुष्याच्या अवधींत जरी एखादें कार्य झालें नाहीं, तरी आपण आपले कर्तव्य म्हणून सोडावयाचें नाही इत्यादि गोष्टी तो बोलत असे. लष्करी शिक्षण अमेरिकेला गेलेल्या पुष्कळच विद्यार्थ्यांनी घेतले होते, आणि पुष्कळांस नाखूष

असतांहि ध्यावें लागलें होते. गंगाधरानें आपलें लक्ष स्फोटक द्रव्यांच्या बनावटीकडेसच विशेष दिलें. गंगाधरपंताविषयीं डॉ. सरंजाम्यांस वाटे कीं हा अशक्य कामाकडे लागलेला आहे. तथापि त्यास आपले जाडे विचार सांगून गगाधरपंतांस आपल्या कार्यापासून परावृत्त करतां आलें नाहीं. गंगाधर म्हणे कीं, कार्य अशक्य असलें तरी तें करीत राहिल्यानें शक्य होते, निदान त्यापासून ते फल जरी प्राप्त झालें नाहीं तरी तितकेंच महत्त्वाचे दुसरे फल प्राप्त होते. आपल्या उन्नतीचे कार्य आपल्या हातून होण्यासाठीं आपणांस महत्त्वाकांक्षा असावी आणि सर्व राष्ट्र स्वतंत्र करणें हे ध्येय पुढे ठेवून आयुष्य क्रमण्याइतकें ते मोठें आहे व यासाठीं मी या पक्षास चिकटून आहें, व याचे प्रवर्तन मी करीत आहे. मी स्फोटक द्रव्यांच्या कारखान्यांत गेल्यामुळे मला प्राप्ति तर झालीच पण या धंद्यांत एक हिंदु शिरला तर कॉलेजमधल्या लहानशा नोकरीसाठीं धडपड करण्यापेक्षा कार्यास नवीन क्षेत्र शोधून काढणें हे चांगले नाही काय? अनेक लोकांनीं लष्करांत शिरण्याचा प्रयत्न करणे, किंवा गलबते व विमाने बांधणाऱ्या कारखान्यांत नोकरी मिळविण्याचा प्रयत्न करणे या गोष्टी देशास किंवा निदान येथील हिंदी समाजास हितावह नाहीत काय? महाराष्ट्रीय समाजाचा आज श्रमविभाग शेतकरी आणि कारकून असा बनला आहे तर यापेक्षां व्यापक श्रमविभाग आपल्या समाजास नको काय ? गदर पक्षाची चळवळ जरी सुरू झाली तरी बंद करण्याचे कार्य होतां होईतों दूर टाकावे असेच माझे मत होते हें साक्रामेंतोच्या परिषदेच्या वेळेसच तुला दिसून आलें नाहीं काय ? ज्यावेळेस गदर चळवळ सुरू झाली त्यावेळेस जर्मनीशी इंग्लंडची लढाई कोठें सुरू झाली होती. त्यावेळीं आम्ही दारूगोळा जमा करावयास थोडेच लागलों होतो. लढाईचें ध्येय ठेवणें म्हणजे समाजाची, सर्व प्रकारे व्यापक श्रमविभाग समाजांत आणण्याची तयारी करणें होय. आजचा प्रयत्न श्रमविभाग अधिक व्यापक करण्यापलीकडे जाणारच नाहीं."

गंगाधरपंताचें हे बोलणे सरंजाम्यास जरी सयुक्तिक वाटलें तरी त्याच्या मनांतील संशय दूर झाला नाहीं, कां कीं मत्तमयूरीपाशीं गंगाधर जे बोलला होता त्याची बातमी सरजाम्यास लागली होती. तेव्हां सरंजामे यानें त्याविषयी गगाधरपंतास सरळ प्रश्न केला. तेव्हां गगाधर म्हणाला कीं, माझ्या आयुष्यास कोणत्या वेळेस माझ्याच विचारामुळें काय गति मिळेल याची मला कल्पनाच नसल्यामुळे माझ्या आयुष्याशीं कोणत्याच स्त्रीचे भवितव्य गुरफटले जाऊं नये असे मला वारवार वाटे. मला असे वाटे की, गृहसौख्याच्या कल्पनांपेक्षां मी राजकारणाच्या कल्पनांनी आपल्या आयुष्यास वळण देत आहे. गृहिणीस ज्या गृहनिष्ठ नवऱ्याची आवश्यकता असते तसा मी नाही. शिवाय स्फोटक द्रव्याच्या कारखान्यांत मी काम करीत आहे तर माझा शेवट केव्हां होईल हें सांगतां येत नाहीं. जर कदाचित माझी बायको येथे येऊ शकली आणि दुसऱ्याच दिवशीं जर अपघात होऊन माझा अंत झाला तर तूं एक गोष्ट करण्याचे अभिवचन दे. आणि ती गोष्ट म्हणजे माझ्या बायकोला जी मदत करतां येईल ती कर. तुला वाटल्यास तूंच तिच्याशी लग्न लाव. ती फार चांगली मुलगी आहे.

सरजाम्यास हे वाक्य ऐकताच असे वाटले की, "हा लेकाचा आतां आपली चेष्टा करायला लागला!" पण क्षणार्धांत त्याचे मत बदलले. कां कीं वरील शब्द बोलतांना गंगाधर ते शब्द सद्गदित आवाजानें बोलत आहे असा त्यास भास झाला, आणि त्याच्या डोळ्यांत आर्द्रतेनें उत्पन्न झालेली चकाकी विष्णु सरंजाम्यास दिसूं लागली.

सरंजामे पुन्हां म्हणाला कीं, "तुमचे असें म्हणणें आहे काय की गदर चळवळ म्हणजे केवळ युद्धाच्या निमित्तानें आयुष्यक्रम व्यापक करण्याची चळवळ आहे दुसरे कांही नाहीं!"

"अर्थात माझें तेच मत आहे, राज्य चालविणाऱ्या इंग्रज लोकांस हिंदुस्थान दुर्बल ठेवणे हे योग्य वाटतें, पण त्यांनां खरोखर युद्धविशारद हिंदुस्थान हितावह आहे. युद्ध करणें किंवा न करणें ही गोष्ट नेहमीं विशेष प्रसंगीं युद्धापासून काय फायदा होईल याविषयींच्या कल्पनांवर ठरत असते. हिंदुस्थानांतल्या लोकांचा आयुष्यक्रम जास्त व्यापक झाला तर तो ब्रिटिश सरकारालाहि उपयोगी पडणार नाही काय? शिवाय ब्रिटिशसाम्राज्यांत रहाणे हेच जर हिंदुस्थानास फायदेशीर होऊं लागले तर बंड करण्याचे कारणच नाहीं. हिंदुस्थानांतले राजकरणी पुरुष अजाण आहेत, त्यांनां स्वराज्य इंग्रजांनी कयदा करून हातीं द्यावयास पाहिजे आहे. अनेक वर्षांनी इंग्रज हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याचें अभिवचन देत आहे, तर इंग्रजांनां असा सरळ सवाल करतां येण्याजोगा आहे की, जर तुम्ही स्वराज्य आम्हास देणार तर स्वराज्य चालविण्यासाठी आम्हांस ताकद उत्पन्न होण्यास तुम्ही सवड ठेवावयास नको काय? मला युद्धविषयक कौशल्य वाढविण्याच्याविरुद्ध उपदेश करण्यापेक्षां तूं हिंदुस्थानांतल्या कॉंग्रेसवाल्या लोकांसच सांग की देशांतील हजारो तरुणांनां लष्करी शिक्षण व युद्धविषयक सर्व व्यवहारांचें शिक्षण घेण्यास व शिक्षणानंतर त्या प्रकारच्या व्यवसायांत पडण्यासहि उत्तेजन द्या.

"लोकांस आपला आयुष्यक्रम व्यापक करण्यासाठीं कांही तरी प्रेरणा पाहिजे आहे, मग ती प्रेरणा ब्रिटनला साहाय्य करण्याच्या निमित्तानें होवो की बंडाच्या हेतूने होवो. कोणत्याहि दृष्टीनें झाली तरी परिणाम एकच होणार. एखाद्या कंपनीनें "गदर" ही पाटी लावून धंदा करावयाचा तो "इंग्रजांस सहाय" ही पाटी लावून हे करावयास हरकत नाहीं. पाहिजे तर आपण इतःपर त्या आडनांवानें समाजास व्यापक स्वरूप देण्याचा धंदा करूं. धंदा जोराने करण्याची जरूर आहे. हजारो तरुण आज तयार झाले तरी लष्करी किंवा आरमारी जागांस ते पुरावयाचे नाहींत. तुझ्या मनांत अजून राजकारणाच्या हिंदी कल्पनाच आहेत. खरे राजकारण तुला समजतच नाहीं."

विष्णु सरजामे यास गदर तत्त्वांच्या या गंगाधरी मांडणीस उत्तर काय द्यावे याविषयीं गूढ पडलें. गंगाधर आपल्यापेक्षां विचारानें खरोखरच कमी नाही. त्यानें विचार केला असेल तर तो निराळ्या प्रकारचा आहे हें त्यास भासून आले.

सरजामे परत आल्यानंतर त्याचे आणि प्रो. गोगट्यांचे भाषण झाले त्या वेळेस प्रो. गोगटे यांनां ती विचारपद्धति पूर्णपणे मान्य झाली. तेव्हा ते म्हणाले कीं, "गदर" चळवळ अजून जोराने चालविली पाहिजे. वाटेल तर वेडगळ इंग्रज मुत्सद्दयांच्या आणि न्यायाधिशांच्या समजुतीसाठीं आडनाव बदलावे. अत्यत राजनिष्ठ मनुष्याने लष्करी सामर्थ्य वाढविण्याच्या चळवळीला मिळण्यास मुळींच हरकत नाहीं. पण खरोखर पहातां बंडाची कल्पना डोळ्यासमोर ठेवणे यांत गैर काय आहे? जिवंत राष्ट्र ज्याप्रमाणें दुसऱ्या राष्ट्राशीं युद्धप्रसंग पडला तर काय करावे म्हणून योजना करतें व त्याचा अर्थ त्या राष्ट्राशीं वैर करावे असा होत नाही, त्याप्रमाणेच बंडाची कल्पना आपला आयुष्यक्रम अधिक व्यापक आणि विविध होण्यासाठीं स्फूर्तिकारक म्हणून पुढे ठेवण्यास काय हरकत आहे? ती केवळ एक समाजोन्नतीची अवश्य क्रिया आहे. या दृष्टीने जर आपण विचार करूं लागलो तर राजद्रोहाच्या कायद्यांतहि फरक करावा लागेल.

———

## प्रकरण १२ वें.

## इंग्लंडांतील दिवस.

रुक्मिणीचे इग्लंडमधील दिवस थोडे होते, पण ते नवीन देखाव्यांच्यामुळे मोठया आनदांत गेले. तो मे महिना होता मे महिन्यांतील इग्लंड-मधील वनश्रीची शोभा ती पाहिलेल्यांस परिचित आहेच, त्या वनश्रीकडे पाहून तिला आपला प्रियपति येथेच असता तर किती तरी बरे झाले असते असें वाटल्याशिवाय राहिले नसेल. हे सुदर देखावे, तसेच हिदुस्थानांतील सर्व प्रकारच्या प्रदेशांतून आलेल्या लोकांच्या ओळखी यामुळें तिला असे वाटे कीं, हे सर्व देखावे पहाण्यास आपण एकत्र असतों तर किती बरें झाले असते. रुक्मिणी मूळची देखणी व त्यांतल्या त्यांत नवऱ्याच्या पत्रावरून नवऱ्याची सात आठ दिवसांपूर्वीचीच बातमी समजल्यामुळे अत्यंत आशायुक्त अंतःकरणाची झालेली, त्यामुळे तिच्या तोडावर तजेला दिसत होता, गंगाधरपताने केवळ पत्रच पाठविले होतें असे नाही तर त्यानें ४० पौंड आणखी पाठविले होते. याशिवाय तिला कांही चांगल्या साडया मत्तमयूरीने घेऊन दिल्या होत्या यामुळे रुक्मिणीस आपण गरिबीत आहो असे वाटत नव्हते आणि जो भेटेल त्याच्याशी बरोबरीच्या नात्याने ती वागत होती. मत्तमयूरी आणि रुक्मिणी जरी बरोबर आल्या तरी रघू लंडनमध्ये अगोदरच येऊन बसला असल्यामुळे रुक्मिणीस कोणाच्या तरी स्वाधीन करून आपण निसटावें असे वाटून मयूरीने आपली यजमानीण आणि तेथील एक महाराष्ट्रीय व्यापाऱ्याची पत्नी नर्मदाबाई गोळवलकर हिच्या तावडींत तिला देऊन आपण निसटली व रघूबरोबरच वागडूं लागली. नर्मदाबाईस एक सोबतीण मिळाल्यामुळे फारच आनंद झाला. तिला तेथल्या बऱ्याच हिंदु स्त्रियांचा फार राग येत असे. त्या बायकांपैकीं कांही बंगालमधल्या होत्या. त्यांच्यापाशीं पैसे जरा जास्त होते, आणि त्यामुळें त्या फार डौल करतात असे नर्मदाबाईस वाटे. नर्मदाबाई जर त्यांच्या कोणाच्या घरीं गेल्या तर निघण्याच्या वेळेस त्या "तुमची मोटार कोठे आहे", "तुमच्या शोफरला बोलवा" इत्यादि गोष्टी बोलत. त्या बंगाली बायकांनां देखील या महाराष्ट्रीय बाईला हिणाविण्यास कारणें झालीं होती. नर्मदाबाई, मुद्दाम आम्ही बंगाली स्त्रिया हलक्या कुळांतील किंवा जातींतील आहोंत असे भासविण्याचा प्रयत्न करतात असे त्यांस वाटे. नर्मदाबाई त्या बगाली बायकांच्यापेक्षां जास्त गोरी होती, आणि तिला एकदां कांही इंग्रज मंडळीनी विचारले कीं, तुम्हीं आपल्या देशांत उच्च जात किंवा हलकी जात हे कसे ओळखतां! तेव्हां नर्मदाबाई सहज म्हणाल्या की उच्च जातीची माणसे—विशेषेंकरून बायका—गोऱ्या असतात, खालच्या जातीच्या काळ्या असतात. हे जे ती म्हणाली तें त्या बंगाली बायकास फार लागले. त्याचप्रमाणे एकदां बरीच मंडळी जमली असतां एका इंग्रजाने म्हटले, तुमच्या देशांत बायकांनी "स्मोक" करण्याची रीति अजून शिरली नाहीं काय? तेव्हां नर्मदाबाईने सहज म्हटले की खालच्या जातीत विशेषेकरून घाणेरडे काम ज्यांनां करावे लागतें अशा बायकांत विडया ओढण्याची पद्धत आहे. आमच्याकडे येणारी भगीण विडया ओढीत असे; हे देखील बंगाली स्त्रियांनां लागले; कां कीं त्या स्त्रिया सिगारेट ओढणाऱ्या होत्या, आणि त्यांतल्या तरुण मुली तर शेजारच्या तरुणाच्या खिशांतून सिगारेटची डबी हिसकावून घेऊन ओढणाऱ्या होत्या. नर्मदाबाईचें हे सहज बोलणें त्या स्त्रियांनां लागले. पुढे एकदां [illegible] चर्चा सुरू झाली. तेव्हा नर्मदाबाई म्हणाली कीं, ज्या लोकांनां आपली जात निश्चितपणें सांगतां येत नाहीं, किंवा बाप-आजा सांगतां येत नाहीत, आई

किंवा आजी सांगतां येते तीच मंडळी आपणांस ब्राह्मो म्हणवितात, बाकीची मंडळी जरी नांवा-करतां ब्राह्मो म्हणविणारी असली तरी तुम्ही कोण विचारलें म्हणजे ते आपली जातच सांगतात. हे देखील तेथील बंगाली स्त्रियास झोंबले. कां कीं त्यांपैकी बहुतेक स्त्रिया ब्राह्मण, कायस्थ, वैद्य इत्यादि उच्च जातींच्याच म्हणजे " भद्रलोकां "मध्ये मोडणाऱ्या होत्या. तरी त्या आपणांस ब्राह्मो म्हणून घेणाऱ्या होत्या त्यांनां आपणांस वेश्यावंशज बनविलेलें कसें आवडेल? नर्मदाबाई हें जें बोलली तें बंगाली मंडळींनां उद्देशून बोलली नव्हती. तर तिला महाराष्ट्र म्हणजेच हिंदुस्थान वाटे, आणि महाराष्ट्राविषयीं जे विधान करावयाचें तें सर्व हिंदुस्थानाला लागू पडणार नाहीं ही भावनाच तिला नव्हती. तिची कल्पना इतकी महाराष्ट्रीय होती कीं एकदां सीतेचे मारवाडणीच्या पोशाखांत चित्र पाहून ती बिच-कली, आणि हें सीतेचें चित्र नसून मारवाडणीचे आहे असें म्हणावयास लागली.

नर्मदाबाईस देखील रुक्मिणीस घेऊन पुष्कळ ठिकाणीं जावेसें वाटे. नर्मदाबाईचा नवरा सकाळी आपल्या आफिसांत जाई तो संध्याकाळीं साताला घरीं येई. त्यामुळें तिला दिवस जात नसे आणि तिला कोठे तरी हिंडावयास जायला पाहिजे असे-आणि त्यामुळें हिंदी विद्यार्थ्यांच्या किंवा इतर हिंदु-स्थानसंबद्ध लोकांच्या अनेक चळवळी होत्या तेथे ती जात असे. कोणत्याहि हिंदी स्त्रीच्या घरीं जाणें हिनें सोडूनच दिलें होते, पण नार्थब्रूक सोसायटी, न्याशनल इंडियन असोसिएशन, ईस्ट इंडिया असोसिएशन, इंडियन मेजलिस, ऑल इंडिया डिनर्स, इत्यादि संस्थांमुळे जे एकत्र जमण्याचे प्रसंग येत त्या प्रसंगांस ती हजर असे, शिवाय रॉयल एशियाटिक सोसायटीसारख्या संस्थेच्या सभांनां देखील ती जाई. रुक्मिणीला, नर्मदाबाई घेऊन या प्रकारच्या पुष्कळ ठिकाणी गेली, आणि गदरचळवळींत पडलेल्या तरुणाची बायको या नात्यानें तिची लोकांशीं ओळख झाल्या-मुळे सर्व लोकांस तिच्याविषयीं कौतुक वाटलें. ती देखणी, ब्रिटिशसाम्राज्याविरुद्ध बंडांत सामील झालेल्याची बायको, या दोन गोष्टींमुळे तिच्याकडे सगळ्यांचें इतके लक्ष गेले कीं त्यावेळेस लंडन-मध्ये असलेल्या राण्या महाराण्या यांनाहि तिचा हेवा वाटूं लागला असला पाहिजे. तिने जाऊन आपल्या नवऱ्याला मिळावे याविषयीं तिच्याविषयी शुभेच्छा सर्वांनीं व्यक्त केली एवढेंच नाहीं तर तिच्या जाण्याच्या वेळेस तिला देण्यासाठीं १०० पौंडांची थैली तेथील मंडळींनीं तयार केली. आणि त्यावेळेस अत्यंत राजनिष्ठ मंडळीकडूनहि पर्स चळ-वळीच्या उत्साही मंडळींनीं वर्गणी काढलीच. तिच्यावर दोन चार मंडळींनीं कविताहि लिहिली आणि ती तिला समर्पण केली. तिच्या स्तावकां-मध्ये हिंदु, मुसुलमान आणि इंग्रज यांपैकीं सर्व प्रकारची मंडळी होती. गदर चळवळीविषयीं हिंदुस्थानी मंडळीमध्ये जें चोरून प्रेम होतें तें तिच्या सत्कारांत व्यक्त झालें.

मत्तमयूरी आणि रघु हीं बरोबर फिरावयास जात असत, मयूरी कांहीं दिवस गोळवलकरां-च्याकडेसच होती, पण ती केवळ निजण्यासाठीं आणि सकाळचा ब्रेकफास्ट घेण्यापुरती. नऊ वाजतां तिला बाहेर घेऊन जाण्यासाठीं रघु येई तो रात्रीं बारा वाजतां पोंचवी. व इतका वेळ जरी तीं एकत्र असत तरी परत आल्यावर तासच्या तास पायरीवरच बोलत दोघेजण उभी रहात. या दोघांनां इतकें बोलायला तरी काय आहे असा नर्मदाबाई प्रश्न करीत. तेव्हां तिचा नवरा तिला म्हणे कीं, आपल्याला या गोष्टीचा अनुभव नाहीं, आणि पुढे कधीं यावयाचाहि नाहीं. पुढें कांहीं दिव-सांनीं मयूरीनें आपला लग्न करण्याचा बेत रुक्मि-णीस कळविला आणि तुझ्या गंगाधरपंतांला तुझ्या-पासून मी ओढून नेईन अशी भीति तूं मनांत

आतां बिलकुल बाळगूं नको असें मयूरी रुक्मिणीस म्हणाली. रघु त्यावेळेस मयूरीसच म्हणाला कीं जर कां तूं तसा प्रयत्न केलास तर थप्पड बसेल बरें! कां कीं मी मोठा मत्सरी मनुष्य आहे. त्यांचे जरी लग्नाचे ठरले तरी त्यांनां एकाएकीं गोविंदरावांस कळवावयाचें नव्हतें. त्यांच्या मनांत लग्न झाल्यावरच त्यांनां कळवावयाचे होते. रघु म्हणाला कांहीं झाले तरी माझा बाप जन्माने व शिक्षणानें हिंदुस्थानी आहे. माझ्याप्रमाणें अमेरिकन नाही तर त्याच्या मनांत उच्चनीचतेच्या भावना असणारच. अहो, सारस्वत ही उच्च ब्राह्मण जात आहे कीं नाहीं याबद्दल त्यांनां मी वादविवाद करतांनां पाहिले आहे. मी जर त्यांस सल्ला विचारायला गेलो तर हे लग्न करूं नको म्हणून ते म्हणतील. परंतु मी लग्न केलेंच म्हणजे अशाच गोष्टी व्हायलाच पाहिजेत म्हणून म्हणतील. तर तुम्हीं चूप बसा झालें! मात्र माझें अभिनंदन करण्यासाठीं एखादे जेवण आम्हांस देणार असाल तर ते जेवण स्वीकारण्यास आमची मुळीच हरकत नाही!

---

## प्रकरण १३ वें.

## मिश्रकुटुंबाची मनोवृत्ति.

गंगाधरपंत शिकागोहून निघून आपल्या बायकोला न्यूयॉर्क येथे उतरवून घेण्यासाठी न्यूयार्ककडे जात असतां नायगारा फाल्स् येथें दोन दिवस राहिला होता. तेथे गदरपार्टीचा एक प्रमुख हिंदी गृहस्थ शिवराजसिंग म्हणून एंजिनिअर होता त्याच्याकडे तो पाहुणा होता. शिवराजसिंग आणि मिसेस् शिवराजसिंग या दोघांस गंगाधराची बायको येणार आहे म्हणून आनंद झाला. मिसेस् शिवराजसिंग ही एका आयरिश गृहस्थाची मुलगी होती, आणि ती त्यावेळेस इग्लंडचा तीव्र द्वेष करणारी म्हणून तेथील हिंदुस्थानी मंडळींत प्रसिद्ध होती. तिला जेव्हां सेन्ससच्या कारकुनानें तुझी भाषा कोणती म्हणून विचारलें तेव्हां तिनें गॅलिक म्हणून उत्तर दिलें होतें. तिला गॅलिक कितपत येत होतें कोण जाणें! पण आपली भाषा इंग्रजी नाहीं गॅलिक आहे हे ती मोठ्या अभिमानानें सांगत असे. इंग्लडचा जो मनापासून द्वेष करतो तो माझा मित्र होय असे ती उघडपणें बोलत असे. तिचा धर्म कोणता होता हे सांगणे कठिण होतें, ती क्याथलिक चर्चमध्यें कधींच जात नसे, पण प्रॉटेस्टंट ख्रिश्चन म्हणविण्यास ती कधीं तयार नव्हती, ती कधीं कधीं "ख्रिश्चन सायन्स" च्या चर्चमध्ये जाई. कधी वेदांतावर पुस्तके वाची पण क्याथलिक ख्रिश्चॅनिटींबद्दल तिला अभिमान असे, आणि त्याचे कारण प्रॉटेस्टंट मंडळी क्याथलिक चर्चची निंदा करतात हे होय, असे कित्येकांस वाटे. पण तें सर्वांशी खरे नव्हते. क्याथलिक संप्रदायामध्यें जे भिक्षुकी अवडंबर वाढलेले आहे त्या अवडबराचीच तिला अभिरुचि होती. विचारशक्तीकडे पाहिले तर तिचें ईश्वराच्या अस्तित्वाविषयींहि शंका घेणारें मन होतें पण येशू विषयीं भक्तीचीं गीतें गाणारी मंडळी भेटली म्हणजे आपल्याठायीं ईश्वरभक्ति असणे शक्य नाही याबद्दल तिला दुःख होई. ती बोलतां बोलतां असें म्हणे कीं सर्वच "रिलिजन्स" मूर्खपणाचीं कोडबोळी आहेत. ज्याप्रमाणे एक मनुष्य दुसऱ्याला आपली कांहीं गोष्ट सांगतो, दुसरा ती गोष्ट जास्त मनोरंजन करण्यासाठीं तींत कांहीं पदरचे घालतो, व शेवटी अगदीं बनावट कल्पित कादंबरी तयार होते त्याप्रमाणेच धर्मग्रंथांचे आहे. सर्व धर्मग्रंथ कल्पित कादंबऱ्या आहेत असे ती म्हणे. मि. शिवराजसिंग हा वेदांचा बराच अभिमानी होता, पण तो देखील वेदग्रंथ न वाचतां तसा बनला होता. त्याचा वैदिक धर्म खुळचट असला पाहिजे म्हणून बायको बोलतच असे, पण त्या खुळचट धर्माच्या अनुयायित्वामुळें नवरा फारसा खुळचट बनला नाहीं असेंहि ती नवऱ्यास सर्टिफिकीट देई. पण

तूं जर खुळचट असतास तर मला कदाचित जास्त आवडला असतास, आणि तुझ्याबरोबर मीहि आनंदानें खुळचट बनलें असतें असेंहि ती नवऱ्यास म्हणे पण कधीं कधीं नवराबायकोचीं धार्मिक विषयांवर गंभीरपणानें बोलणींहि होत. बायको नवऱ्याला म्हणे, की "काय असेल ते असो मी जरी बुद्धीनें ख्रिस्ती नाहीं तरी माझें अंतःकरण ख्रिस्ती संप्रदायाकडे धांवतें, ख्रिस्ताच्या आस्तित्वाबद्दल पुरावा पूर्णपणे समाधानकारक मला वाटत नाहीं, आणि ख्रिस्ताचा उपदेश काय असावा याविषयीं देखील माझी खात्री नाहीं. पण ख्रिस्ती संप्रदायावर जर माझा विश्वास असता तर बरें झाले असते असे मला वाटते. एका दृष्टीने अत्यंत अर्वाचीन वृत्तीच्या ख्रिस्ती मंडळीपेक्षां माझी वृत्ति अर्वाचीन बनली आहे, तर दुसऱ्या बाजूनें अत्यंत जुन्या प्रकारच्या ख्रिस्तीपणाची मला आवड आहे. ही अर्वाचीन मताची ख्रिस्ती मंडळी म्हणतात कीं ख्रिस्ती ग्रंथांतल्या ईश्वरविषयक कल्पना सुसंगत किंवा बरोबर नसतील, पण ख्रिस्ताचा नैतिक उपदेश ग्राह्य नाहीं काय? ख्रिस्ती संप्रदायांतील सण, उपास, मिरवणुकी, बाप्तिस्मा, ख्रिस्ती पाद्र्यामार्फत लग्नें हा कांहीं धर्माचा खरा भाग नव्हे, तर ख्रिस्ताचा नैतिक उपदेश हाच खरा भाग आहे, पण माझ्या मनाला कांहीं निराळेंच वाटते, पश्चात्तापाची आवश्यकता, विश्वासाची आवश्यकता, स्वर्गविषयक आशेची आवश्यकता, यांविषयींच्या ख्रिस्ताच्या समजल्या जाणाऱ्या मतांकडे माझें लक्ष ओढले जात नाहीं, तर ख्रिस्ताच्या शवाच्या मागून त्याची आई विलाप करीत जात आहे अशा मूर्ती तयार करून जी मिरवणूक निघते ती मला अधिक हृदयस्पर्शी वाटते. म्याजिस्ट्रेटपुढें जाऊन आपण लग्न लावलें त्याऐवजीं देवळांत जाऊन आपण लग्न लावलें असतें तर तें माझ्या भावनेस अधिक सुखकर झालें असतें. धर्माचें शुद्ध स्वरूप सांप्रदायिक अवडंबराने बिघडतें असें लोक म्हणतात पण मला त्या सांप्रदायिक अवडंबराचीच अभिरुचि जास्त आहे. तुमच्या देशांत बायका वटसावित्रीची पूजा करतात त्या पूजेचीं चित्रे मी पाहिलीं आहेत तींच मला तुमच्या तत्त्वज्ञानापेक्षां अधिक मनोवेधक वाटतात. ग्रहणाच्या दिवशीं सूर्य किंवा चंद्र यांचे जे सुतक तुमचे लोक पाळतात ती ईश्वरसेवा नसून वस्तुपूजा असेल पण त्याचेंच चित्र मला अधिक मनोवेधक होतें."

मि. व मिसेस शिवराजासिंग यांस मुलें झालीं होतीं आणि आपल्या मुलांस धार्मिक शिक्षण काय द्यावयाचें याविषयीं दोघांचा वादविवाद चाले. जेव्हां गंगाधरपंत त्यांच्याकडे आले तेव्हां त्या दोघांनीं त्यांस सामाजिक व धार्मिक वादविवादांत घेतलें.

"गंगाधरपंत, मला वारंवार विचार पडतो कीं आम्हां मिश्र कुटुंबांचें भवितव्य काय?"

"या प्रश्नावर मी फारसा विचार केला नाहीं; पण मला असें वाटतें कीं, तुमचे भवितव्य फारसें वाईट नाहीं, तुम्हीं एकमेकांविषयीं असंतुष्ट आहां काय? हें लग्न केलें ती चूक झाली अशी तुमची कल्पना आहे काय?"

"जर आमच्या एकमेकांच्या एकमेकांविषयीं वृत्तीकडे पाहिलें तर आमचा प्रेमभाव कांही कमी झाला नाहीं, अनुनयाच्या दिवसापासून आम्हीं एकमेकांनां अधिकाधिक प्रिय होत चाललो आहोत असेंच दिसेल."

"तर मग तुमचें दुःखस्थान तरी काय आहे?"

"आमचे दुःखस्थान कोठें आहे याविषयीं म्हणाल तर आम्हांस असें वाटतें कीं आमच्या मुलांचें कसें होईल! हिंदुस्थानांत मी वाढलों, आणि रामकथा, कृष्णकथा यांशीं माझा परिचय होता, माझे वडील एकादशीचा उपास करीत, मलाहि तो उपास घालीत असत, मला धार्मिक

भावना कांहीं तरी होती. रामकृष्ण हे देव आहेत अशी माझी भावना होती आणि त्यांच्या कथा मी मोठया आनंदानें ऐकत असें. परंतु आज मी रामकृष्ण यांस देव समजत नाहीं. माझ्या बायकोचें देखील असेंच झालें आहे. माझी बायको यहूदी इतिहासांतील कथा मोठया प्रेमानें वाचीत असे, अब्राहाम ईश्वरास संतुष्ट करण्यासाठीं आपल्या मुलाचा बळी द्यावयास तयार झाला ही गोष्ट देखील भक्तीनें वाचीत असे आणि अब्राहाम यास मोठा ईश्वरभक्त मानी. पण आतां तिला असें वाटतें कीं अर्ध्यामुर्ध्या पशुत्वांत मनुष्य असतां ही कथा मनुष्याच्या डोक्यांतून निघाली आहे. ईश्वराला संतुष्ट कां करावयाचे तर स्वतःचे कल्याण व्हावें म्हणून, व त्या कल्याणासाठीं मुलगा मारायचा! काय हा धर्म! असें ती म्हणते; व ईश्वरकल्पना तरी काय, तर तो नरमांसभक्षक होता अशी. अशा प्रकारच्या कालांत धर्मकथा झाल्या आणि त्या धर्म म्हणून समाजाच्या बोंकाडीं बसल्या असे माझ्या बायकोचें मत झालें आहे!"

"तर मग दुःखाचें कारण काय? तुम्हीं दोघेंहि समसमान आहांत ईश्वरविषयक किंवा परमेश्वर साधनविषयक वेडया कल्पनांतून तुम्हीं दोघेंहि मुक्त झालां आहांत!"

"पण आमचे दुःखाचे मुख्य कारण वेड्या कल्पनांतून मुक्त झालों हेंच आहे."

"मला तुमचें म्हणणें समजत नाहीं."

"कां बरें, त्यांत काय गूढ आहे?"

"आपल्या मनांत ज्या खुळ्या कल्पना असतात त्यांचा आपण अभिमान धरतों आणि त्याच्यामुळें विनाकारण द्वैतास सुरवात होते. मूर्तिपूजा ईश्वराला आवडत नाहीं, त्याच्या योगानें ईश्वराचा अपमान होतो असें धर्मसुधारक म्हणतात, जणूं काय ईश्वरेच्छा त्यांसच समजली आहे, आणि सगुणभक्तीच्या योगानें आपल्या चित्तास स्थैर्य येतें असें जुन लोक म्हणतात, दोघांतहि सत्य आहे आणि जेव्हां दोघे एकमेकांच्या मार्गाला नांवें ठेवतात तेव्हां दोघेंहि खुळे आहेत असें वाटतें. तुम्हांला धर्माच्या स्वरूपाची ऐतिहासिक कल्पना आली आहे. प्रत्येकास दुसऱ्याच्या धर्मकल्पना कशा उत्पन्न झाल्या हे सांगतां येतें; त्यामुळें दोघांसहि एकमेकांच्या विचारांकडे स्नेहबुद्धीने किंवा औदार्यानें बघतां येईल."

"वेडे हो वेडे तुम्ही गंगाधरपंत! व त्याचे कारण तुम्ही बाप नाहीं हें आहे. आतां मिसेस गंगाधर लवकरच येतील व तुम्हाला मुलें होतील तेव्हां तुम्ही आमच्या बरोबरीचे व्हाल. आज तुम्ही हलक्या कोटीतले आहांत. अविवाहित पुरुष किंवा स्त्री बोलायला लागलीं म्हणजे जीं तत्त्वें सांगतात तीं चुकीचीं आहेत असें त्यांस लग्न लावल्यानंतर समजतें. तसेंच मुले नसतांनां त्यांचीं जीं मते असतात तीं मुले झाल्यावर बदलतात. लग्न लावण्यापूर्वी मुलगी आपल्या स्वातंत्र्याच्या गोष्टी करते, आणि आपण नवऱ्याचा हुकुम पाळूं असें कबूल करण्याचे तिच्या जिवावर येतें, पण लग्न लागल्यानंतर ती नवऱ्यासाठी सर्व कांहीं सोडायला तयार होते" मि. शिवराजसिंग म्हणाले.

"पण मुलें झाल्यानें कोणतें शहाणपण येणार?" गंगाधरपंतांनीं विचारलें.

"मनुष्य जगाकडे निराळयाच दृष्टीनें पाहूं लागतो. उदारमतांची त्यास किंमत कमी कमी वाटायला लागते."

"ती कां?"

"उदारमतें विधायक नाहींत, तीं केवळ विध्वंसक आहेत."

"राजकीय विधायक कार्यक्रमाबद्दल जी गर्व बाळगणारी मंडळी पुण्यांत आहेत ती उदारमतवादाची अभिमानी आहेत. तुम्ही जर "मी उदारमतवादविध्वंसक आहें" असें पुण्यास बोलूं लागला, तर तुम्ही अमेरिकन बायको केली आहे

तरी अर्थाडाक्स आहां म्हणून तेथले सुधारक तुमच्यावर तुटून पडतील."

"पडेनात का! त्यांस धर्मविषयक भावी कार्यक्रमाची काय कल्पना आहे? धर्मविषयक उदार मतें असून त्यांचा उपयोग काय; तर एकमेकांनीं एकमेकांच्या धार्मिक विचारांनां किंवा आचारांनां नांवें ठेवूं नयेत म्हणून; दुरून नमस्काराला हा उदारमतवाद पुरेसा आहे, पण एकत्र आयुष्य कंठून मिश्रकुटुंबाचें किंवा सर्व देशांतील भावी समाजाचें स्वरूप ठरवायला पुरेसा नाहीं; लोकांनां निश्चित धार्मिक कार्यक्रम पाहिजे. या धार्मिक औदार्यानें आपल्या मिश्र समाजाची गरज कधींच भागणार नाहीं. दोन धर्मांची मंडळी कांहीं काळपर्यंत एका ड्राईंगरूममध्ये बसली म्हणजे त्यांनीं एकमेकांचीं डोकीं फोडूं नयेत एवढयासाठी काय तो उदार विचाराचा उपयोग. पण लग्न करून कुटुंब वाढवायचें म्हटलें म्हणजे निराळीच आवश्यकता उत्पन्न होते."

" ती कोणती? "

" मुलांस कांहीं विशिष्ट नीतिकल्पना उत्पन्न व्हाव्यात, नीतिकल्पनांचे सामाजिक महत्त्व त्यांस समण्यापूर्वी त्यांचा कांहीं तरी ग्रंथांशीं संबंध असावा, जगाचें कारण त्यांस शास्त्रीय रीतीनें समजण्याचा काल येण्यापूर्वी जग ईश्वरानें निर्माण केलें अशी कल्पना त्यांस सांगतां यावी, आणि ईश्वर कसा काय आहे म्हणून विचारले तर कांहीं तरी ठराविक थापा देतां याव्यात. शिवाय घरीं गोड करून खाण्यास निमित्त किंवा उत्सव करण्यास निमित्त म्हणून ईश्वराचा उपयोग करतां यावा, आणि या सर्व गोष्टी करतांनां आपण लबाडी करीत आहों अशी मनाला टोंचणी नसावी म्हणून ईश्वरावर, त्याच्या चमत्कारावर आणि त्यामुळें उत्पन्न झालेल्या सणांवर विश्वास असावा."

"तर मग तुम्हाला आज धर्मविषयक अडचणी काय वाटतात?"

" मला असें वाटतें कीं या नवीन होणाऱ्या मिश्रविवाही समाजास निराळ्या तऱ्हेच्या धर्मरचनेची आवश्यकता आहे. अस्तित्वांत असलेल्या सर्व संप्रदायांशीं ज्या प्रकारच्या आयुष्यक्रमानें सहकारिता उत्पन्न होईल आणि ज्या आयुष्यक्रमांत वाढलेली मंडळी जगांतील सर्व धर्मांच्या लोकांवर प्रेम करूं शकतील असा धर्म आम्हांस पाहिजे. तो निर्माण कसा करावयाचा हाच प्रश्न आहे. शिवाय हिंदुत्व घालवूं नये, ख्रिस्ती समाजांत विलीन होऊं नये हा हेतु साध्य करण्यासाठीं कांहीं तरी केलें पाहिजे. "

" तें काय करावयाचे ?"

"तें मी सांगूं शकत नाहीं. समाजाचें धार्मिक रूपांतर कसें करीत न्यावे, जगांतील सर्व जातींच्या लोकांचा आणि सर्व धर्मांच्या लोकांचा ज्या समाजांत अंतर्भाव होईल अशा समाजाचे स्वरूप कसे निर्माण करावे हें मला समजत नाहीं—हें एंजिनिअरिंग जरा निराळें आहे."

"तुम्हाला मिश्र लग्नाबद्दल कधीं पश्चात्ताप होतो काय?"

"नाहीं, आमचें आयुष्य सुखानें जात आहे. मुलांनी अमेरिकन समाजांत प्रवेश करावा असें म्हटलें तरी तें त्यांस शक्य आहे व त्यांचे आयुष्य सुखाने जाईल. आमची विवंचना हिंदुसमाजाचा एक प्रश्न या दृष्टीनेंच आहे, मिश्रलग्न मी जरी केले नाहीं तरी दुसरे लोक करतील, मिश्रलग्नें जगांत होणार नाहींत असें थोडेंच आहे? मिश्रलग्नें होणार, तर जगांत मिश्रसमाजाचें भवितव्य कसे असावे हा प्रश्न उपस्थित होणार, आणि तो सोडवावाहि लागणार. भावी जगद्विकासाची ही तर अवश्य क्रिया आहे, आणि आमच्यासारखी जी मिश्रलग्नें केलेली मंडळी आहेत त्यांच्यावरच या प्रश्नाला प्राथमिक स्वरूप द्यावयाची जाबाबदारी पडणार आहे एवढेंच. ती जबाबदारी पत्करलीच पाहिजे व उपाय शोधलाच पाहिजे !"

"मग तुम्ही काय विचार केला आहे?"

"राजचें काम करतांना दिवस जातात आणि याविषयीं निश्चित प्रयत्न करण्यास वेळ मिळत नाहीं. जर कोणी हिंदुस्थानी विचाराचा या देशांत प्रसार केला तर तें आम्हांस फायदेशीरच होईल. पण येथे जे वेदांती संन्यासी उपदेश करायला येतात ते विवाहासारख्या ऐहिक गोष्टींवर बोलतच नाहींत. वेदांत हें तत्त्वज्ञान आहे आणि त्याचे वक्ते धर्मशास्त्रज्ञ उर्फ समाजशास्त्रज्ञ नाहींत. पण आपल्याकडच्या विवाहित विचारी मंडळीकडून या प्रश्नाचा खल झाला पाहिजे."

"तुम्ही या संबंधानें कोणाशीं चर्चा केली होती काय?"

"चर्चा कोणाशीं करणार? प्रो. गोगटे यांच्यापाशीं केली होती तशीच डॉ. सरंजामे यांच्याशीहि चर्चा केली होती."

"प्रो. गोगटे काय म्हणाले?"

प्रो. गोगटे काय सरळ उत्तर देणार आहेत! त्यांनी आमच्या लग्नासारखीं लग्नें अभिनंदनीय आहेत किंवा नाहींत यावर देखील सरळ उत्तर दिले नाहीं. ते म्हणाले कीं "हे सर्व आमच्या वागण्यावर अवलंबून आहे. आम्ही अमेरिकन लोकांत विलीन होणार असलों तर आमचे लग्न अभिनंदनीय नाहीं. आणि जर विलीन होणार नसलों तर अभिनंदनीय आहे. विलीन होणार किंवा नाहीं हें काळच ठरवील. तेव्हां तुमच्या या कृत्यावर सुमारें५०वर्षांनंतर मला मत देतां येईल."

"मग तुम्हीं त्यांनां काय म्हटलें?"

"पन्नास वर्षांनंतर तुम्हीं आमचे अभिनंदन करण्यास जिवंत असणार आणि तें ऐकण्यास आम्ही जिवंत असणार, आणि त्यावेळच्या आपल्या अभिनंदनाने आम्हांस मोठा आनंद होणार! आपल्या या दीर्घ आशावादित्वाबद्दल फार आनंद होतो असें मी म्हणालों."

"मग ते काय म्हणाले?"

"ते म्हणाले कीं, या उत्तराशिवाय दुसरें उत्तर मी देऊं शकतच नाहीं त्याला मी काय करूं."

"अमेरिकन लोकांत विलीन होऊं नये यासाठीं काय करावे म्हणून तुम्हीं नाही कां त्यांनां विचारिलें?"

"तें विचारलेंच, पण त्याचेहि उत्तर त्यांनीं चमत्कारिकच दिलें."

"ते कोणते?"

"ते म्हणाले कीं या विषयावर मला एकट्याला मत देतां येणार नाहीं, ते मला माझ्या बायकोला विचारून दिले पाहिजे, पण बायको कांहीं येथें नाहीं. शिवाय बायको तरी काय सांगणार! आम्ही दोघें खरोखर काय करूं—आपण या अमेरिकन समाजांत विलीन होऊं नये म्हणून जे प्रयत्न अंतःस्फूर्तीनें कराल ते पाहूं. आणि नंतर त्या प्रयत्नांच्या फलासंबंधानें आलेल्या अनुभवाने पुढच्या पिढीस सल्ला देऊं."

"प्रो. गोगट्यांची बायको तर अमेरिकेत आली आहे, मी तिला ओळखतों, तिचा बाप ब्रह्मचर्यावर व्याख्यानें देत असे. तो डॉक्टर होता, त्यानें दाढी वाढविली होती, व त्यामुळें त्यास लोक ऋषिवर्य म्हणत होते. आणि त्यानें कुस्तीत होणाऱ्या दुखापतींवर कसलासा 'बाम' काढला होता. मला वाटते कीं मिसेस गोगटे येथें आल्याला जवळजवळ वर्ष झालें."

"गोगट्यांचे आणि माझें बोलणे चार वर्षांपूर्वी झाले होतें."

"तर मग तुम्हीं स्वतः आपला हिंदीपणा कायम राखण्यासाठीं खटपट काय करता? त्याप्रमाणेंच जगाला अनुरूप असा आचार निर्माण करण्यासाठीं काय करता?"

"कांही विशेष करीत नाहीं. हिंदुस्थानी मंडळींत वारंवार जातों, बायकोला व मुलांनां बरोबर नेतों. कधीं कधीं कामतांच्याकडे गणपतीच्या

उत्सवासाठी जात असे. त्यामुळे मुलांनां आपण व कामत यांच्यामध्ये कांहीं तरी आपलेपणाचा संबंध आहे अशी भावना झाली असावी. जी हिंदुस्थानी मंडळी भेटतात त्यांस माझा मुलगा काका म्हणतो व हिंदुस्थानी स्त्रियांस किंवा हिंदुस्थानी पुरुषांच्या अमेरिकन बायकांस तो मावशी म्हणतो आणि हीच परंपरा आमच्या घरांत चालेल असें दिसते."

"झाले तर मग, प्रो. गोगटे यांनीं जें सांगितलें तेंच बरोबर आहे! अंतःस्फूर्तीनें हा सर्व प्रयत्न तुम्हीं केला आहे तर हिंदुस्थानाविषयी तुमच्या मुलांच्या मनांत आपलेपणाची भावना राहीलच!"

"पण धर्माचा आणि धार्मिक आचाराचा प्रश्न कसा सोडवावयाचा?"

"हिंदुस्थानी आचाराचा तुमच्या घरीं प्रसार तुम्हीच कां करीत नाही?"

"मला हिंदु आचारांची तरी कुठे पुरी माहिती आहे. मी हायस्कुलांतून कॉलेजांत गेलो व कॉलेजांत असतांना एकदम उडी मारून येथे आलो. येथें लग्न केले, लग्नाच्या वेळेस बायकोला साडी नेसायची इच्छा होती तर साडी कशी पेहेरतात हे देखील मला दाखवितां आले नाही. त्यावेळेस सुदैवाने ती सिनेमानटी रीटा रिचर्डस येथें आली होती तिने माझ्या बायकोला साडी नेसविली. लग्न झाल्यानंतर मला एका वर्षाच्या आंतच हा बालादित्य झाला! तेव्हां बायको विचारते कीं नांव ठेवण्याची तुमची हिंदु पद्धति काय आहे, त्या वेळेस विधि काय करतात, तर त्याची कोणा लेकाला माहिती होती! "ख्रिसनिंग" करण्यासाठीं चर्चमध्यें घेऊन जाऊन पाद्रयाच्या हातून हा विधि करावा हें तर गोड वाटेना. छे! छे! आपल्या देशांत हिंदु बायका आल्या पाहिजे, म्हणज हिंदु घरचा रिवाज कळेल आणि भिक्षुकहि इकडे आले पाहिजेत."

"अहो, तुम्ही भिक्षुकांच्या विरुद्ध होता ना!"

"अहो, तें लग्नापूर्वीचें व मुलें होण्यापूर्वीचें मत. त्याचे काय आज!"

"मग इकडे भिक्षुक आलेच तर त्यांच्या नांवाने तुम्ही ओरडणार नाहीं?"

"असें कांहीं नाहीं, त्यांच्या नांवाने ओरडूंच पण ते हवेत हें खरे–अहो आपण बायकांच्या नांवानें ओरडत नाहीं, कां; तशाच बायकाहि पुरुषांच्या नांवाने नाहीं कां ओरडत! पण एकमेकांची एकमेकांस जरूर आहेना? तसाच भिक्षुक आणि गृहस्थ यांतील संबंध होय! ते आपणांला हवे तर असतातच पण त्यांच्या नांवाने ओरडलेहि पाहिजेच."

"भिक्षुक हवेत पण त्यांच्या नांवानें खडे फोडायलाहि तुम्हांला हवें, तर मग भिक्षुकांची इतकी जरूर तरी काय?"

"जरूर मुख्यतः अशासाठीं कीं त्यांच्यामध्यें हिंदीपणा रहावा, माझे जे हिंदुस्थानचे भाईबंद त्यांच्याशी यांचे स्नेहसंबंध रहावेत, हिंदुस्थानच्या लोकास यांच्याविषयीं आपलेपणा वाटावा एवढ्यासाठींच मला धार्मिक अवडंबराची गरज वाटते."

"धर्मातील मूलतत्त्वांकडे लक्ष द्यावें, धर्मातील जो सदाचारविषयक भाग असेल तिकडेच लक्ष द्यावें या दिशेनें धर्मसुधारणा व्हावी असें मत हिंदुस्थानांत आतां प्रवृत्त होत आहे आणि तुम्हाला धर्माच्या नांवानें चाललेलें अवडंबरच पाहिजे आहे काय?"

"हिंदुस्थानांतील मंडळींच्या गरजा आणि आमच्या गरजा भिन्न आहेत. हिंदुस्थानांत विधींचें अवडंबर फार म्हणून तें कमी करण्याकडे तेथील सुशिक्षितांची प्रवृत्ति व्हावयाची, पण आमच्यासारख्या मिश्रविवाही मंडळींनां आपलें राष्ट्रीयत्वच पुसटून जाऊं नये म्हणून धर्माचें जें अगदीं बाह्यस्वरूप त्या बाह्यस्वरूपाकडे म्हणजे

सण, उत्सव, व्रते, संस्कार यांच्याकडे लक्ष देणें प्राप्त आहे."

"तर मग तुम्हांला काय पाहिजे?"

"येथे भिक्षुक आणले पाहिजेत, ते येथे आले म्हणजे हळू हळू उदार बनतीलच. आणि आमचे अमेरिकन स्त्रियांशीं होणारे विवाह चालवायला त्यांनांच आणावें, प्रथम ते ती गोष्ट नाकबूल करतील पण मागाहून कबूल करतील. शिवाय त्यांच्या येण्याचा राष्ट्रीकरणासहि उपयोग होईल!"

"तो कसा?"

"सर्व मंडळींनां एकत्र धार्मिक उत्सवाच्या निमित्ताने जमविणें, स्त्रियांनां आवडतील असे धार्मिक विधी जुन्या पुस्तकांतून काढून त्यांचा प्रचार करणें या क्रिया आमच्यासारख्या अनेक कुटुंबांकडे जाऊन करविण्यास आणि प्रत्येक मिश्र कुटुंब पैतृक धर्म, आचार किंवा भावना यांचे रक्षण करण्यासाठीं प्रयत्न काय करते ते एकमेकांस कळविण्यास त्या धंद्यांनलाच मनुष्य पाहिजे. तो आला म्हणजे आमच्या "इंडो-ऑक्सिडेंटल" समाजास कांहीं नियमबद्धता उत्पन्न होईल."

"इतका सर्व खटाटोप तुम्ही अवश्य कां समजतां? आपला हिंदीपणा रहावा म्हणून तुमच्यासारखी मंडळी जेव्हां येथें कायमची वस्ती करून रहातील, जेव्हा त्यांनां अमेरिकेंत मुले होतील आणि त्यांच्या अंगीं हिंदुस्थानीपणा कांहीं तरी उत्पन्न व्हावा अशी इच्छा त्यांनां होईल तेव्हां तुमच्यासारखी मंडळीं आमच्याबरोबर सभाषण करण्यास योग्य होईल. आज अजून तुम्ही अशिक्षित आहां. तुम्हाला पुढे असे दिसून येईल कीं तुमचे लग्न पाश्चात्त्य मुलीशीं झालेलें असो अगर नसो, तुम्ही आणि मी विदेशी आयुष्याच्या महासागरांत असून एकाच होडींत आहोंत."

"मला तुमचे म्हणणें पटतें. मि. कामत यांनां आपल्या मुलांनां भारतीय संस्कार व्हावा म्हणून काय खटाटोप पडला!"

---

## प्रकरण १४ वें.

# भेट.

न्यूयॉर्कच्या बंदरांतील एका धक्क्यावर बरीच हिंदु मंडळी जमली होती. त्यांपैकी कांहीं नवीन येणाऱ्या हिंदूच्या स्वागतार्थ जमली होती. त्या गर्दीमध्ये [illegible] होता, पण तो तेथें आपल्या बायकोच्या स्वागतार्थ आला होता. बऱ्याच मंडळींनां त्याची बायको येणार हें ठाऊक नव्हतें. बोट ज्यावेळी धक्क्याच्या जवळ येऊं लागली तेव्हां धक्क्यावरूनच, बोटीच्या कठड्याशीं उभ्या असलेल्या एका स्त्रीचे गंगाधरपंतानें रुमाल उडवून स्वागत केले आणि त्या स्त्रीनेंहि आपल्या रुमालाने त्यास प्रत्युत्तर दिलें. एक सुंदर पोषाख केलेली हिंदु स्त्री गंगाधरपंताकडे पाहून रुमाल उडवीत आहे याबद्दल पुष्कळ हिंदुस्थानी मंडळीस अचंबा वाटला असेल. कां कीं हिंदुस्थानी स्त्रिया अगोदर अमेरिकेंत दुर्मिळ, त्या आल्या म्हणजे त्यांच्या स्मितचंद्रिकेंत आपण असावें म्हणून पुष्कळांची धडपड. अशी गोष्ट असतां जी एक नवीन तरुणी येत आहे तिच्याशीं गंगाधरपंताची ओळख अगोदरचीच आहे, तर गंगाधरपंत तिच्या ओळखीचा मक्ता आपल्याकडेसच ठेवतो कीं तिची दुसऱ्या कोणाशीं ओळख होऊं देतो असे लोक आपसांत म्हणू लागले. गंगाधरपंतानें त्याविषयीं सत्य एकदम सांगितलें नाहीं. बोट जेव्हां धक्क्याला लागली तेव्हां ती तरुणी खाली उतरली आणि गंगाधरपंताने तिचें चुंबन धक्क्यावरच घेतलें आणि या तऱ्हेने प्रेमाचे दर्शन सार्वजनिकपणे होण्यास जरी रुक्मिणीची तयारी नव्हती तरी पाश्चात्त्य रिवाज तिला आतां ठाऊक झाल्यामुळे ती नवऱ्याच्या चुंबनाने फारशी बावरली नाहीं. नवऱ्यानें चटकन मोटार बोलविली आणि तीं दोघेंजण एकदम निघून गेलीं.

गंगाधरपंत अमेरिकेच्या भूमीवर १९११ सालीं आला. तेव्हांपासूनचें त्याचें चरित्र म्हणजे कांहीं

अंशीं प्रत्येक अमेरिकेस गेलेल्या हिंदूच्या चरित्राची पुनरावृत्ति होतें तर कांही बाबतीत त्यांच्या चरित्रांत वैशिष्टय होते. ते अमेरिकेस उतरले तेव्हां त्याच्यापाशीं सुमारे १५० रुपये (५० डॉलर) होते. ते रुपये देखील दोन तीन आठवड्यांत खर्च होऊन गेले. तेव्हां आतां पुढे काय करावे अशी त्यांस भ्रांत पडली. त्यांच्या घरवालीनें त्यास सांगितले की तुम्ही आतां घर सोडावें. दुसरे कोणीकडे जावें तर भाडयाला देखील पैसे नाहींत! पण पोट भरण्यासाठीं कांहीं तरी केलेच पाहिजे. याच अडचणीच्या वेळेस न्यूयॉर्क शहरांत त्यांची कोलंबिया युनिव्हर्सिटींतल्या एका विद्यार्थ्याशी गांठ पडली. तेव्हां त्या-विद्यार्थ्याने खटपट करून युनिव्हर्सिटीतल्या डाइनिंग हॉलमध्यें त्यास जेवणापुरतें वेटरचें काम मिळवून देऊन जेवणापुरती सोय करून दिली. पण दुसरा खर्च कसा निभावयाचा! अमेरिकेमध्ये येणारे हजारों परकीय लोक न्यूयॉर्क शहरांतच राहतात आणि कसे बसे तरी पोट भरतात. पुष्कळांनां अमेरिका म्हणजे न्यूयॉर्कच्या पलीकडे कांहीं तरी असेल हे ठाऊकच नसते. तेथें येणारें नवीन लोक आपल्याच जातींच्या (किंवा राष्ट्राच्या) लोकांकडे नाकरीस राहातात, कां कीं पुष्कळांस इंग्रजी भाषाच येत नसते आणि त्यामुळें नोकरी पहावयाची म्हणजे आपल्याच जातीच्या म्हणजे आपली भाषा समजणाराकडे पहावयाची असा प्रकार होतो. त्याप्रमाणेंच नवीन येणारे हिंदी विद्यार्थी जुन्या हिंदी रहिवाशांकडे जात, पण त्यांनां हेहि ठाऊक होते कीं जुन्यांची मदत करण्याची शक्ति बेताचीच आहे. गंगाधरपंत गोविंदराव कामत यांच्याकडे गेला तरी त्यांच्याकडे काम मागण्यासाठीं किंवा मदत मिळविण्यासाठीं गेला नसून केवळ ओळख करून घेण्यासाठीं गेला होता. तेव्हां त्यास ओळखीबरोबर मुलांस शिकविण्याचे काम मिळालें म्हणून आनंद झाला. गंगाधरपंत कांहीं वर्षें न्यूयॉर्कला शिकत होता, आणि पुढें केमिकल एंजिनिअर झाल्यानंतर कांहीं दिवस पश्चिमेकडे कांहीं केमिकल कारखान्यांत नोकरीस राहिला. लढाई सुरू झाली तेव्हां तो कारखान्यांत काम करीत नव्हता पण लष्करी शिक्षणाचा प्रसार हिंदी लोकांत झाला पाहिजे, ब्रिटिश सरकार जर हिंदूंचा या शाखेत शिरकाव होऊ देत नसेल तर मंडळींनीं अमेरिकेंत येऊन शिरकाव करून घेतला पाहिजे इत्यादि अर्थाचीं जीं अमेरिकेंत हस्तपत्रकें छापून हिंदुस्थानांत पाठविलीं गेलीं त्यांवर गंगाधरपताची सही होती; व पुढे त्याच्याबरोबर सह्या करणारी मंडळी पुढे गदर चळवळींत मिळालीं आणि त्यांपैकीं कांहीं फांशीं गेलीं किंवा काळ्या पाण्याची सजा पावली. गंगाधरपंतांविषयीं देखील संशय होता पण गंगाधरपंत अमेरिकेंत असल्यामुळें इंग्रज सरकारला त्याचें कांहीं एक करतां आलें नाहीं. गंगाधरपंत गदर चळवळींत प्रथमतः मिळालाच नव्हता, आणि साक्रामेंतोच्या परिषदेंत तो सरंजाम्यांप्रमाणेंच हिंदुस्थानांत आतां बंड करावें या कल्पनेच्या तो विरुद्ध होता, हिंदुस्थानांतील अमेरिकेला आलेला व राजकीय जागृति झालेला हा लहानसा वर्ग जर्मनीच्या हातचें उपकरण बनावे या गोष्टीच्या विरुद्ध तो होता. जर्मनीला काय, ही हिंदुस्थानी मंडळी म्हणजे केवळ वीरेंत काढावयाचीं भाडोत्री मोहोरीं होतीं. हिंदुस्थानी मंडळीच्या किंवा देशाच्या भवितव्याविषयीं खरोखर कळकळ जर्मनांनां कोठून असणार. रणयज्ञांत द्यावयाचे बळी या दृष्टीनेंच जर्मनी अमेरिकेंतील हिंदुस्थानी मंडळींकडे पहात होता पण या वर्गावर तर भावी हिंदुस्थानच्या आशा; तर या वर्गाच्या आयुष्याचा खेळखंडोबा करावयाची जर्मनीनें मसलत करूं नये किंवा मसलत केलीच तर त्या प्रयत्नास भारतीय मंडळींच्या पुढाऱ्यांनीं मदत करूं नये असें गंगाधरपंताचें मत

होतें. आणि यामुळें जर्मनीच्या प्रयत्नास जेव्हां गंगाधराने विरोध केला तेव्हां तो बराच अप्रिय झाला. जेव्हां अमेरिका इंग्लंडच्या बाजूने युद्धांत शिरली तेव्हां मात्र ताबडतोब गंगाधरानें मेक्सिकोला पलायन केलें. त्याला ठाऊक होतें कीं त्या वेळेस ब्रिटन प्रत्येक हिंदूविषयीं साशंक होतें व सुशिक्षित हिंदूविषयीं तर विशेषच साशंक होतें. त्यास आपला मित्र कोण आहे व शत्रु कोण आहे याची खरी जाणींवच नाही, जो देशाभिमानी हिंदु तो इग्लंडचा शत्रु असें मूढ मत इंग्रजांत पसरलें होतें. यामुळें जेव्हां लढाईत अमेरिका पडली तेव्हां दीड तासांच्या आंत आपलें चंबूगवाळें उचलून अमेरिका सोडून गंगाधर मेक्सिकोस गेला. त्यावेळेस हेहि त्याला ठाऊक झालें होतें की जर्मनीच्या प्रयत्नास आपण विरोध केल्यामुळे ज्या हिंदी मंडळीस दु:ख झाले आहे, ज्या हिंदु मंडळींचें रिक्रुटिंगचें कमिशन बुडालें ती मंडळी आपल्यावर कांहीं तरी कडयाळ आणल्याशिवाय रहाणार नाहींत. आणि आपण आपलें निरपराधित्व किती जरी सिद्ध करण्याचा प्रयत्न केला तरी वातावरण क्षुब्ध असतां तें सिद्ध होणार नाहीं. एवंच त्यानें मेक्सिकोंत वर्ष सहा महिने काढले, आणि त्या कालांत वाशिंग्टनच्या ब्रिटिश वकिलाशीं पत्रव्यवहार ठेवला, आणि आपणांविषयीं गैरसमज कसा न्याय झाला आहे, आणि आज ज्यूरी आपल्याविषयीं नाकारण मन कलुषित करून घेईल व त्यामुळें पणांस न्याय मिळणार नाहीं एवढयाचकरितां पण वातावरण शांत होईपर्यंत मेक्सिकोंत रहात आहों इत्यादि गोष्टी त्यांत त्यानें कळविल्या होत्या. व पुढें थोडक्याच दिवसांनीं अमेरिकन सरकारची परवानगी मिळवून परत आला आणि शिकागोच्या स्फोटक द्रव्यांच्या कारखान्यांत त्यानें नोकरी धरली. येथेंच त्याची आणि मयूरीची गांठ पडली होती. आणि त्यानें आपल्या मनाची खरी ओळख सरंजामे यांस करून दिली होती, आणि जेव्हां रुक्मिणी अमेरिकेला येणार म्हणून तिचें पत्र आलें तेव्हां मात्र त्यास या स्फोटक द्रव्यांच्या नोकरीचा कंटाळा आला आणि आतां अधिक सुरक्षित धंद्यांत आपण जावें असें त्यास वाटूं लागलें, आणि रुक्मिणीचें स्वागत करण्यासाठीं न्यूयॉर्कच्या एका हॉटेलांत तो उतरला तेव्हां रुक्मिणी येण्याच्या अगोदरच आपण आजपर्यंत स्फोटक लढाऊ जिनसा मोठया प्रमाणावर तयार करण्याचे काम शिकलो पण आतां कमी धोक्याच्या धंद्यांत जावें असा त्याचा निश्चय झाला.

विरहीजनाचा विहरकाल संपून पुनर्मीलनाचा प्रसंग आला म्हणजे तो वर्णन करण्याचा पुष्कळ कवी होतां होईतों टाळतात. मीलनाची अपेक्षा जेव्हां असेल तेव्हांच्या कालाविषयीं "तत्तेन तत्समयसा घटनाय योग्यम्" म्हणून कालिदासाच्या तोंडून अलंकार निघतात, पण मेघदूताचा शेवट गोड करून पुनर्मीलन वर्णन त्यानें केले नाहीं. व याचे कारण तें वर्णन करणें पुष्कळदां कठिणच असतें. भेटीच्या वेळेस आपण काय बोलावें याविषयीं दोन्ही व्यक्ती कांहीं विचार करून ठेवतात; व त्या विचारांप्रमाणेंच, म्हणजे मनांत रचलेल्या संभाषणानुरूप नाटक वठतें असें मुळींच नाहीं. प्रत्यक्ष भेटीच्यामुळें जो मनाला संभ्रम उत्पन्न होत असतो, त्यामुळें योजिलेला संभाषणक्रम जसाच्या तसाच पार कसा पडणार! रुक्मिणी व गंगाधर या दोघांनां एकमेकांसंबंधींची सर्व प्रकारची माहिती विचारून घ्यावयाची होती, रुक्मिणीच्या मनांत आपण नवऱ्यावर पुष्कळ रुसावें आणि त्यानें आपली समजूत करावी असें होतें. तिला विरहाच्या कालांत जर कांहीं उणींव भासत असली तर ती रुसण्याची संधि नसणें ही होय; रुसावेंसें तर वाटे व रुसून तर फायदा नाहीं. आपण रागावलें असतां आपली समजूत करण्यास कोण आहे, आणि जर समजूत करण्यास कोणी नसलें तर रागावण्याचा तरी काय उपयोग. प्रेमाच्या

खात्रीमुळें ज्याच्यावर रुसतां येईल असें माणूस तिच्याजवळ नसल्यानें त्या बाबतींत ती भुकेली होती आणि तीच भूक आतां शांत करून घ्यावी असे विचार तिच्या मनांत येत होते. रुक्मिणीनें लंडनमध्यें असतां व न्यूयॉर्कला जाण्याच्या बोटीवर असतां जर कोणत्या एखाद्या गोष्टीचा पुष्कळ विचार केला असेल तर तो आपण रागावावें कशाबद्दल यासंबंधाचा होता. आपणांस पैसे पाठविले ते फक्त भाडयाचे पाठविले. दरमहा कशी अडचण पडत असे याची आपणांस कल्पना होती काय? या प्रकारचा प्रश्न करणे आणि तो नवऱ्याचा अपराध समजून रागावणें योग्य होईल किंवा नाहीं यासंबंधानें तिला विचार पडे. कां कीं पैसे एकसारखे जमवीत असल्याशिवाय भाडयासाठी पैसे पाठवितां आले नसते. जर नवऱ्याला जास्त पैसे पाठवितांच आले नाहींत तर त्यास विनाकारण दोष देण्यांत काय फायदा आहे. हजार रुपये जे पाठविले ते पाठविण्यासच काय सायास पडले असतील, त्याने आपल्या पोटाला कसा चिमटा घेतला असेल याची कल्पना जेव्हां तिला येई तेव्हां तिच्या डोळ्यांतून अश्रू आल्याखेरिज रहात नसत. तरी देखील तिने असें ठरविलें की दरमहा कांहीं तरी पाठविण्याचे नवऱ्यानें केलें नाहीं याबद्दल त्याला दोष द्यावाच. त्याच्या मनाला दुःख झाले तर आपण उलट समजूत करूं. आपणांस आपल्या गरीब नवऱ्यास दुःख दिलें म्हणून त्याची उलट समजूत करावयास आणि माफी मागावयास त्यामुळे एक निमित्तच होईल.

अमेरिकेच्या बोटीवर असतां रुक्मिणीच्या डोक्यांत याप्रमाणें अनेक विचार येत होते, आणि बोट जशी न्यूयॉर्कच्या जवळजवळ येऊं लागली तसतशी तिची उत्कंठा वाढूं लागली. आणि त्या बरोबर आपणांस आपला नवरा कसा दिसेल याची ती कल्पना करूं लागली. नवऱ्याचा एक अगदीं अलीकडचा फोटो तिला लंडनमध्यें पोंचला होता. तरी त्याच्यायोगानें तिला चांगली कल्पना येईना. तिला आपण सुमारें सव्वीस वर्षांच्या झालों. नवराहि आतां तीस वर्षांचा असेल असे जरी हिशेब करून काढतां येई. तरी प्रौढ नवऱ्याची तिला कांहींच कल्पना करतां येईना. फोटोवरूनहि ती पुरीशी होईना. कां कीं फोटोमध्यें मिशा नव्हत्या व नवरा ज्यावेळेस अमेरिकेस गेला त्यावेळींहि मिशा नव्हत्या त्यामुळें नवऱ्यांत फारसा फरक झाला नाहीं असें तिला वाटे. हिंदु पोषाखाच्या ऐवजीं अमेरिकन पोषाख आला असें दिसे. इंग्लंडमध्यें ती आल्यानंतर तिला नवऱ्याची जी पत्रे आली तीं अत्यंत भावनापूर्ण होतीं त्यांपैकीं एकदोन पत्रे बरींच लांबट होतीं आणि बोटीवर असतां तीं पत्रें वाचणे हा एक तिचा मोठा व्यवसायच झाला होता. ती पुष्कळदां लोकांनां तीं पत्रेंच वाचतांनां दृष्टीस पडे. या पत्रांच्या वाचनाची आवड तिला विशेष वाटण्याचें कारण त्यांत प्रेमदर्शक विशेषणे, तिच्या भेटीबद्दल उत्कंठेचें प्रदर्शन हीं भरपूर होतीं हें होतें.

गंगाधरपंताच्या मनांत देखील अनेक प्रकारचे विचार घोळत होते, त्यांत आपली बायको कशी दिसेल यासंबंधाचेहि होते. त्यांनां येणाऱ्या पत्रांवरून आपली बायको बरीच प्रौढ व सुशिक्षित झाली असेल अशी कल्पना त्यांनां येई. पण रुक्मिणी तारुण्याच्या वाढीमुळें व उंची पोषाखांत जशी त्यांस दिसली तशी ती दिसत असेल अशी त्यांस कल्पनाच आली नाहीं. नवराबायको हीं बऱ्याच दिवसांनीं भेटल्यानंतर ती एकमेकांशीं कशीं वागलीं हें सांगण्याचें कांहींच कारण नाहीं. ज्यांनां तसल्या प्रकारचे अनुभव असतील त्यांनां कल्पना येईलच. ज्यांनां असल्या प्रसंगाचा प्रत्यक्ष अनुभव नसेल, त्यांनीं या गोष्टीचीं कल्पनाचित्रें काढणे चांगलें नाहीं, तर जी गोष्ट चांगली नाहीं तीस कादंबरीकारानें तरी कां मदत करावी.

---

## प्रकरण १५ वें.

## लीलेच्या परिवर्तनास प्रारंभ.

आज डॉ. सरंजामे हे बरेच खुशीत होते. आणि प्रो. गोगटे यांच्याकडे आपण होऊन गप्पा मारायला ते गेले होते. आधल्या रात्रीं मि. कामत यांच्या घरचे जेवण जेवीत असतां त्यांस एक निराळी जागृति झाली होती, आणि तीमुळें आज दिवसभर ते खुशींत होते आणि संध्याकाळीं ते प्रो. गोगट्यांनां भेटावयास गेले. गंगाधरपंत रुक्मिणीसह मि. कामत यांच्याकडे भेटावयास गेले व त्यामुळे कामतांच्या घरांमध्ये आनंद दिसून येत होता. कामतांच्याकडे मयूरी कांहीं दिवस राहिली होती, व दुसऱ्या कांहीं पंजाबी स्त्रियाहि उतरल्या होत्या, व मिसेस गोगटे या त्यांनां भेटल्या होत्या पण अल्पवयी असून विवाहित असलेली महाराष्ट्रीय हिंदु स्त्री रुक्मिणी हीच पहिली पाहुणी होती. शांताबाईस आपण अमेरिकेंत गरीबीत कसे दिवस काढले व पुढें आपली स्थिति कशी सुधारत गेली यासंबंधानें जिच्यापुढे प्रौढीने दोन शब्द सांगावेसे वाटले व जिचे आपणास थोडेसे लाड करावेसे वाटले अशी स्त्री रुक्मिणी ही पहिलीच. रुक्मिणीविषयीं तिला जो आपलेपणा वाटला तितका कोणाविषयींच वाटला नव्हता. शिवाय रुक्मिणीपाशीं रघूविषयीं अगदीं ताजी माहिती होती. रघुनंदन हा त्या मत्तमयूरीपाशीं लग्न करतो कीं, काय अशी शांताबाईस धास्ती वाटत होती, आणि मयूरी इंग्लंडला गेल्यानंतर लगेच अर्थशास्त्राचे चांगले प्रोफेसर लंडनमध्ये कसे उत्पन्न झाले कीं ज्यांच्याकरितां रघूस हा इंग्लंडपर्यंतचा प्रवास अवश्य वाटला हे तीस कोडे पडलें होतें; एवढेंच केवळ नाहीं तर तें संशयाचें व काळजीचे कारणहि झालें होतें. रघूचें लग्न मयूरीशी व्हावें हे तिला फारसें प्रिय नव्हते पण लीलेची व खुद्द बाबासाहेबांची वृत्ति या बाबतींत अगदीं तिच्यासारखी नव्हती.

रुक्मिणीची ओळख झाल्यानंतर पहिल्या प्रथम शांताबाईच्या तोंडून जे उद्गार निघाले ते हे कीं गंगाधरपंत यावेळेस न्यूयॉर्कला आले ते हाटेलांत कां उतरले, आणि रुक्मिणीला हाटेलांत कां घेऊन गेले. रुक्मिणीने दुसरे कोठें तरी उतरणेंच योग्य होतें. रुक्मिणी ही अमेरिकेंत प्रथम आलेली हिंदु स्त्री, तिला एकदम हाटेलांत नेणें योग्य झालें नाहीं. तिनें याबद्दल गंगाधरपंतांवर ताशेरा झाडण्यास सुरवात केली. त्या टीकेला गंगाधरपंतांनीं जो जबाब खराखुरा होता तोच दिला. ते म्हणाले कीं बायको बऱ्याच दिवसांनी मला भेटली, तर मला हें पाहिजे होतें कीं एकदोन दिवस तरी तिची संगति मला एकट्यालाच पाहिजे होती. आमचें लग्न जरी झाले तरी नवराबायकोंनी वडील माणसांच्या उपसर्गाशिवाय जो "हनीमून" उपभोगावयाचा तो आमचा अजून उपभोगावयाचा राहिला होता. इंदूरमध्ये असतां आम्हांला दिवसा ढवळ्या एकमेकांशीं बोलावयाची देखील चोरी होती. प्रेम करणारीं दोन माणसे एकत्र असलीं म्हणजे सहवाससौख्य लाभते पण या दोहोंमध्यें आणखी कोणी तरी येऊन दोहोंची तीन झाली म्हणजे गर्दी वाटायला लागत. शिवाय दुसरे एक कारण होतेंच.आम्हांला तुम्हीं वडील वाटतां. वडील माणसांच्या देखत सर्व प्रकारचा चावटपणा करण्यास थोडासा संकोच वाटतो आणि आम्हांला तर चावटपणा पुष्कळच करावयाचा होता!

गंगाधरपंतांच्या चेहऱ्यावर या दिवशीं जो तजेला दिसला तितका तजेला लीलेनें कधींच पाहिला नव्हता. तिला गंगाधर तरुण असून गंभीर वृत्तीचा आणि ज्याच्याविषयीं लीलेला अत्यंत आदर वाटे असा मनुष्य इतके दिवस दिसत होता, पण आज तोच गंगाधर नसून आज कोणी दुसरा मनुष्य आला आहे असें तिला वाटलें. आज गंगाधरपंतांचें अगदीं पोरवयांत रूपांतर झालें आहे असें तिला वाटलें, व गंगाधरानें जरी रुक्मिणीची व

तिची ओळख करून दिली तरी एकंदर संभाषणांत आपल्याकडे तो दुर्लक्ष करीत आहे असें तिला दिसून आले. गंगाधर आपल्या बायकोला सर्व प्रकारें संतुष्ट करण्यांत गढला होता, आणि तो जणूं काय आपल्या बायकोशीं बोलत नसून तो विवाहपूर्व प्रियाराधनांत गुरफटला होता, असेंच पहाणारास वाटलें असतें.

मिसेस कामत यांनीं नवराबायकोस जेवणास ठेवून घेतले, आणि जेवणास येण्यासाठीं आणि मिसेस परभणीकर यांनां भेटण्यासाठीं आपण या असा टेलिफोन डॉ. सरंजामे यास करण्यास लीलेस सांगितले, आणि तो टेलिफोन केल्याबरोबर डॉ.सरंजामे टयाक्सीनें दहा मिनिटांत हजर झाले. पण तेवढया दहा मिनिटांत लीला त्यांची मोठया उत्कंठेनें वाट पहात होती. आपल्याकडे जरी गंगाधर दुर्लक्ष करीत आहे तरी आपणांकडे पूर्ण लक्ष देणारा दुसरा कोणी तरी आहे हें तिच्या मनांत गंगाधरपंतास दाखवावयाचें होतें, एवढेंच नव्हे तर रुक्मिणीसहि दाखवावयाचे होतें. गंगाधरपंत बऱ्याच दिवसानीं न्यूयॉर्कला आल्यामुळें तिला त्याच्यापाशीं पुष्कळच बोलावयाचे होतें, कां कीं हिंदुस्थान देशाच्या भवितव्याविषयीं गंगाधरपंताच्या मनांत काय फरक झाला आहे हें तिला विचारावयाचें होतें. पण गंगाधर तिच्या प्रश्नांस तोकडेंच उत्तर देई. व ही उत्सकतेने प्रश्न करीत असतां गंगाधरपंत तिच्या प्रश्नाला तुटक आणि उत्सुकताविहीन उत्तरें देत आहे, ही गोष्ट रुक्मिणीच्याहि लक्षांत आली असावी असें तिला वाटलें; व त्यामुळें तिच्या स्वाभिमानास धक्का दिल्यासारखे झाले; एवढेंच नव्हें तर आपली मानखंडना आणि ती गंगाधरपंताच्या स्त्रीसमोर झाली याबद्दल लीलेस फार वाईट वाटलें, तथापि सुशिक्षित समाजांत वाढलेल्या स्त्रीस स्वाभाविक झालेलें आत्मसंयमन तिच्या मदतीस आले आणि तिनें आपल्या चेहेऱ्यावर शांतपणाची, अनौत्सुक्याची, आणि नवीन ओळख झाली असतां दाखविण्याच्या आनंदाची मुद्रा धारण केली, आणि त्या पारलरमध्येंच ती त्यांचें संभाषण ऐकत बसली; व डॉ. सरंजामे आल्याबरोबर त्यांनां दार उघडून त्यांस पारलरमध्यें ती घेऊन आली. गंगाधरपंत आणि डॉ, सरंजामे यांनीं लीलेचें स्मितयुक्त स्वागत स्वीकारल्यानंतर डॉ. सरंजामे यांचे व गंगाधरपंतांचें "हॅलो" झालें व नंतर गंगाधरपंतांनीं रुक्मिणीची आणि त्यांची ओळख करून दिली. आणि त्यावेळेस तिचे निसर्गमनोहर आणि हिंदुस्थानी उंची लुगडयांत वेष्टिलेले स्वरूप पाहून डॉ. सरंजामे यांस मोठा आनंद झाला आणि "परभणीकर, तूं मोठा दैववान आहेस, तुला फार चांगली बायको मिळाली आहे!" असे उद्गार त्यांनी काढले. रुक्मिणीशी थोडेंसें संभाषण करून लगेच ते लीलेच्या शेजारीं जाऊन बसले. आणि हवा ज़रा गरम आहे म्हणून म्हणण्यास त्यांनीं सुरवात केली. बाहेरच्या पोर्चवर पांच मिनिटें बसूं का म्हणून लीलेस विचारलें, तेव्हां लीलेनें स्मितमुख करून आपली संमति दर्शविली, आणि तुमच्या सहवासाचा आनद आम्ही थोडावेळ दवडीत आहो याच्याबद्दल आम्हांस क्षमा करा असे तिनें मुद्दाम गगाधरपंत आणि रुक्मिणी यांच्याकडे पाहून म्हटले व डॉ. सरंजामे यांचा हात आपल्या हातांत घेऊन त्यांनां घेऊन ती बाहेर आली.

लीला बाहेर आली तेव्हां तिच्या मनांतला सांठवून ठेवलेला राग एकदम बाहेर पडण्यास सुरवात झाली. जणूं काय लीलेचा रुक्मिणीनें अपराध केला आहे आणि त्या अपराधांत डॉ. सरंजामे हेहि गुन्हेगार आहेत अशी वृत्ति तिच्या मनांत असलेली दिसत होती.

"काय, नवीन आलेल्या बाईच्या तोंडाकडे पाहून तुम्ही अगदीं विरघळून गेलां ?"

"छो छो मला उलट तिची कींव येणें तिला पाहिल्याबरोबरच बंद झालें इतकी ती आज

आनंदी दिसत आहे. ती इतकीं वर्षें नवऱ्याविरहित हिंदुस्थानांत आहे अशी जेव्हां कल्पना होती तेव्हां तिच्याविषयीं दुःख होत होतें. आतां तिच्याविषयीं कींव मुळींच येत नाहीं."

"मला हें बोलणें ऐकून आनंद होतो, पण घरांत आल्यावर माझ्याकडे दुर्लक्ष करून एकदम तुम्ही तिच्याकडे गेला?"

"तुझ्याकडे मी मुळींच दुर्लक्ष केलें नाहीं, उलट तुझ्यापाशीं बोलायला सांपडावें म्हणून नवीन आलेल्या पाहुणीची ओळख करून घेण्याचा विधि जितक्या तांतडीनें आटपतां येईल तितक्या तांतडीनें आटपला, आणि तुझ्यापाशीं येऊन बसलों."

"तें कांहीं मला खरें वाटत नाहीं. मला वाटतें कीं तिच्याकडे तुम्हीं स्वाभाविकपणें आकर्षिले गेला. तुम्हांला ती अस्सल हिंदुस्थानी म्हणून जवळची वाटते आणि मी परकी वाटतें."

"मी तुला अस्सल हिंदुस्थानीच समजतों."

"मी मुळींच हिंदुस्थानी नाहीं! रुक्मिणीच्या स्वरूपास मी मुळींच सौंदर्य म्हणत नाहीं. तें सौंदर्य नाहीं! ओरिएंटल स्त्रियांच्या तोंडावर लज्जा आणि भित्रेपणा यांची झांक त्या अमेरिकेला आल्या तरी जात नाहीं, व तसल्या विकाराची छटा चेहेऱ्यावर दिसली कीं तुम्हां हिंदुस्थानी तरुणांचें लक्ष तिच्यावर ओढलें जातें."

"तुला तिच्याविषयीं मत्सर होत आहे वाटतें?"

"अर्थात होतो, मी स्त्रीच आहे हे मी सरळ कबूल करतें."

"आणि तो कां होतो."

"ती सुंदर नसतां तिच्या केवळ हिंदुस्थानी दुर्बलतेमुळें तिच्याकडे तुमचे लक्ष वेधतें म्हणून! सांगा पाहूं; कीं 'तिचा चेहेरा तुम्हांस आकर्षक वाटत नाहीं' असें? तिचें तें बोलतांना भिणें, पुष्कळ वेळां जमीनीकडे पहाणें, नवऱ्यानें पाठीवर हात ठेवल्याबरोबर लाजणें या सर्व गोष्टी पाहून तुमच्या मनावर कांहीं परिणाम होत नाहीं काय?"

"इतक्या सर्व गोष्टी नजरेस येण्याइतकें मी तिला पाहिलेंच नाहीं."

"आतां मी जेवतांनां पाहीन तुमचें लक्ष माझ्याकडे आहे कीं तिच्याकडे आहे!"

"खुशाल पहा!"

जेवणाच्या प्रसंगीं डॉक्टर सरंजामे यांनीं लीलेबरोबरच बोलणें चालूं ठेवलें होतें. रुक्मिणी मि. कामत आणि मिसेस कामत यांच्याशींच बोलत होती, आणि आपली बायको अमेरिकेस आली तरी तेथील लोकांत न बावरतां कशी बोलत आहे हे पाहून गंगाधरपंतास फार आनंद होत होता. मात्र लीला आणि डॉक्टर ही दोघेंजण आपापसांत कशीं कुजबुजत आहेत, इतर मंडळीबरोबर बोलण्यांत ती भागहि घेत नाहींत हें पाहून त्यानें थट्टेनें म्हटलें कीं "तुम्हीं दोघेजण एकमेकांशीच बोलण्यांतच निमग्न झालेले दिसत आहां! न्यूयॉर्कमध्ये आम्ही आहो तोपर्यंत आम्हांला वेडिंग ब्रेकफस्ट तरी मिळतो कीं नाहीं कोण जाणें!"

शांताबाई म्हणाल्या "यांचें असें गुपित तर आज अनेक वर्षें चालू आहे. पण स्वतःचें घर करून रहाण्याची डॉ. सरंजामे यांची इच्छा दिसत नाहीं."

"डॉ. सरंजामे आपल्या विद्यार्थीवर्गांत बरेच लोकप्रिय आहेत, आणि त्यांच्या विद्यार्थिनींस देखील ते फार आवडतात म्हणून मी ऐकलें आहे. पण लीलाबाई आणि डॉ. सरंजामे यांचें रहस्य तर फारच दिसतें!" गंगाधरपंत म्हणाले.

डॉ. सरंजामे यांनीं मान वळवून लीलेकडे पाहिलें.

"मी देखील पण विचारणार आहे कीं तुम्ही त्या श्रायडर बहिणींबरोबर बऱ्याच तात्विक गोष्टींवर वादविवाद करतां, पण तुम्हीं धाकटीला एकटी बरोबर घेऊन सिनेमाला गेला होतां कीं नाहीं?"

"गेलों होतो!"

"आणि तुमचें तें एकत्र रात्रीं जाणें आणि काळोखांत एकत्र बसणें मला आवडेल असें तुम्हांला वाटतें काय?"

"दुसऱ्या मुलीबरोबर फिरायला मी जर गेलो तर त्यासंबंधानें तुझी नापसंती आजच व्यक्त होत आहे!"

"शांताबाई, आपल्याला लाडू खायला मिळणार!" रुक्मिणी लगेच हंसून म्हणाली.

"तुला इतकें समजायला लागलें कां?" शांताबाई देखील कौतुकाने म्हणाल्या.

यानंतर काय बोलणीं झालीं तें सांगण्याचे विशेष कारण नाहीं. भोजनोत्तर घरीं येतांना डॉ. सरंजामे यांनीं लीलेस चुंबन मागितलें, व लीलेनेंहि तें दिले, पण तू चांगला मुलगा झालें पाहिजेस. दुसऱ्या मुलींबरोबर रात्रीचा सिनेमा पहावयास जात जाऊं नको! असें ती बोलली.

---

## प्रकरण १६ वें.

## पुढील बेत.

रुक्मिणी इग्लंड सोडून अमेरिकेस गेली तरी मयूरी अजून इंग्लंडमध्येच होती, आणि विवाहपूर्व अनुनयाचा ती पूर्ण उपभोग घेत होती. गोळवलकरांच्या घरीं बराच काल हें जोडपें काढी. त्यांच्याकडे पाहून त्यांच्या लीलांचें नर्मदाबाई बरेच कौतुक करी. विवाहपूर्व अनुनयाची तिला केवळ कादंबऱ्यांतून माहिती होती, आणि इंग्रजी प्रणयी जनांच्या अनुनयकाळाचे कांहीं देखावे तिनें पाहिले असतीलच. प्रणयी जनांच्या इंग्रजी चित्रांपेक्षां महाराष्ट्रीय पोषाखांतील चित्रें देखील महाराष्ट्रीयांस जर अधिक आकर्षक होतात तर प्रत्यक्ष जनांचीं उदाहरणें त्याहूनहि अधिक आकर्षक होतील यांत नवल तें कोणतें. दोन्ही प्रणयी माणसें देखणीं होती, आणि सुंदर पोषाख केलेली होतीं, आणि बोलण्याचालण्यांत चतुर होतीं, व मयूरीनें रुक्मिणी गेल्यावर नर्मदाबाईस आपलें विश्वासस्थान केलें होते, त्यामुळें नर्मदाबाईस या दोघांचे लाड करावेसे वाटत. आपले प्रेमसंबंध प्रथमतः एका बाजूने प्रेमखेलांत आणि दुसऱ्या बाजूनें रोषांत कसे उद्भवले, आणि दुसऱ्या अनेक पुरुषांशीं संबंध आला असतांहि हा प्रेमसंबंध कसा वाढला, मध्यें आपण रुक्मिणीच्या नवऱ्यावर प्रेम कसे करीत होतों, आणि शेवटीं या प्रेमसंबंधास कसे प्राधान्य मिळालें इत्यादि गोष्टी सांगून आपल्या एकंदर आयुष्याविषयीं मयूरीनें नर्मदाबाईच्या मनांत आपलेपणा, जिज्ञासा आणि कल्याणबुद्धि हीं जागृत केलीं. नर्मदाबाईनें प्रथम रुक्मिणीची जशी जाहिरात केली तशी ती आतां मयूरीची करूं लागली. आणि त्या दोघांची तिने पुष्कळांशी ओळख करून दिली. प्रणयी युवयुवती जरी बाहेरून भटकून आलीं तरी घरीं पारलर मध्यें तासचेतास बसत असत; अशावेळेस नर्मदाबाईनीं त्यांनां जो अनेक प्रसंगीं चहा आणि शिरा नकळत तयार करून दिला त्यामुळे नर्मदाबाईसारखी प्रेमळ बाई मिळणें शक्य नाहीं असे मयूरीस आणि रघुनंदनास वाटल्याशिवाय राहिले नसेल.

रघुनंदनास आपली बातमी घरीं कळवावयाची नव्हती, पण लग्न झाल्यानंतर आपण काय करावयाचें या संबंधाचे त्याचे बेत जोराने चालले होते. दोन भिन्न गोलार्धांत वसती करणाऱ्या माणसांनीं लग्न करावयाचे म्हणजे बरीच भानगड उत्पन्न व्हावयाची. रघुनंदनास मयूरीच्या घरीं किती पैसा आहे याची माहिती कांहीं एक नव्हती, देखणी मुलगी म्हणून तिच्याकडे तो ओढला गेला. ही बरोबर असतांनां आपल्याकडे लोकांचें लक्ष लागतें, म्हणून मयूरी नेहमीं बरोबर असावी असें त्यांस वाटे. मयूरीचा हौशी व खेळाडु स्वभाव त्याला आवडला, व जेव्हां ही आपणांस

एखाद्या अल्पवयी पोराप्रमाणें समजते असे त्यास वाटलें तेव्हां तो विरमल्यासारखा झाला, पण तो जसजसा मोठा होऊं लागला, आणि पुढें त्याच्या मजबूत बाहूंचा आश्रय मयूरी जास्त विश्वासयुक्त भावनेने करूं लागली तेव्हा आपणांस ही लहान मुलासारखे मानीत असणें शक्य नाही अशी त्याची खात्री झाली. नेहेमींच्या पत्रव्यवहारांत जरी रघूस मयूरी वेडा म्हणत असे व तो तिला वेडी म्हणत असे, आणि तुझ्यासारख्या वेडया मुलीकडे पेशंट कोण येणार म्हणून तो तिला जरी खिजवी, आणि ती त्यास तुझ्यासारख्या वेडया व वात्रट पोरास कोलंबियात फेलोशिप तरी कशी मिळाली आणि ती देखील समाजशास्त्रीय आणि शासनशास्त्रीय विषयांत प्रावीण्याबद्दल कशी मिळाली याच्याबद्दल ती आश्चर्य प्रदर्शित करीत असे, तरी देखील या पत्रव्यवहारांत एकमेकांचे मन एकमेकांकडे बरेंच ओढले जात होतें. दोघांची पत्रे वीस पचवीस पानांचीं सहज असावयाची. रघूची कल्पना अशी होती कीं मयूरी अमेरिकेत विद्यार्थिनी म्हणून आली त्याअर्थी ती साधारण गरीबांतलीच असावी. श्रीमंत मुलगी शिकण्याच्या भरीस कशाला पडणार! अशा तऱ्हेची त्याची कल्पना होती. त्याची विवाहोत्तर आयुष्यक्रमाची कल्पना अगदीं साधी होती. पण मयूरी मात्र, पुढील आ[illegible] थोडा विचारच केला पाहिजे असे दोनतीनदां बोलली होती. त्या बोलण्याला विशेष महत्त्व त्याने दिलें नाही. त्यास वाटलें कीं लग्न लावल्यानंतर अमेरिकेचे तिकीट काढावयाचे आणि अमेरिकेस जाऊन रहावयाचे. त्यात विचार तो काय करायचा, वाटल्यास मयूरीने धंदा न्यूयॉर्कमध्ये करावा, इतका कार्यक्रम सोपा असेल व तो त्याच भावनेने म्हणाला कीं हिंदुस्थानांत तुझी कोणी निकटची आप्तमंडळी नाही ना?" मयूरीनें "नाहीं" असें म्हटल्यानंतर तो म्हणाला कीं तर मग हिंदुस्थानांत पुन्हां तुला परत जाण्याचे कारणच नाहीं, काय डिस्पेन्सरीचे आणि घरचे फर्निचर असेल ते कोणामार्फत तरी विकून टाकलें म्हणजे झाले.

"आणि बंगले, चाळी, जमिनी वगैरे आहेत त्यांचे काय करावयाचें?" मयूरीनें विचारलें.

"अरे बापरे, तू तर मोठी पैसेवाली बायको आहेस! पैसेवाल्या बायकोची तर मला भीति वाटते!"

"कां बरे?"

"पैसेवाली बायको नवऱ्याला काय विचारणार? ती नवऱ्याला धाब्यावर बसवील म्हणून बाबांनी मला पुष्कळदां सांगितले होते. ते म्हणाले, तूं अगदीं गरीबाची मुलगी केलीस तर मला बरे वाटेल पण श्रीमंताची मुलगी कधी करूं नकोस आणि जी मुलगी स्वतः वारस असेल ती तर अगदींच करूं नकोस?"

"कां बरे, ज्या मुलींपाशी कांहीं पैसे असतील त्यांनी कांहीं पाप केलें की काय?"

"तुझी इस्टेट आहे तरी किती?"

"लढाईच्यापूर्वी तिची किंमत सुमारें १५ लाख रुपये म्हणजे सुमारे पांच लक्ष डॉलर झाली असती. आतां काय किंमत असेल ती नक्की सांगतां येत नाहीं."

"अमेरिकेंतल्या हिंदुस्थानी मंडळींत माझे बाबा साधारपणे पैसेवाल्यांत मोडतात तरी मला वाटतें की त्यांच्यापेक्षांहि तूं श्रीमं[illegible] आहेस. पांच लक्ष डॉलरची इस्टेट! तिला व्यवस्थापकच सुमारें चार हजार डॉलर सालीना पगार असलेला लागायचा; आणि माझी स्वतःची बाजारांत तितकीहि किंमत नाहीं. तर माझ्यासारखे दोन मनुष्य तर तूं आज सहज नोकरीला ठेवूं शकतील!"

"तसे अशक्य नाहीं, तथापि माझ्या पदरीं लठ्ठ पगाराचीं माणसें नाहींत. माझ्या घराची भाडे वसुली आणि कागदांची व्याजवसूली हीं मी

एका ब्यांकेकडे सोंपवली आहेत. त्या ब्यांकेचें कमिशन बरेंच होतें खरें."

" मग तुझें वार्षिक उत्पन्न काय? "

" सुमारें लक्ष सवा लक्ष रुपये, म्हणजे तीस चाळीस हजार डॉलर. हें सर्व मी खर्च करीत नाही. माझा खर्च फार थोडा आहे आणि मुंबईस असतांनां तो सर्व धंद्याच्या उत्पन्नांतून भागत असे, आणि माझे आज जे उत्पन्न आहे ते भांडवलांत जमा होते."

"तर मग तुझ्या इतक्या पैशाने लठ्ठ असलेल्या मुलीशीं लग्न लावणे धोक्याचेंच आहे. इतक्या पैसेवाल्या स्त्रीला नवऱ्याच्या शब्दाची किंमत ती काय रहाणार?"

"कां बरे, पैसेवाल्या स्त्रियांच्या मनामध्यें प्रेम-भावना जागृत रहाणे शक्य नाही काय?" नवऱ्याला हुकुम करण्याची अवश्यकताच काय? नवऱ्यावर जर बायको प्रेम करीत असेल तर नवऱ्यास प्रिय अशी गोष्ट करण्यास ती धडपडणार नाहीं काय?"

" ज्या घरामध्ये बायको पैसेवाली आहे त्या घरामध्ये सौख्य दृष्टीस पडत नाही. मयूरी, तू पैशाने इतकी लठ्ठ आहेस हें मला अगोदरच कां कळूं दिले नाहींस. मी इतक्या पैसेवाल्या मुलीच्या वाटेसच गेलों नसतो."

"तर मग मी कळविलें नाहीं हे योग्यच झाले. केवळ माझ्या पैशासाठीं माझ्यावर प्रेम करणारा प्रेमी मला नको होता."

"हें तुझ्या दृष्टीने झालें, पण त्या प्रेमीची कथा काय? ज्या मनुष्याला प्रथम आपली गरीबी दाखवून प्रेमी बनविलेंस आणि मागाहून म्हणजे लग्नबिग्न ठरल्यानंतर आपली श्रीमंती कबूल केलीस त्या मनुष्यानें तरी काय करावयाचें?"

"जर प्रेम असेल तर त्या प्रेमी पुरुषास तो जीवर प्रेम करीत असेल त्या स्त्रीची श्रीमंती, व श्रीमंती लपवून ठेवल्याचा तो गुन्हा हीं दोन्हीं क्षम्य धरावीं लागतील."

"मयूरी खरे सांग कीं आपण लग्न केलें तर आपलें आयुष्य सुखानें जाईल काय? तुला काय वाटतें?"

"आपलें आयुष्य सुखानें जाणें ही गोष्ट मला पूर्ण शक्य वाटते."

"मग दुसऱ्यांचीच आयुष्यें बायकोच्या श्रीमंतीने कां दु:खकारक होतात?"

"इस्टेटवाल्या अनेक स्त्रियांचें भवितव्य मी अमेरिकेंत आणि हिंदुस्थानांत असतांना पहात होते. त्यांपैकीं बहुतेक आयुष्ये शोकपर्यवसायी झालीं आहेत हे खरे आहे."

"तर मग आपलेंच आयुष्य सुखानें कसें जाईल? आणि इतरांचे कां जात नाहीं."

"त्यांनां मला मिळाला तसा प्रेमी मिळाला नाहीं म्हणून."

"तू अधिक भाग्यवान आहेस म्हणून तुझाच तेवढा प्रेमी चांगला निघेल! मयूरी, ही स्वत:ची तू फसवणूक करीत आहेस."

"तर मग तुला लग्न मोडावयाचे आहे काय?"

"मी तोच विचार करीत आहे. पण काय करूं ग तुझे गोड स्वरूप, तुझी विनोदी भाषण-पद्धति ही आडवीं येतात. तूं श्रीमंत नसतीस तर किती तरी बरे झाले असते. 'मी तुझ्यावर प्रेम करते, असे तूं म्हणालीस त्यामुळें आपल्यावर प्रेम करणारी मुलगी टाकून देणें देखील जिवावर येतें."

"पण माझ्याशी लग्न करणें किंवा न करणें ही गोष्ट केवळ तुझ्या मर्जीवर राहिली नाहीं. मी देखील आपल्या हक्कासाठीं भांडणारी आहे. तूं माझ्याशी लग्न करणार आहेस आपला वाग्निश्चय ठरला ही गोष्ट रुक्मिणीस, तशीच गोळवल-करांस ठाऊक आहे. जर तूं माझ्यापासून पळून जाऊं लागलास तर मी तुला कोर्टांतच खेंचीन."

"कोर्टांत जाऊन काय करणार! वचनभंगा-बद्दल खटला करणार?"

"होय."

"पण कोर्ट तुला फार तर नुकसानभरपाई देईल. लग्न लावावयास भाग पाडणार नाहीं; आणि नुकसानभरपाई तरी माझ्यासारख्या मनुष्याकडून तुला किती मिळणार; आणि तिनें तूं कितपत श्रीमंत होणार?"

"नुकसानभरपाई जरी बाजूला ठेवली तरी तूं किती वेडा मुलगा आहेस हे सर्व जगाला कळेल।"

"पण तूं आपले श्रीमंतीचें व्यंग माझ्यापासून झांकून ठेवलेंस व गरीबीची खोटी बतावणी करून माझ्याकडून मागणी मिळविलीस ही गोष्ट मला कोर्टापुढे मांडतां येणार नाहीं काय?"

"अशा प्रकारचे खटले कोर्टात येतात कां रघू?"

"मीं कोठें पाहिले नाहींत."

"तर मग आपण अवश्य कोर्टांत देऊं. तो खटला लंडनच्या पत्रांत येईल, त्याप्रमाणेच न्यूयॉर्कच्या पत्रांतहि येईल आणि हिंदुस्थानांतील पत्रांत येईल. आपल्या लग्नाची इतकी प्रसिद्धि कोणता बेणबाजा आणला तर होणार आहे?"

"तर मग काय ठरलें तूं वचनभंगाबद्दल खटला करायचा आणि त्याबद्दल नुकसानभरपाई मागावयाची, आणि वचनभंगाचें समर्थन करण्यासाठीं तूं आपली श्रीमंती लपविली हें कारण मी पुढें करावयाचें आणि त्याचा कोर्टांत हशा पिकावयाचा; पण अशा प्रकारच्या खटल्यानें तूं फार तर मला हास्यस्पद करशील; पण त्यानें तुझा कार्यभाग होईलसें वाटत नाहीं."

"मला आपला कार्यभाग करून घ्यावयाला कोर्टांत जाण्याची जरूरच नाहीं असें मला वाटतें, कां कीं माझें अधरपान तुला गोड लागत आहे, तुझ्या मांडीवर मी बसावें आणि तुझे बाहुपाश माझ्या गळ्यांभोंवतीं असावे याची तुला फार आवड आहे, तर मी तुझ्या या आवडीवर आपली मदार ठेवूं कीं चष्मा घालणाऱ्या म्हाताऱ्या जज्जाच्या निकालावर आपली भिस्त ठेवूं. हे म्हातारडे न्यायाधीश, नवराबायकोची काडी मोडून देण्यामध्यें पटाईत असतात पण त्यांचें जुळतें करून देण्यांत कोठें पटाईत आहेत? मी त्यांच्याकडे कशाला जाऊं?"

"तूं म्हणतेस तें खरें आहे. तूं मला इतकी आवडतेस, तुझें संभाषण इतकें गोड लागते, तर तूं श्रीमंत आहेस एवढ्या सबबीवर तुला दूर करावी हे योग्य तर नाहींच पण, श्रीमंत बायकोची भीति वाटते हें खरें. तूं श्रीमत आहेस, हें [illegible] तुला अनेक ठिकाणीं नेणें, नाटकें, टयाक्सी, नाटकानतरचे सपर याबद्दल पैसे खर्चिण्यांत आनंद होत असे आणि तूं माझ्यापेक्षां सपादून श्रीमंत आहेस असे असतां, तुझ्या वर मी खर्च करणे मला हास्यास्पद वाटेल, आणि तूं माझ्यासाठीं खर्च करावा हेंहि मला आवडणार नाहीं."

"आपण त्याच्याबद्दल तोड काढू. कधीं कधीं तू खर्च करीत जा आणि कधीं कधीं मी खर्च करीत जाईन. किंवा आपण खर्च वांटून घेऊं."

"ही योजना म्हणजे राक्षस आणि ठेंगु यांच्या पातीची योजना आलीच. तुला ट्राममधून मी फिरायला नेले म्हणजे तुला ते कमी प्रतीचे वाटणार, तूं टयाक्सीमधून प्रत्येक वेळेस जाऊं लागलीस म्हणजे खर्च माझ्या अंगाघर अर्धा बसणार."

"रघू, मी तुझ्याबरोबर न्यूयॉर्कला असतांना ट्रालीनें किंवा सबनेंच जात नव्हतें काय? येथें सुद्धां तूं टयाक्सीसाठीं खर्च करूं नको म्हणून मीच तुला अनेक वेळ बजावले नाहीं काय?"

"श्रीमंत बायको आणि गरीब नवरे अशीं अनेक कुटुंबें दुःखी आहेत, असें तूं पाहिलें असतां आपलेंच आयुष्य सुखानें जाईल अशी आशा तुझ्या मनांत कां उत्पन्न होते."

"त्याला कारणें अनेक आहेत. श्रीमंत बायको आणि गरीब नवरा असे जोडपें जेव्हां तयार होतें, तेव्हां बहुतकरून श्रीमंत बायको शोधणाऱ्या नवऱ्याशींच तें लग्न झालेले असते. कर्तृत्ववान् पुरुष श्रीमंत बायका शोधीत नाहींत. आणि आळशी, चैनी आणि नालायख पुरुष श्रीमंत मुलींशीं लग्न लावण्याच्या खटपटींत असतात. श्रीमंत मुलींनां आपण नवरा शोधण्याकरितां खटपट करावी असें वाटत नाहीं, तेव्हा नेमके नालायक पुरुष त्यांच्या वांटयास येतात. त्यामुळे प्रेम नसतां केवळ लोभामुळे पुरुष त्या लग्नाला प्रवृत्त झालेला असतो आणि तो पुरुष पुढें बायकोच्या पैशाकडे लक्ष ठेवतो आणि बायकोला नवऱ्याचें लक्ष आपल्या पैशापासून दूर कसे करावें इकडे लक्ष द्यावे लागतें. जर नवरा बायकोच्या पैशाचा अभिलाष धरणार नाहीं, तर नवऱ्याविषयीं जो आदर रहावयाचा तो स्त्रीच्या मनांतून कधींच कमी होणार नाहीं. आणि त्या दोघांचे पैशावरून भांडण, व नवऱ्यापासून बायकोनें अनेक गोष्टी लपवून ठेवणें या क्रिया कधींहि होणार नाहीत. या बाबतींत माझ्या वडिलांचे उदाहरण लक्षांत ठेवण्याजोगे आहे. माझ्या वडिलांचें लग्न झालें तेव्हां ते गरीबच होते. त्यांनां त्यांच्या आईचा किंवा मावशीचा पैसा मिळाला नव्हता, तथापि आईला मात्र तिचा पैसा पुरा मिळाला होता. तिची सर्व इस्टेट कोर्ट ऑफ वार्ड्सच्या ताब्यांत होती आणि तिचें लग्नहि सरकारी पालकामार्फतच झालें. तेव्हां त्यांनीं सुशिक्षित जांवई पाहून दिला. माझ्या आईची जरी इस्टेट मोठी होती तरी त्यांनीं तिच्यासाठीं कारकून निराळा ठेवला होता. घरखर्च बाबांच्या डॉक्टरीच्याच प्राप्तीतून चालत असे. आईच्या पैशाला त्यांनीं कधींहि हात लावला नाही. आणि त्यामुळें माझ्या आईच्या मनामध्यें माझ्या वडिलांविषयीं एकसारखा आदर वसत होता."

"तुझी इस्टेट मला बिलकूल नको. पण कायगे मयुरी, तुझ्या पधरा लाखाच्या इस्टेटीसाठीं बरींच नोकरमाणसें लागणार आणि तुझा गरीब नवरा जर नोकरीधंद्याशिवाय असला तर तूं त्याला इस्टेटीच्या व्यवस्थेचें काम देशील काय ? आणि दिलेंस तर काय पगार देणार ?"

"मी म्हणेन कीं, तुला कवडीची देखील प्राप्ति त्या इस्टेटीपासून व्हावयाची नाहीं. कां कीं, इस्टेटीमध्ये तुला खालचें काम देतां येणार नाहीं आणि वरचें काम करण्यास तूं लायख नसलास म्हणजे घाण करशील. इस्टेटीचा व्यवस्थापक किंवा मालक म्हणून तुझ्या अंगीं गुण आहेत कीं नाहींत हे मला आज काय ठाऊक आहे. तूं गोड, प्रेमळ आणि धाडसी मुलगा आहेस म्हणूनच तूं मला इतका आवडलास! इस्टेटीची व्यवस्था फुकट पहाण्यास लायख मनुष्य म्हणून मी तुला शोधला नाहीं!"

"कायगे मयूरी, तूं इतकी श्रीमंत आहेस तर मग अगदीं मध्यम स्थितींतल्या किंवा गरीबींतल्या स्त्रीसारखें वागण्याचा सोंगाडेपणा कां केलास?"

"केवळ तुला हुडकून काढण्यासाठीं? म्हणजे, मला असा छोकरा पाहिजे होता कीं जो माझ्या पैशासाठीं माझ्यावर प्रेम करीत नाहीं; व असा छोकरा तूं मला सांपडलास."

"पण माझें प्रेम तुझ्यावर आहे ही तरी तुझी खात्री आहे काय?"

"अरे, पहिल्या प्रथम जेव्हां माझ्याकडे आकर्षिला गेलास त्यावेळेस तर तूं छोकराच होतास, त्या वेळेस माझ्या घरची चौकशी तुला कुठें सुचत होती ? माझी कूळकथा तुला तुझ्या बापाकडून कळली असावी. तरी तूं तिकडे दुर्लक्षच केलेंस. आयुष्याकडे, किंवा विवाहाकडे आर्थिक दृष्टीनें पहाण्याइतपत तुला कोठे समजत होतें. अर्थात तूं माझ्या कुलाकडे पाहिलें नाहींस किंवा पैशाकडे पाहिलें नाहींस!"

"बरें, पण आतां लग्न केव्हां करायचें?"

"केव्हांहि करावें, त्याला माझी हरकत नाहीं पण मला असे वाटतें कीं तूं स्वतः पैसे मिळवायला लागला नाहींस तोंपर्यंत लग्नाच्या भानगडींत पड लास तर तुझी स्वयंप्रयत्नाची स्फूर्ति कमी होईल. आपण थाटांत रहायला लागूं आणि त्या वेळेस तुला बायकोच्या पैशावर राहायची संवय होईल आणि तूं जरी हुशार आहेस तरी काम करण्याची अनवश्यकता मनाला वाटली म्हणजे तुझी हुशारी फुकट जाईल. मी तुला एवढेंच सांगते कीं माझ्या संपत्तीपैकीं एक पैसादेखील मी तुला देणार नाहीं आणि घरखर्चाला लावणार नाहीं. कां की मी गरीब असतें तर तू घरचा सर्व खर्च केलाच असतास. तुझ्या प्राप्तीच्या मानाने ज्या तऱ्हेने तुला रहावें लागेल त्या तऱ्हेनें मी राहीन पण माझ्या इस्टेटींतील एक पैहि खर्च करणार नाहीं. आणि तूं देखील त्याची अपेक्षा करूं नको, एवढेंच नव्हे तर तुझ्या मनांतील सार्वजनिक योजनांनां किंवा देशकल्याणाच्या योजनांनां बायकोचा पैसा कसा उपयोगी पडेल असा विचार देखील करूं नको. ही इस्टेट माझी नाहीं; ही आपण केवळ वाढवीत जावयाची. इच्यांतील एक पैदेखील खर्च करायची नाहीं अशा तऱ्हेने आपण वागत राहिलो तर आपण सुखाने राहूं."

"मला ही योजना फारच पसंत आहे. तर मग चल आपण आतांच जाऊन लग्न करूं. सध्यां मला फेलोशिप आहे ती दोन वर्षें चालेल. पुढे कोठें इन्स्पेक्टरची जागा मिळेलच. द्रव्यप्राप्ति करण्यास मी सुरवात केव्हांच केली आहे. कॉलेज बंद होतें अशा दिवसांत मी बाबांच्याकडे इतर माल खपव्यांप्रमाणें नोकरीला होतों, त्या वेळेस सांठविलेले १००० डालर मजपाशीं आहेतच ते अडचणीच्या दिवसांत उपयोगी पडतील."

"तर मग याच आठवडयांत आपण एकमेकांस बद्ध होऊन जाऊं. केव्हां लग्न करावें, कसें करावें याविषयीं गोळवलकरांचा सल्ला घेऊं."

"पण लग्न झाल्यानंतर तडक अमेरिकेला जायचें ना?"

"आपण हिंदुस्थानांत जाऊं. तुझें घर वगैरे सर्व मीं पाहिले आहे. पण माझें काय आहे तें तूं कोठें पाहिले आहेस."

"पण मला कोलंबियांत परत गेलें पाहिजे, आक्टोबरमध्यें तरी तेथे हजर असलें पाहिजे. नाहीं तर मी माझ्या फेलोशिपच्या नियमांप्रमाणें वागलो नाहींसें होईल."

"आपण आक्टोबरला परत येऊं."

"आतां हा खर्च करायचा, हा माझ्या पैशांतूनच करायचा कीं नाहीं? माझ्या पैशांतून खर्च करायचा असला तर मी सांगेन त्या वेळेसच हिंदुस्थानांत गेले पाहिजे!"

"माझे परत जाण्याचें तिकीट आहेच. तूं येथून मुंबईपर्यंत परत तिकीट तूं आपल्या पैशानें काढ, म्हणजे मला बरें वाटेल. हवे असेल तर मी काढीन. हिंदुस्थानांत असतांनां तेथें तूं माझा पाहुणा म्हणून तुला खर्च पडणारच नाहीं. तुला हिंदुस्थान केव्हा तरी पहावयाचेच आहे. आणि मला माझा नवरा हिंदुस्थानांतल्या मंडळींनां दाखवून नवऱ्यासह थोडेसे मिरवावयाचें आहे. माझा उंच, देखणा आणि सुशिक्षित नवरा पाहून मुंबईच्या किती तरी डॉक्टरणींनां मत्सर होईल. मुंबईतल्या बऱ्याचशा सभ्य आणि उच्च कुलांतील डाक्टरणींनां नवराच मिळाला नाहीं!"

"बरं, मग पुढे काय करायचे?"

"माझी तेथील इस्टेट पहा आणि ती विकावी कीं काय करावें याचा विचार कर. मी आपली प्राक्टीस सोडावी व अमेरिकेस यावें की व्यापारधंद्याच्या निमित्तानें तूंच मुंबईस यावेंस याचा आपण विचार करूं. इस्टेट विकायची म्हणजे दोनतीन लाखांची नुकसानी सोसून एकदम

विकावी कीं सवडी सवडीनें विकावी याचाहि विचार करूं."

"काय बुवा, श्रीमंत बायकोच्या पंचायतीच मोठया!"

"कां बरें, आतां माझा पैसेवालीपणा तूं क्षम्य धरला आहेस ना, मग आतां कां कुरकुर!"

---

## प्रकरण १७ वें.

## वयोमान आणि विचार.

डॉ. सरंजामे हा स्वतंत्र विचाराचा मनुष्य होता, आणि प्रो. गोगटे आणि डॉ. सरंजामे यांचें अनेक गोष्टींसंबधानें जरी जुळत होतें, तरी अनेक गोष्टींसंबंधानें त्यांच्यामध्यें तीव्र मतभेद असे. तथापि एकमेकांनां एकमेकांच्या विचारशक्तीची आणि स्वदेशाभिमानाची जाणीव असल्यामुळे तीव्र मतभेद असूनहि दोघांचें ऐक्य असे, एवढेच नव्हे तर प्रत्येकास असे वाटे कीं आपले विचार दुसऱ्याच्या तीव्र टीकेपुढें टिकले तर ते विचार बरोबर आहेत. दोघांत वादविवाद झाला म्हणजे एकाचे विचार जसेच्या तसेच टिकत असे फारसे होत नसे, तर प्रत्येकास आपल्या सत्यत्वाच्या मर्यादा कळूं लागत. दोघाचे विवाहविषयक उर्फ रक्तमिश्रणविषयक पूर्वपक्ष निरनिराळे असत, त्याचप्रमाणें व्यक्तीमध्यें जे कर्तृत्व उत्पन्न होते ते आनुवंशिक संस्कारामुळे होते कीं केवळ शिक्षण व परिस्थिति यांमुळे होतें याविषयीं दोघांच्या कल्पना भिन्न असत. दुसऱ्याशीं वादविवाद करून त्यांत कांहीं फेरबदल होऊन जेव्हां दोघेजण कांहीं ठरवीत तेव्हां त्यांस असे वाटे कीं सर्व जग आपल्यावर जरी तुटून पडलें तरी आपण संयुक्त विचाराने केलेल्या मांडणीचें समर्थन करूं शकूं. शंकरराव गोगटे आणि डॉ. सरंजामे यांच्यामध्ये असलेले मतभेद केवळ सामाजिक नव्हते, ते कलाविषयक होते, कविताविषयक होते, राजकीय विषयांवर तर ते प्रथमतः फारच भिन्न होते, पण ते क्रमानेंच एकमेकांशीं सदृश होऊं लागले.

डॉ. सरंजामे रा. कामत यांच्याकडे मि. आणि मिसेस परभणीकर यांस भेटण्यास गेले आणि त्याच्या दुसऱ्या दिवशीं प्रो. गोगटे यांच्याकडे गेले. तेथें देखील कर्मधर्मसंयोगानें पुनर्मीलन झालेलें जोडपें होतेच. इंदिराबाई देखील होत्याच. त्यामुळें ही दुपार आणि संध्याकाळ मिळून एक बराच काळपर्यंत टिकणारे संवादसौख्य सर्वांनां मिळालें. ही सर्व मडळी एकमेकांशीं अधिक निकटपणाने बोलणारी होती. डॉ. सरंजामे इंदिराबाईचे दूरचे आप्त लागत. गंगाधर परभणीकर तर गोगटयांचा शिष्य. रुक्मिणीला पाहिल्याचें जरी इंदिराबाईंनां आठवत नव्हते, तरी इंदिराबाईच्या हळदीकुंकवास आपल्या सासूबरोबर गेल्याचे रुक्मिणीस पक्कें आठवत होतें आणि त्या वेळेच्या शंकररावांच्या घराचे जेव्हां तिने वर्णन केलें आणि अंगणांत बाधलेल्या गाईचें आणि तिच्या वासराचे वर्णन केले तेव्हां इंदिराबाईस रुक्मिणी ही आपल्या जुन्या ओळखीपैकी आहे असें वाटावयास लागले. इंदिराबाई व गंगाधर यांनीं याच वेळेस पहिल्याने एकमेकांस पाहिले तरी एकमेकाची एकमेकांस माहिती होतीच.

इंदिराबाईंनीं यावेळेस फराळाचे साहित्य आपल्या कपाटांतून बरेच काढलें, आणि पुरुष मंडळींनीं त्यावर हात मारण्यास चांगलीच सुरुवात केली. बायकांनी म्हणजे इंदिराबाईने मात्र एकेक जिन्नस फार हळू खावयाचा, मध्येंच मांजर स्वैपाकघरांत आले म्हणून स्वैपाकघरांत जावयाचे इत्यादि युक्त्या लढवून असलेले फराळाचें जास्त वेळ पुरावें म्हणून युक्त्या लढविण्यास सुरुवात केली. ती युक्ति रुक्मिणीच्या लक्षांत आल्याबांचून राहिली नाहीं. इंदिराबाई फराळाचे टेबल सोडून आंत गेल्याबर इंदिराबाईची या देशांतली गृहव्यवस्था मला पहावयाची आहे

असे निमित्त काढून रुक्मिणीहि आंत गेली आणि ती बराच वेळ आली नाहीं. इंदिराबाईंनीं तिला आपलें सगळे घर दाखविलें. त्यांत एक मराठीचें पुस्तकांचें कपाट होतें. त्यांत कादंबऱ्या सपाटून भरल्या होत्या. त्या कादंबऱ्यांची जुनी बांधणी फाडून टाकून एक प्रकारची अमेरिकन बांधणी केली होती. त्या कादबऱ्यांकडे रुक्मिणीचें लक्ष वेधल्यामुळें रुक्मिणी आणि इंदिराबाई त्या खोलींतच बोलत बसल्या. आणि या तऱ्हेने बायका गैरहजर झाल्यामुळें गंगाधरपंत, डॉ. सरंजामे आणि प्रो. गोगटे यांचीं संभाषणे बरींच रंगांत आलीं होती. समाजशास्त्रीय अनेक प्रश्नांवर केवळ शास्त्रीय दृष्टीनें देखील इंदिराबाईसमोर चर्चा करावयास डॉ. सरंजामे यांस संकोच वाटत असे आणि रुक्मिणीसमोर बोलतांना तर त्यांनां संकोच फारच वाटला असता!

"डॉ. सरंजामे जरी रसायनशास्त्री होता तरी त्यानें सामाजिक प्रश्नांवर बरेच वाङ्मय वाचले होतें आणि त्यावर त्याचा बराच विचार झाला होता. शास्त्रीयसंशोधक या नात्याने जे त्यास शिक्षण मिळाले होते, त्यामुळे त्याची बुद्धि केवळ पृथक्करणपर बनली होती असें नाहीं तर संयोजकहि बनली होती. त्यास असे वाटे कीं वस्तूंचे पृथक्करण करून घटकद्रव्ये काढणे जसे महत्त्वाचे आहे तसेच त्या घटकद्रव्यांचे रासायनिक एकीकरण करून सयुक्तद्रव्ये शोधून काढणेहि तितक्याच महत्त्वाचें आहे. सामाजिक प्रश्नांमध्ये जेव्हां तो ही बुद्धि चालवी तेव्हां धर्म व समाज यांचे तो घटक शोधून काढी. समाजाचीं जी अनेक अंगें मनुष्यप्राण्यामध्ये जिरून किंवा मनुष्याच्या आयुष्यक्रमाला वेष्टण करून मनुष्याच्या आयुष्यावर परिणाम करतात तीं अलग करणे, त्यांचे सयोग आज आहेत त्यापेक्षां निराळे झाले तर काय परिणाम होईल तें काढणें हा पृथक्करणात्मक, आणि कर्तव्यात्मक समाजशास्त्राचा भाग आहे असें तो म्हणे. राष्ट्र तयार करणाऱ्याच्या मनांत असलेले समाजशास्त्र शोधून ते नियम वापरून आपणांस पाहिजेत तसे समाज निर्माण करणे हे कर्तव्यात्मक समाजशास्त्राचें महत्त्वाचे कर्तव्य आहे. यालाच तो कधीं कधीं सामाजिक रसायनशास्त्र म्हणे. आणि "सामाजिक रसायनशास्त्र" वर तो वारंवार बोलत असे. विशिष्ट राष्ट्र चांगले किंवा वाईट यावर माणसांच्या परिस्थितीचे घटक शोधल्याशिवाय बोलणे म्हणजे अशास्त्रीय मनुष्याचे भकणे असे तो बोले. अमेरिकन मनुष्य आणि हिंदुस्थानी मनुष्य यांवर चर्चा करताना अमेरिकन संस्कृति हिंदु संस्कृतीपेक्षां उच्च किंवा नीच आहे हें बोलत बसणें हें पुष्कळ प्रसंगी अत्यंत गैरसावधपणाने चालते अशी सूचना तो प्रो. गोगट्यांस देई. पोटयाशियम आयॉडाईडपेक्षां पोटयाशियम ब्रोमाईड हें चांगलें किंवा वाईट हे सांगणे जितके चुकीचे आहे त्याप्रमाणेच अमेरिकन व हिंदी मनुष्याची सरसकट तुलना करणे चुकीचे आहे असे त्याला वाटे. तुम्ही मिश्र प्रश्न घेऊं नका. गरम हवेत वाढलेली संस्कृति आणि थंड हवेत वाढलेली संस्कृति या दोहोंची तुलना करा; त्याप्रमाणेच महंमदीय संस्कृति व हिंदु संस्कृति यांचे परिणाम पहावयाचे म्हणजे एकाच ठिकाणचे दोन लोक घेऊन तुलना करा. इंग्लंडांतील स्वैरस्य आणि इंडोचायनांतील बुद्धानुयायित्व हीं तुल्य नाहीत. विचार करतांना मनुष्यामनुष्यांत फरक करणारीं जीं अनेक कारणे आहेत तीं दूरदूर करून अभिमान कशाबद्दलचा बाळगायचा ते ठरवा. मनुष्यप्राणी काय आहे याचें ज्ञान व्हावयाचे म्हणजे विशिष्ट मनुष्यप्राणी हिंदुस्थानांत असतां कितपत कर्तृत्व दाखवितो, तो अमेरिकेत असतां कितपत कर्तृत्व दाखवितो व इत्यादि गोष्टी पाहून हिंदुस्थानांतील मनुष्याची लायखी ठरविली पाहिजे असें, तो म्हणे, निरनिराळ्या राष्ट्रांतील

लोकांचीं लग्नें म्हणजे निरनिराळ्या द्रव्यांचा रासायनिक संयोग या प्रकारें तो बोलत असे, तथापि तो इतक्या रसायनशास्त्रीय भाषेत मुद्दाम बोलत आहे काय असा भास लोकांस होई, कां कीं तो प्राणिशास्त्रहि शिकला होता, त्यामुळें व प्राणिविषयक व्यवहारांचें केवळ रासायनिक परीक्षण करण्याने फारच थोड्या गोष्टी कळतात, आणि यामुळे मानवी व्यवहारांत रसायनशास्त्र आणण्यास तो एकाएकी प्रवृत्त होत नसे. तथापि रसायन शास्त्रास परिचित असलेली पद्धति मात्र तो आणी. संस्कृतीचीं जीं अंगे आहेत त्यांचे पृथक्करण करून त्यांच्या अनेक अंगांचे निरनिराळे मिश्रण केल्याने कांहीं निराळे उपयुक्त पदार्थ होतील असे विचार त्याच्या मनात येत. हिंदू मडळीमध्ये जर मुसुलमानी संप्रदाय पसरविला तर त्यांमध्ये काय आवेश उत्पन्न होतो हे पहावे, त्याचप्रमाणे वेदात मुसुलमानात पसरविला तर काय होईल तें पहावें इत्यादि गोष्टी तो बोलत असे. समाजाला उपयुक्त असे जे विचार किंवा आचार असतील ते घ्यावेत, आचारविचारांच्या विशिष्ट संयोगापासून जे धर्मसंप्रदाय उत्पन्न होतात, त्या सप्रदायांचे पृथक्करण करून निरनिराळे घटक काढून प्रत्येक घटकाकडे सामाजिक फायद्यातोट्याच्या दृष्टीने किंवा सत्यासत्याच्या दृष्टीने पाहून त्याचा स्वीकार करावा किंवा त्याग करावा हें ठरवावें अशी वृत्ति सरंजाम्यांत उत्पन्न झाली होती. गोगटयांच्या घरीं जे सामाजिक विषयावर बोलणे झाले त्याला गंगाधरपतांनी सुरवात केली. प्रथमतः गंगाधरपंतांनीं शिवराजसिंगाची कथा काढली, आणि प्रो. गोगटे यांनां तुम्ही उत्तर देण्याचे कां टाळले म्हणून प्रश्न केला आणि गंगाधरपंत म्हणाले "गुरुजी, तुम्हीं अनेक महत्वाच्या प्रश्नांना उत्तर देण्याचे फार टाळतां हें मी अमेरिकेस असतां माझ्या अनेकदां नजरेस आलें आहे" प्रो. गोगटे यांनीं उत्तर दिलें कीं "प्रवाद अगदीं बरोबर आहे आणि त्याचें कारण माझ्या मतांतच वारंवार बदल होतो आणि मी विचारी आणि तत्त्ववेत्ता आहे अशी माझी ख्याति होऊन बसली तर ती संभाळावी कशी असाच प्रश्न माझ्यापुढें येतो."

"तुमच्या मतांत वरच्यावर इतका बदल कां होतो?"

"तुम्हा दोघांशीं वादविवाद होतो त्यामुळे"

"काय, आमच्या बोलण्याने तुमच्या मतांत फरक होतो. मला वाटे की तुम्हींच आमच्या मतांत बदल करता."

डॉ. सरंजामे व प्रो. गोगटे यांचीं विवाहविषयक आणि रक्तमिश्रणविषयक मतें भिन्न होतीं, त्या विचारभिन्नतेच्या कारणाचे स्पष्टीकरण डॉ. सरंजामे हे आपण भिन्न परिस्थितींत वाढलों असे सांगून करीत. असे स्पष्टीकरण करण्याचेंहि प्रयोजन होते. गोगटे आनुवंशिकतावादी तर सरंजामे परिस्थितिपरिणामवादी, कोंकणस्थ मुलांनी कोंकणस्थ मुलींबरोबरच लग्नें करावींत, कां कीं कोंकणस्थ जातीमध्यें जी कांहीं स्वाभाविक उच्चता आहे ती अन्य जातिविवाहानें बिघडून जाईल अशी गोगटयांची भावना होती तर कोंकणस्थांमध्ये स्वाभाविक उच्चता आहे हें सरंजाम्यांस मुळींच मान्य नव्हते, शिवाय "नीचादप्युत्तमा विद्या स्त्रीरत्नं दुष्कुलादपि" अशा तऱ्हेची वृत्ति डॉ. सरंजामे यांची होती. आणि या विचारभिन्नतेचें स्पष्टीकरण जर गोगटे करावयास लागले असते तर आपण अधिक शुद्ध बाळबोध प्रवृत्तीच्या आईबापांपासून जन्मलों असें सांगून त्यांनीं केलें असते, पण असे स्पष्टीकरण अगदीं मोकळ्या मनाने करण्याचें धैर्य गोगटयांस झालें नाहीं. आनुवंशिकतेच्या तत्त्वांवर स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे सरजाम्यांच्या आईबापांवरच ही टीका व्हावयाची आणि ती सरंजाम्यांस आवडणार नाहीं अशी भीति गोगटयांस वाटे

प्रो. गोगटे सरंजाम्यांस विचारीत की, " आपण दोघेहि कोंकणस्थ ब्राह्मण, एका परिस्थितींत वाढलेलों असें असून तुमची व माझी विवाहविषयक मतें इतकीं भिन्न कां?" सरंजामे उत्तर देत कीं, "आपण एका परिस्थितीत वाढलो हेच आधी खरें नाहीं. आपण भिन्न परिस्थितीत वाढलो! तुमचे लग्न तुम्ही १९ वर्षांचे असतांनाच झाले ही गोष्ट त्याला मुख्य कारण आहे. तुमचे लग्न तुमच्या पालकांनींच करून दिलें आणि त्यामुळें तुम्हांस अगोदर स्त्रीविषयक भावना उत्पन्न होऊन स्त्रियांचे अवलोकन झालेले नाहीं. तुम्ही स्वत: इतर लोकांपेक्षां चागले अशा तुमच्या स्वाभाविक अहकारयुक्त कल्पना, त्यांसच आपली बायको इतर लोकांच्या बायकांपेक्षां चांगली या कल्पनेची जोड मिळाली. जातीचा अभिमान उत्पन्न झाला, त्याबरोबर जातीच्या स्त्रियांचाहि अभिमान उत्पन्न झाला. माझें असे आहे की, माझे अजून लग्न झालेच नाहीं; आणि लग्न करण्यासंबंधीं मला माझ्या इच्छेप्रमाणें वाटेल तें करण्यास मोकळीक आहे; आणि त्यामुळें माझे सर्व प्रकारच्या स्त्रियांकडे लक्ष गेले. सुंदर स्त्री दिसली म्हणजे ती स्वाभाविकपणेच माझें मन आकर्षण करी."

"तुम्हाला कोंकणस्थ ब्राह्मण स्त्रिया एकंदर स्त्रियांपेक्षां देखण्या नाही वाटत?"

" मी सर्व कोंकणस्थ स्त्रिया पाहिल्या नाहीत व इतर जातींच्या स्त्रियांचे समुच्चयहि पाहिले नाहीत आणि ज्या जातीत जास्त स्त्रिया सुंदर असतील त्या जातींतली एक स्त्री पाहिजे अशी माझी भावनाच नव्हती; तर कोणत्या जातीतल्या स्त्रिया संख्येने जास्त सुंदर आहेत ही पंचाईत मला कशाला ? कोणत्या जातीतल्या स्त्रिया अधिक सुदर यासबधाने माझें मत तयारच झाले नाही."

" तर मग स्त्रियांसंबधाने तुमचे अवलोकन कोणत्या प्रकारचें असे?"

"जी स्त्री दिसेल ती कशी काय आहे हेंच मी पहातों. सुदर फुलांची बाग पहाण्याची जितकी मला आवड आहे त्यापेक्षांहि सुंदर मुली पहायला मिळाव्यात ही इच्छा मला जास्त आहे. जी स्त्री सुदर दिसे ती मन आकर्षण करी."

" तुमचे मन आकर्षण करण्याऱ्या स्त्रिया तुम्हाला कोणत्या जातींत आढळल्या?"

"मला सर्वच जातींत आढळल्या."

"सर्वच जातींत म्हणजे?"

"कोकणस्थ-देशस्थादि ब्राह्मणांत आढळल्या, सारस्वतांत आढळल्या, दैवज्ञांत आढळल्या, कासारांत आढळल्या, मराठयांत आढळल्या, पारशांतहि आढळल्या, गुजराथणी आढळल्या व कांहीं बंगाली मुलीहि फार सुंदर वाटल्या—"

"तुम्हाला मारवाडणी नसतील सुंदर वाटल्या!—"

" मारवाडणी देखील सुदर वाटल्या! त्यांची रहाणी जरा स्वच्छ झाली, पोषाख जरा अधिक मोहक झाले तर अमुक एक मुलगी कशी दिसेल यासबंधी विचारहि अनेक वेळां करून कांहीं मारवाडयांच्या मुली देखील आपण करायला कांहीं हरकत नाही असे मला वाटले. इंग्रज मुलीसबधानेहि तसेच वाटले. स्त्रीपुरुष एकमेकांचा विचार करताना त्यांचे प्रथम त्यांच्या पोषाखाकडे लक्ष जाते आणि तें दिलेंहि पाहिजे; कां की, पोषाख हा अंत:करणांतील रसिकतेचा दर्शक आहे. पण पोषाखावरूनच आपले मत बनविणें बरोबर नाहीं. हा पोषाख नसता व आपल्या आवडीचा पोषाख असता तर ती स्त्री कशी दिसली असती अशी देखील कल्पना केली पाहिजे. बाह्य उपाधीवर प्रेम अवलंबून राहात नाही. "न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते" हा स्वाभाविक नियम कविकुलगुरूनेच सांगितला नाही काय?"

" अन्य जातीच्या मुली तुमचे मन आकर्षण करीत तें त्यांचा निराळेपणा तुम्ही विसरत होता म्हणून की त्यांच्या निराळेपणामुळेंच? "

" जेव्हां निराळा पोषाख असे पण तो मला आकर्षक होत नसे तेव्हां तो त्यांनी न घालतां मराठी पोषाख घातला असता तर त्या कशा दिसतील अशी मी कल्पना करीं. तथापि पोषाखाच्या निराळेपणामुळेच कांही स्त्रिया आवडू लागल्या. कोकणस्थ ब्राह्मण स्त्रियांपेक्षां मुंबईतील अनेक जातींच्या स्त्रिया त्यांच्या महाराष्ट्रीय पोषाखांतच दिसून येणाऱ्या निराळेपणाच्या छटेमुळें मला अधिक मोहक दिसत. पोषाखांत देखील विविधता पाहिजे. निरनिराळ्या पोषाखांमुळे एकच स्त्री निरनिराळी दिसून अधिकच मोहक दिसते, अमुक एक महाराष्ट्रीय स्त्री गुजराथी पोषाखांत कशी दिसेल, मुसुलमानी पोषाखांत कशी दिसेल, त्याचप्रमाणे एखादी पारशीण मराठी पोषाखांत कशी दिसेल अशी मी कल्पना करतो. पण इतकी कल्पनाशक्ति खर्च करावयाची ती चेहरा गोड असेल तरच करतो."

"आपल्या स्त्रिया आपल्या महाराष्ट्रीय पोषाखांत दिसाव्यात कीं त्या अनेक प्रकारच्या पोषाखांत दिसाव्यात यांविषयीं तुम्हांला काय वाटतें?"

"मला असे वाटते कीं महाराष्ट्रीय स्त्रियामध्ये किंवा हिंदुस्थानच्या सर्व प्रकारच्या स्त्रियांमध्यें निरनिराळ्या पोषाखांची अभिरुचि वाढली पाहिजे. निरनिराळ्या फ्याशन्स निघण्याची क्रिया हिंदुस्थानांत सुरू झालीच पाहिजे, महाराष्ट्रीय स्त्रियांनी गुजराथणींसारखे, मुसुलमानणींसारखे, इंग्रज स्त्रियांसारखे पोषाख मधून मधून अवश्य करावेत. त्याच्या योगानें आपणांमध्ये आपलेपणाच्या कल्पना अधिक व्यापक होतील. जरा पोषाख निराळा दिसला किंवा आपल्या ठराविक रीतीपासून जरासा फरक दिसला म्हणजे आपल्या लोकांनां या जरा निराळलेल्या लोकांविषयीं परकेपणा वाटू लागतो. या निराळेपणाविषयी दूरत्वाची भावना कमी होण्यास आपण मुद्दाम प्रयत्न केला पाहिजे. आपल्या बायकोला गुजराथी पोषाख दिला किंवा आपण स्वतः मधून मधून निराळी फ्याशन म्हणून गुजराथी पगडी वापरावयास सुरुवात केली तर चांगले होणार नाहीं काय ? तसेंच आपल्या तरुण मुलांनां गुजराथी स्त्रिया आवडल्या तर त्यांच्याशी प्रेम जुळवावयाला आपण गुजराथी पगडी डोक्यावर घातली तर काय झालें!"

"तर मग राष्ट्रीय पोषाख, राष्ट्रीय संस्कृति इत्यादि गोष्टी चुकीच्याच वाटते, आपण दुसऱ्यासारखे व्हायचें कीं दुसऱ्यांनीं आपल्यासारखें व्हावे म्हणून प्रयत्न करावयाचा।"

"मृत राष्ट्रांत कोणत्याच दृष्टीनें प्रयत्न नसतो. पण जिवंत राष्ट्रांत दोन्ही तऱ्हेचे प्रयत्न होतात. दोन समाज एक करावे ही कल्पना मृत राष्ट्रांत उत्पन्न होत नाहीं तर जिवत राष्ट्रांतच होते. जेते लोक जित लोकांनीं आपल्यासारखें व्हावें म्हणून प्रयत्न तर करतातच. पण जित लोकांनां देखील आपलेपणा वाटावा म्हणून प्रयत्न करतात. हा सर्व प्रयत्न ज्या राष्ट्रापुढे कांही ध्येय असेल त्याकडून होतो, दुसरा आपल्यासारखा होणें शक्य नसेल तर आपण त्याच्यासारखें व्हावें ही बुद्धि जेत्या राष्ट्रातच व्हावयाची. हिंदुस्थानांत गुजराथी पोषाख महाराष्ट्रीयांनी घेतला तर बिघडले काय? खरोखर पहातां सर्व लोकांचा पोषाख इंग्रजांसारखा होत आहे. आपल्या स्त्रियांचा पोषाख इंग्रज स्त्रियांसारखा तितक्या झपाट्याने होत नाहीं व पूर्णपणें तो कधींच होणार नाहीं असें वाटतें तरी आपल्याकडे तो व्हिक्टोरियन काळांतला ब्लाउझ उर्फ पोलका आलाच नाही काय?

"तर मग येथें तयार होत असलेल्या नवभारतीय समाजास पोषाखाविषयी तुम्ही काय उपदेश कराल? तुमचे लग्न झाल्यानतर आपल्या बायकोस पोषाखाविषयीं काय सल्ला द्याल!" मध्येंच गंगाधरपंत बोलला.

"बरा प्रश्न केलात, तुमची बायको इकडे आली आहे. ती देखणी आहे. मंडळीमध्यें तुम्ही तिला

घेऊन गेलांत तर ती शोभिवंत दिसेल आणि निरनिराळ्या कपड्यांनीं खुलून दिसेल. सुंदर पोषाखाविषयीं मी बायकांनां काय सांगणार! पोषाखाची आवड तुम्ही तिच्यावरच सोपवावी. मी एवढेंच सांगेन कीं, पोषाखाने तुमची बायको हिंदुस्थानी—निदान पौरस्त्य दिसली पाहिजे. मग काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत आणि तुर्कस्तानपासून इंडोचायनापर्यंत कोणत्याहि राष्ट्राचा पोषाख तिनें केला तरी हरकत नाहीं. कोणत्याहि जातीचा पोषाख सर्वांशीं त्यांनीं घेतला पाहिजे असे नाहीं. वाटेल त्या जातीतला वाटेल तो पोषाखाचा भाग जरी घेतला तरी चालेल!" सरजामे यांनी उत्तर दिले.

"तुमच्या बऱ्याच कल्पना आहेत. गंगाधरपंत, तुम्हांस या कशा काय पसंत पडतात." प्रो. गोगटे यानीं विचारले.

मला हे सर्व विचार बरेचसे पसंत पडतात. येथेच रहाणाऱ्या सर्व प्रकारच्या हिंदी जातीचे पूर्ण मिश्रण होत असतां पोषाखांतहि मिश्रण हें स्वाभाविकपणें होणार आणि भारतीय पद्धतीच्या पोषाखाच्या अनेक फ्याशन्स निर्माण होणार असें मला तर भवितव्यच दिसत आहे."

"झालें! राष्ट्रीय पद्धतीची जी उच्च जात निर्माण करावयाची तिच्या संबंधाची माझी कल्पना तयार होत आली. आपल्याला ही जशी सामाजिक सुधारणा करण्यास संधि मिळाली आहे तशी आपल्या पूर्वजांनां कधीं मिळाली नसेल!" प्रो. गोगटे म्हणाले.

"छे! छे! पेशवाईच्या वेळेस सामाजिक सुधारणेची संधि पुष्कळ होती पण ती गमावली."

"तुम्हीं जर त्या काळांत असतां तर काय केलें असतें?"

"मी पुष्कळच गोष्टी केल्या असत्या; कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, देवरुखे इत्यादि महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या जाती एक केल्या असत्या, त्यांत देखील प्रत्येक जातीतल्या देखण्या मुली, किंवा श्रीमंत घराण्यांतल्या मुली कोंकणस्थ ब्राह्मणांस दिल्या असत्या, आणि कोंकणस्थ मुली श्रीमंत देशस्थ घराण्यांत दिल्या असत्या आणि या तऱ्हेनें श्रीमंत महाराष्ट्रीय वर्ग परस्पर विवाहास अनुकूल केला असता, आणि तो देखणा बनून समाजांतला उच्च वर्ग म्हणून शोभला असता म्हणजे पेशवाईविषयीं अभिमान बाळगणारी मंडळी एक लाख कोंकणस्थांऐवजीं दहा लाख महाराष्ट्रीयांची बनली असती, आणि जसजशी मराठ्यांची सत्ता चोहोंकडे वाढली असती तसतशी इतर ठिकाणच्या ब्राह्मण जातींशी लग्नव्यवहार सुरू केले असते."

"पण महाराष्ट्राबाहेर विशेषेंकरून बंगालमध्ये कुलीन ब्राह्मण अनेक स्त्रिया करीत, त्यांच्याशी देखील लग्नव्यवहार केला असता काय?"

"महाराष्ट्रामध्ये तरी कोठें एकपत्नीपद्धति होती. मी उलट असा उपदेश केला असता कीं महाराष्ट्रीय स्त्रीबरोबर लग्न झालें असलें तरी एखादीदुसरी बंगाली किंवा पंजाबी स्त्री करायला हरकत नाहीं!"

"म्हणजे, तुम्ही अनेकपत्नीपद्धतीस संमति दिली असती काय?"

"मीं त्या बाबतींत सुधारणेकडे दुर्लक्ष केलें असतें. सर्व प्रकारच्या सुधारणा एकदम करतां येत नाहींत. सर्व ठिकाणचे लोक, आणि विशेषेंकरून शिष्ट लोक विवाहसंबंधानें पेशवाईशीं बांधले गेले असते म्हणजे देशांत खरें एकराष्ट्रीयत्व उत्पन्न झालें असते."

"पण इतका खटाटोप करण्याचें कारण काय? पेशवाई गेली ती एकराष्ट्रीयत्वाच्या अभावामुळें गेली असें वाटत नाहीं. तर शास्त्र आणि यांत्रिक शोध या गोष्टींच्या अभावामुळें गेली. शास्त्र वाढलें असतें तर संस्थान बळकट ठेवतां आले असतें."

"राज्य कायम ठेवावें एवढेच ध्येय राज्यापुढें नसावें, तर राज्याविषयी सर्व प्रजेस आपलेपणा वाटावा ही गोष्ट तितकीच महत्त्वाची आहे. व मी सांगतो तो विवाहविषयक उपक्रम ठेवतां आला असता, तर राज्याविषयीं आपलेपणा वाढला असतां सर्व जनतेविषयीं अधिकारी वर्गात सहानुभूति असणे आणि राज्याच्या अधिकारी वर्गाविषयी सर्व जनतेत आपलेपणा वाटणे, ही गोष्ट महत्त्वाची आहे, त्याप्रमाणेच सर्व उच्च अधिकारी वर्गाविषयी विश्वास असणें ही गोष्टहि महत्त्वाची आहे."

"हिंदुस्थानचे राज्य आज कोणी करावे असे तुम्हाला वाटते?"

"आज इंग्रजांनींच करावे असें मला वाटते."

"तुमच्या तोंडून हे मत बाहेर पडते हें पाहून मला वाईट वाटते. तुम्ही असे बोलाल असे मला वाटलें नव्हतें. पण तुम्ही तरी असे कां बोलतां?"

"मी असे बोलण्याचें कारण हेंच कीं जोंपर्यंत इंग्रजांपेक्षां अधिक उपयोगी वर्ग देशाला राज्य चालवायला मिळणार नाहीं तोपर्यंत कारभार त्यांच्याच हाती राहिलेला वाईट नाहीं."

"इंग्रजांची लायखी आपल्यापेक्षां अधिक कां आहे?"

"आपल्यापेक्षां म्हणजे कोणापेक्षां?"

"सुशिक्षित हिंदी वर्गापेक्षां."

"सुशिक्षित हिंदीवर्ग, हा कांहीं त्या वर्गामध्यें वर्गविशिष्ट भावना असून त्यामुळें एकजूट असलेला, विद्येनें इंग्रजांपेक्षां अधिक नाहीं, आणि त्यामध्ये सर्व जनतेविषयीं सारखेपणाची भावना नाहीं व त्यामुळें जनतेचा त्या वर्गावर विश्वास फारच कमी आहे."

"या वर्गावर जनतेचा अविश्वास नेहेमींच राहील काय?"

"जोंपर्यंत हा वर्ग स्वतंत्र बुद्धीचा नाहीं तोंपर्यंत हा जनतेचा आपल्यावर विश्वास उत्पन्न करूं शकणार नाहीं. या वर्गातील प्रत्येक व्यक्तीवर इतर जातीच्या पण आपल्या वर्गातील लोकांचें वजन न पडतां जातींतील व्यक्तींचें वजन पडतें. जर पारशी अधिकारी झाले तर त्यांच्याविषयीं हिंदूंत पुष्कळच अविश्वास राहील एवढेच नव्हे तर सामान्य कोंकणस्थ ब्राह्मण देशस्थांशी देखील गुर्मीने वागावयास लागतील. हिंदी समाजांतील शिष्टवर्ग हा अनेक जातींचा मिळून झाला पाहिजे. त्यास सर्वच जातीविषयी सहानुभूति असली पाहिजे आणि तो सर्व प्रकारच्या जातींशीं लग्न करण्यास तयार असला पाहिजे."

"हा असा वर्ग कोठे तयार होईल असे तुम्हांस वाटतें?" गंगाधरपंतांनीं विचारलें.

"मला असें वाटले कीं, आपली इंडियन सेटलर्स असोसिएशन त्या वर्गाचा म्हणजे खऱ्या हिंदी जातीचा प्रारभ आहे."

"हा वर्ग येथल्यापेक्षां इंग्लंडांत अधिक चांगल्या तऱ्हेनें स्थापन होईल किंवा नाहीं?" गंगाधरपंत पुन्हां विचारतात.

"याविषयीं आपले विचार प्रगट करण्यास मी रघूस लिहिले व त्याचे उत्तरहि आलें आहे."

"काय उत्तर आलें आहे?"

"माझ्या खिशांतच तें पत्र आहे. त्यांतला कांहीं भाग वाचायला हरकत नाहीं.—"

"राष्ट्रीकरणासाठीं जी जात निर्माण करावयाची ती अमेरिकेपेक्षां इंग्लंडला अधिक लौकर निर्माण करतां येईल असा आपला जो वादविवाद होत असे, त्या वादावर निश्चयात्मक मत आतां मला देतां येईल असें वाटतें. मी इंग्लंडला आलों, येथें आपले राजकीय विचार फारसे प्रदर्शित केले नाहींत, तरी पण येथील राजकीय विचारांची, तशीच सामाजिक विचारांची मला चांगलीच कल्पना आली. येथें "सेटलर्स असोसिएशन" सारखी संस्था नाहीं. येथें हिंदी लोकांच्या ज्या कांही संस्था आहेत त्यांचीं ध्येयें हिंदुस्थान आणि

इंग्लंड या दोन देशांतील लोकांमध्यें स्नेह वाढविणें, हिंदुस्थानी विद्यार्थ्यांस जरूर पडेल तें साहाय्य करणे इत्यादि आहेत. येथें उजाड जमीन नाहीं किंवा मजूरीचे दर कमी नाहींत त्यामुळें येथें हिंदुस्थानी लोकांची बरीच वस्ती कायम होईल अशी शक्यता मला दिसत नाहीं. तथापि येथें मुलांच्या शिक्षणासाठीं मोठ्या पगारावर असलेले पेन्शनर रहातील, कांही व्यापारी रहातील व हे दोन वर्ग वाढले तर हिंदुस्थानी सुशिक्षित मध्यम वर्ग येथेंहि स्थापित होईल. अमेरिकेस गेलेल्या हिंदी लोकांनां सात वर्षें, दहा वर्षें, जसें रहावें लागतें तसें ज्यांनां येथें रहावें लागेल असा वर्ग थोडा आहे. बहुतेक हिंदी विद्यार्थ्यांचा वर्ग ब्यारिस्टरीसाठीं येथें येऊन डिप्लोमा घेऊन परत जाणारांचा असतो. त्यामुळें येथील हिंदी समाजामध्यें अभ्यासदृष्टीनें विविधता आढळत नाहीं. पोस्ट ग्राज्युएट अभ्यासाचें महत्त्व येथें अजून वाढलें नाहीं व संशोधन करणारा हिंदी वर्ग येथें फारच कमी आहे. शिवाय येथील हिंदी वर्ग इंग्लंडमधील नोकऱ्यांच्या स्पर्धेत न शिरतां हिंदुस्थानी नोकरींत शिरण्याची खटपट करीत असल्यामुळे आणि इंग्रजी पदवीस हिंदुस्थानांत भावहि बरा असल्यामुळें जगांतील आत्यंतिक स्पर्धेत प्रवेश करण्यासाठीं लागणारें उच्चत्व मिळविण्याकडे लागलेला हिंदी वर्ग सांपडत नाहीं. येथें असलेला हिंदी वर्ग हिंदुस्थानापासून फारसा तुटकलेला नसल्यामुळें या वर्गामध्यें हिंदुस्थानी द्वैतें तीव्रत्वानें कायम आहेत. माझें मत्तपयूरीशीं लग्न होणार अशी वदंता येथील हिंदु लोकांत पसरल्यामुळें मुंबईच्या ज्या कांहीं सारस्वत मंडळीच्या ओळखी झाल्या त्यांनीं जातकुळीच्या दृष्टीनें माझ्यामध्यें व मयूरीमध्यें असलेलें महदंतर मला सांगावयास कमी केलें नाहीं. जातिविशिष्ट भावना नसलेला ब्रह्मोंचा वर्ग येथें आहे पण तो थोडा आहे. आणि तो वर्ग कर्तृत्वानें निराळा दिसणारा खास नाहीं. कुचबिहारच्या राजघराण्याच्या आश्रयानें जीव धरून राहिलेला असा खुषमस्कऱ्यांचा वर्ग त्यांत आहे, तर ज्या कांहीं मंडळींच्या पुढें कोणतेंच मोठें ध्येय नाहीं अशा प्रकारचाहि आहे. येथें येणारे बहुतेक हिंदुस्थानी लोक पैसेवाल्या घराण्यांतील आहेत आणि हिंदुस्थानचा पैसा येथें खर्च करणारे आहेत. आपण "जंटलमेन" समजलें जावें एवढेंच ध्येय त्यांच्या डोळ्यासमोर आहे. कित्येकांचा इंग्लंडमध्यें येण्यांत एवढाच हेतु असतो कीं, ज्या इंग्रज अधिकाऱ्यांची ओळख करून घेणे हिंदुस्थानांत जड जातें, त्यांची ओळख करून घेणें इंग्लंडमध्यें सोपें व्हावें. येथें समतेची भावना नाही, त्यामुळें गरीब स्थितींतल्या हिंदुस्थानी लोकांबरोबर येथील श्रीमंत हिंदुस्थानी लोकांची समतेची वागणूक नाहीं, आणि तशीच पाश्चात्त्य लोक आपल्यापेक्षां मोठे नाहींत ही भावना देखील असावी तितकी तीव्र नाहीं. येथे थोडया दिवसांपुरत्या रहाणाऱ्या हिंदी लोकांशीं संबंध फार येतो आणि त्यामुळें येथील लोकांच्या मनावर हिंदी वातावरणाचें दडपण फार आहे. येथें आलेले बरेच सारस्वत विद्यार्थी मी त्यांच्या जातींतला आहे म्हणून मला सांगते झाले. त्यांनां मी त्यांच्यांतला म्हणून अभिमान वाटला, पण मला इतर मराठी बोलणाऱ्या हिंदी लोकांपेक्षां त्यांच्याविषयीं जास्त आपलेपणा मुळींच वाटला नाहीं " इत्यादि.

" रघुनंदनच्या पत्रांत आणखी कांहीं मजकूर आहे का? मयूरीविषयीं काय मजकूर आहे?" गंगाधरपंतानें विचारलें.

" मयूरीविषयीं तुमची बायको सांगेल त्यापेक्षां यांत कांहीं जास्त नाहीं."

" काय, मयूरीचें आणि रघूचें लग्न होणार आहे?" प्रो. गोगटे यांनी विचारलें.

"होय, तसाच कांहीं रंग दिसतो!"

"मला हें ऐकून आनंद झाला."

"तो कां?"

"राष्ट्ररूपी जी हिंदी जात तयार व्हावयाची या जातीनें अमुक व्यक्ति "अधर्मसंतति" आहे म्हणून त्यांस वगळतां कामा नये. ज्याप्रमाणें आपणांस जातीकडे पहावयाचें नाहीं त्याप्रमाणें कुळाकडेहि पहावयाचें नाहीं; व्यक्तीकडे पहावयाचें आहे. मयूरीसारखी सुंदर, चतुर आणि सुशिक्षित मुलगी ज्या सामाजिक निर्बंधामुळें वगळली जाते ते नियमच चुकले असे मी म्हणेन. जात, कुळी इत्यादि गोष्टी ज्या लोकांनां आपला मोठेपणा स्वतःच्या पराक्रमाने दाखविण्याची सवड नसते ती मंडळी जातीच्या उच्चतेवर स्वतःला खपवून घेतात. आणि जातीची उच्चता मनुष्य बोलूं लागला म्हणजे समाजांत वैयक्तिक उच्चतेचा ऱ्हास होत चालला आहे असें समजावें."

"प्रोफेसरसाहेब, तुम्ही तर कोलांटउडी मारली! कोंकणस्थांनीं देशस्थांबरोबर लग्नें करूं नयेत अशी तुमचीं एकाकाळीं मतें होतीं, आतां अकरमाशांनां देखील आपल्या हिंदी जातीत घ्यावें म्हणून आपण म्हणायला लागलां."

"तुमचा आक्षेप बरोबर आहे. माझे विचार अलीकडे बरेच बदलले आहेत. व तुम्ही दोघेजण याला कांहीं अंशीं कारण झाला आहांत! तुमच्या चारित्र्यावरून मी अर्वाचीन प्रवृत्ति काय आहे ते पाहतों, आणि त्या प्रवृत्तीवरून मी नियम बांधायाला लागतों."

"मला एक शंका येते ती बोलूंच कां?" गंगाधरपंतांनी विचारलें.

"खुशाल बोला!"

"रघुनंदन शेणवी; त्याने अकरमाशाच्या मुलीशीं लग्न केलें तर हरकत नाही पण कोंकणस्थानें मात्र तसें करूं नये असें तर आपलें मत नाहींना?" गंगाधरपंतानें प्रश्न केला.

"मुळींच नाहीं! मयूरीशीं जर विष्णुपंतानी लग्न केले असतें तर मला खरोखरच आनंद झाला असता!" प्रो. गोगटे उत्तरले.

"ही खरी खुरी गोष्ट?"

"होय, संशय कां? कल्पना करा की, ललिलेचें आणि विष्णुपंताचें लग्न झालें आणि मयूरीचें रघुनंदनशीं झालें म्हणजे मयूरी माझीच आप्त होणार नाहीं काय?"

"तुमच्यामध्यें फारच फरक पडला आहे!"

"होय, पूर्वी मी कोकणस्थ ब्राह्मण होतों, आतां हिंदी झालों आहे."

"मला वाटतें कीं, हा मयूरीचा विजय आहे, ती देखणी मुलगी आवडली व त्यामुळें ती वगळली जाऊं नये असे वाटले असें तर नाहींना?"

"तसेंहि असणे कांहीं अशक्य नाहीं. मनुष्याने केवळ तात्त्विक प्रश्न हातीं घेऊं नये. केस पुढे आली म्हणजे त्या केसपुरता निकाल द्यावा ही जी इंग्रज लोकांची व्यवहारनीति आहे तीत बरेंच तथ्य आहे.

---

## प्रकरण १८ वें.

## गजपतरायांची

## अमेरिकेंतील हिंदी मंडळीशीं ओळख.

पांचव्या अव्हेन्यूवर जें "रूझवेल्ट हॉटेल" म्हणून नवीन हॉटेल स्थापन झालें होतें. तेथें एक आठवडाभर लाला गजपतराय यांचा मुक्काम होता. १९२० च्या सप्टेंबरचे ते दिवस होते आणि त्यावेळेस थंडी नुकतीच पडावयास सुरवात झाली होती आणि झाडांची पाने गळून पडण्यापूर्वी जशी लाल होतात त्याप्रमाणे लाल झालीं होतीं आणि ती शोभा लाला गजपतराय यांस सुखद होत होती. निदाघकालाचा शेवट म्हणजे पार्कमध्यें तरुण आणि तरुणी यांचा विशेष उत्साहाचा

काल ! आपलें एकत्र फिरणे आतां बंद होत जाणार आणि लवकरच दिवस लहान होत जाणार म्हणून बर्फ पडण्याच्या अगोदरच्या दिवसांपैकी जितके दिवस उघड्यावर फिरतां येईल तितकें फिरावें, आणि सायंभोजनानंतरचा संधिप्रकाशाचा काल परस्पर विनोदनासाठीं जितका घराबाहेर घालवितां येईल तितका घालवावा म्हणून तरुण व तरुणी अधिकाधिक बाहेर पडूं लागलीं होतीं. शिवाय यावेळेस जरा ऊब यावी म्हणून दोघांनी फिरावयाला जातांनां जितके एकमेकांनां घट्ट धरून चालतां येईल तितकें चालावे हे थोडे बहुत "अवश्य" झालें होतें व त्यामुळे हा एकच विहाराचा काल स्त्रीपुरुषांस विशेष सुखकर होता. या सर्व प्रकारच्या देखाव्यांकडे पहात आणि पाश्चात्त्य सुधारणेला आपल्या ओळखीच्या मंडळीपाशीं शिव्या देत लाला गजपतराय संध्याकाळी पार्कमध्यें हिंडत असत. दिवसां ते लोकांच्याकडे जात, किंवा शहर पहाण्यांत घालवीत, आणि संध्याकाळीं ८ च्या नंतर आणि १०॥ पर्यंत ते भेटायला येणाऱ्या मंडळींनां भेटत असत, व तेथील कामात गुंतलेल्या हिंदी मंडळीनां भेटावयास येण्यास हीच वेळ सोईस्कर होती.

गजपतरायांचे स्वागत लंडनच्या व्हिक्टोरिया स्टेशनवर जसे झालें होते तसें न्यूयॉर्कच्या बंदरावर झालें नाहीं, कां की, लंडन येथें रिकामपणा पुष्कळ असलेला असा विद्यार्थ्यांचा वर्ग होता पण येथील हिंदुस्थानी वर्ग कामांत गुंतलेला. त्यामुळे त्यांचें बंदरावर स्वागत करावयास थोडीच मंडळी जमली पण संध्याकाळीं मात्र त्यांच्याकडे पुष्कळ जमली. बंदरावर फार थोडी मंडळी आली त्यावरून अमेरिकेच्या [illegible] भावना गजपतरायांस होण्यास सुरवात झाली. गजपतराय यांस त्यांचें स्वागत करण्यासाठीं किंवा अमेरिकेंतील वातावरणाची ओळख करून देण्यासाठीं किंवा त्यांच्या योजना ऐकून त्यांस मदत करण्यासाठीं जी अनेक मंडळी पहिल्या दिवसापासून जमत ती अनेक प्रकारची होती. त्यांचे संवाद रोज रात्रीं आठानंतर तीनचार तास होत, तथापि गजपतराय जें बोलतील ते ब्रह्मवाक्य किंवा शहाणपणाचा अर्क समजून त्यांची तारीफ करणारा वर्ग त्यांस अमेरिकेत कमीच भेटला. प्रत्येक मनुष्य कामधंद्यांत गढलेला, जगाचा कांहीं तरी अनुभव घेतलेला, आणि आपण कांहीं तरी विशिष्ट समाजाचे अवयव आहोंत आणि जुन्या जगांतील एका प्रसिद्ध व्यक्तीशी बोलत आहोंत अशा भावनेने वागणारा असा दिसला. अमेरिकेंतल्या हिंदी मंडळीत जे कांहीं मतभेद असतील किंवा भांडणे असतील तीं या परक्यास दिसूं नयेत अशी भावना कांहींच्या मनांत चोरून पण जिवंत असे, इतकी हिंदी–अमेरिकन भावना गजपतरायांस जागृत दिसली. कित्येक मंडळी या वृद्धाशी बोलतांनां आपण जणू काय अर्वाचीन जगाशी कमी ओळख असलेल्या साध्याभोळ्याशीं बोलत आहोंत अशी भावना दाखवीत आणि हें सर्व वातावरण पाहून आपण कांहीं निराळ्याच मानसिक परिस्थितीने व्याप्त असलेल्या हिंदी समाजांत आलो आहोंत असे गजपतरायांस वाटल्याशिवाय राहिले नाही.

गजपतरायांस सामान्यतः अनेक ठिकाणच्या हिंदुस्थानी मंडळीच्या व्यवहारक्षेत्राविषयी जिज्ञासा होती, व त्यांस अमेरिकन वातावरणांत वाढलेलें हिंदी समाजाचे रोपटे पाहून कौतुकामिश्रित आनंद झाला. पण कौतुकाचे कांहीं दिवस गेल्यानंतर ते अधिक चिकित्सक दृष्टीनें या समाजाकडे पाहूं लागले. त्या लोकांची एकमेकांनां सद्गृहस्थ म्हणजे जंटलमन म्हणण्याऐवजीं माणूस (म्यान) म्हणण्याची प्रवृत्ति त्यांस दिसली. तेथे फिटर, टर्नर म्हणून काम करीत असलेल्या हिंदु मंडळीची त्यांच्याशीं बरोबरीच्या नात्याने होणारी वागणूक पाहून त्यांस अचंबा वाटला, व थोडाबहुत रागहि आला. पण

तो त्यांस मनांतल्या मनांत ठेवावा लागला, कां कीं, ती मंडळी तेथील श्रीमंत हिंदी व्यापारी मंडळीशी तसेच वागत आणि ते व्यापारीहि त्यांच्याशीं तसेच वागत. इंग्रज किंवा अमेरिकन फिटर जर बरोबरीच्या नात्याने वागला तर त्याबद्दल गजपतराय यांस विषाद वाटत नसे, पण हिंदी कामकरी जर तसा वागला तर मात्र त्याचा त्यांस राग येई. गजपतरायांस थोडक्याच वेळांत समतेच्या भावनेनें भरलेल्या समाजांत वागणें म्हणजे काय हे समजूं लागलें. ही त्यांची अमेरिकेस दुसरी खेप होती पण यावेळेस त्यांस निराळेच अनुभव आले. याचें कारण यावेळेस विविध धद्यांत शिरलेला जो हिंदी मंडळींचा समाज त्यांस दिसला तो पूर्वी दिसला नव्हता.

गजपतरायांनां भेटायला बरीच मंडळी येत. डॉ. सरजामे, अशुतोष चौधरी, गगाधरपंत, व मि. कामत ही मंडळी भेटायला गेलीच. पण विलकाक्ससारखे हिंदुस्थानचे हितचिंतकहि भेटावयास गेले. कांहीं मंडळीची भेटावयाला जाण्यांत वृत्ति मात्र निराळी दिसून आली. गजपतरायापासून उपदेशामृताचे घुटके घेण्याची इच्छा असलेली मंडळी नव्हती असे नाही. पण गजपतराय लोकमतावर परिणाम करणारी व्यक्ति आहे तर आपण त्यांस आपले विचार सांगावेत या भावनेची मंडळी देखील त्यांत होतीच.

हिंदुस्थानांतील ब्रिटिश लोकांचे राज्य घालवून देण्यासाठी काय केलें पाहिजे, आणि ब्रिटिश राज्याच्या अस्तित्वास लोकमताचा पाठिंबा मिळूं नये यासाठीं तुम्हीं हिंदुस्थानांत व येथें लोकमत जागृत केलें पाहिजे म्हणून जेव्हां मंडळी सांगत तेव्हां गजपतराय त्यांस म्हणत कीं मी कांग्रेसचा प्रतिनिधि म्हणून येथे आलो आहे, तर मला कांग्रेसने जो कार्यक्रम सांगितला आहे त्याच्यापलीकडे येथे कांही करतां येणार नाहीं. यावेळीं गजपतरायांची स्थिति जरा विलक्षण झाली होती. अमेरिकेंत कित्येक लोक त्यांनां विचारीत कीं तुम्हांस ब्रिटिश राज्य हवें आहे काय? तर त्या प्रश्नाला "हवे आहे" असे उत्तर देणे त्यांस नामर्दपणाचें वाटे. "नको आहे" असें म्हणावे तर "तुम्हीं आमच्या गदर चळवळीला कां मिळत नाहीं" असें लोक विचारणार! "मी हिंदुस्थानांत परत जाणार आणि तेथे माझे डोकें शाबूत राहिलें पाहिजे" असें आपण जर सांगावयाला लागलो तर "देशहितासाठीं स्वार्थत्याग करा" इत्यादि गोष्टींचे पुराण कसें गावयास सांपडणार? देशासाठीं आत्यंतिक स्वार्थत्याग केलेली तरुण मंडळी तेथें होती, तर त्यांच्यापुढे आपला स्वार्थत्याग फिका पडणार इत्यादि कल्पना त्यांच्या मनांत उभ्या राहिल्या. तेथे कॉंग्रेसपक्षाचे मित्र अनेक होते, नव्हते असें नाहीं. पण त्यांस "कॉंग्रेस तुमच्याकरतां काय करूं शकेल" असे लालाजींनीं विचारलें तर तेहि "कांही नाही" असे सांगत. ते म्हणत की "कॉंग्रेसच्या चळवळीला जो आम्ही टेकू देतो तो आमच्या फायद्यासाठीं नव्हे तर तुमच्या म्हणण्यास जोर देण्यासाठीं आणि तुम्ही हिंदुस्थानी लोकमताचे प्रतिनिधि आहांत म्हणून तुमच्या मतास अधिक मान मिळावा एवढयासाठीच." गजपतरायांनीं त्यांस पुढे असें विचारलें की "तुमच्या चळवळीस आम्ही मदत ती कशी काय करावी?" ते म्हणाले कीं "हिंदुस्थानच्या कॉंग्रेसचें जें म्हणणें कीं हिंदुस्थानला स्वराज्य मिळावें ते येथील सुशिक्षित वर्गापुढे म्हणजे युनिव्हर्सिटयांतून मांडा. पण त्याबरोबर लोकांनां असें भासलें पाहिजे कीं सध्यांच्या इंग्रज अधिकाऱ्यांपेक्षां तुमच्या हातीं राज्यकारभार आला तर लोकांचे कल्याण जास्त होईल. लोककल्याणासाठीं जे तुमचे खासगी प्रयत्न झाले त्या प्रयत्नांस सरकारने टेकू कसा दिला नाहीं, उलट विरोध कसा केला हें लोकांस समजावून द्या. लोकांचे उद्योगधंदे चालण्याच्या कामांत सरकार कसें आडवे येते

हें समजून द्या. या गोष्टी जर आम्ही लोकांस सांगू लागलों तर त्या सांगतांना आम्हांस सायास फार पडतात, आमची पुष्कळदां माहिती अपूर्ण व सदोष असते. तेव्हां एखादा मनुष्य चटकन चूक काढतो. सरकार देशास कृषिप्रधान मुद्दाम ठेवीत आहे असे आम्ही म्हटले तर लोक विचारतात की "कापूस पिकवण्यांत फायदा जास्त आहे कीं कापसाचे कापड बनविण्यांत फायदा जास्त आहे? गेल्या पन्नास वर्षांत कापसाची किंमत जितकी वाढली त्या मानानें कापडाची किंमत वाढली काय?" तसेंच "देशव्यवस्था जर तुमच्या हातीं असती, तर इंग्रजी व्यवस्था असतां हिंदुस्थान-सरकारला ज्या भावानें कर्ज मिळते त्या भावानें तुम्हाला मिळालें असतें का?" असले प्रश्न विचारतात. "येथें युनिव्हर्सिटयांतून अर्थशास्त्रज्ञ प्रोफेसर आहेत ते पुष्कळदां आमचीं व्याख्यानें झाल्यानंतर त्याचा परिणाम बिघडवितात."

गजपतरायांस अर्थात या चळवळीचे जितके सोपे स्वरूप हिंदुस्थानांत वाटले किंवा इंग्लंडमध्ये असतांनां वाटत होते तितके ते सोपे नाहीं असें लवकरच कळून आले. आपण व्याख्यान द्यावें, त्यांत कांहीं माहिती देतांना चुका कराव्यात व त्यामुळें लोकांवर परिणाम मात्र वाईट नाहीं का होणार इत्यादि विचार त्यांच्या मनांत येत. जर लोकांस आपले अज्ञान दिसून आले तर इंग्रज लोक आपल्या पुढाऱ्यांच्या हाती राज्यकारभार देत नाहींत याचे समर्थनच होईल असें त्यांस वाटे.

गजपतरायांस असेंहि वाटले कीं, येथे चळवळ करावयाची म्हणजे येथील कांही अर्थशास्त्रज्ञ हिंदी मंडळींची मदत घेतल्याशिवाय व्याख्यानास धजणें सोपे होणार नाहीं. गुंतागुंतीचे अर्थशास्त्रीय प्रश्न समजून घेण्याची व अर्थशास्त्रीय प्रश्नांवर विचार करण्याची तयारी नव्हती, किंबहुना तेवढी उमेदहि नव्हती. या प्रश्नांवर आपणांस माहिती देऊन आपले ब्रीफ तयार करण्यास कोणी तरी चांगला अर्थशास्त्री पकडावा असें त्यांच्या मनांत आले, पण असे केल्यानें आपले हिंदी लोकांवरचें वजन जाईल हीहि त्यांनां कल्पना आली. तथापि अर्थशास्त्री म्हणून चांगला कोणी मदतनीस मिळेल काय म्हणून त्यांनीं विचारलें तेव्हां लोकांनीं रघुनदन कामतचें नांव सुचविलें. तेव्हां "रघुनंदन कामत कोण? एका देखण्या हिंदु डॉक्करणीच्या बरोबर कोर्टशिप करणारा हिंदी तरुण म्हणून लंडनच्या हिंदी मंडळींत प्रसिद्ध होता तो काय?" म्हणून लालाजींनीं विचारलें. मंडळी हंसली पण तोच म्हणून त्यांनीं सांगितलें तेव्हां ते म्हणाले तो पोरगा काय मदत करणार व तो कोंठे आहे? तेव्हां "तो हिंदुस्थानांत गेला आहे व आतां तो आक्टोबरमध्ये परत येईल असे लोकांनीं सांगितले. तेव्हां दुसरा कोणी मदतीला मिळण्याजोगा असेल तर कळवा, म्हणून त्यांस सांगितलें व स्वतः त्यांनीं चौकशी चालविली

गजपतरायांनी एके दिवशीं आपली सुशिक्षित मंडळी येथें काय करतात म्हणून चौकशी चालविली. ते म्हणाले "या देशांत जर वकिली करण्याची आपल्या लोकांनां मोकळीक ठेवली नाही व डॉक्टरीचें स्टेट लायसेन्स मिळावयास नागरिक असावें लागतें असा बऱ्याच संस्थानांत नियम आहे तर मग येथे सुशिक्षित मंडळी करतात तरी काय?"

"येथे कांहीं मंडळी वर्तमानपत्रांच्या संपादकीय खात्यांत नोकर किंवा खासगी लेखक म्हणून आहेत, कांहीं कारखान्यांत केमिस्ट म्हणून आहेत, कांहीं परदेशी व्यापार करणाऱ्या कंपन्यांत कारकून म्हणून आहेत व कांहीं स्वतःच व्यापारी आहेत आणि कांहीं युनिव्हर्सिटयांत अध्यापक आहेत."

"व्यापारी म्हणजे काय, अमेरिकेंतला पक्का माल हिंदुस्थानास विकून हिंदुस्थानांतला कच्चा माल येथे आणणारेच नाहीं काय?"

"होय."

वरील उत्तर ऐकून नाखुशीच्या दर्शक सुरकुत्या गजतपरायांच्या नाकाच्या दोन्हीं बाजूंस दिसूं लागल्या!

त्यांच्या सुरकुत्या पाहून एक व्यापारी म्हणाला: 'येथे हिंदुस्थानी माल आणून विकावा असे पुष्कळांच्या मनांत येतें पण अमेरिकेस ज्याची गरज आहे असा माल हिंदुस्थानांत थोडाच होतो! जो माल हिंदुस्थानांत होतो तोच विकायचा म्हटला तरीहि अडचणी आहेत. हिंदुस्थानी माल नियमानें वेळेवर लागेल तितका येत नाहीं आणि आपण माल एकदां मागविला आणि खपविला आणि पुन्हां मागणी केली म्हणजे त्याची क्वालिटी बेघडलीच असा पुष्कळांनां अनुभव आला आहे."

"माझे एवढेच म्हणणे आहे कीं हिंदुस्थानांत माल पाठविणें म्हणजे अमेरिकन मालाची दलाली करणे आहे, व हिंदुस्थानच्या सांपत्तिक स्थितीस धोका देणे आहे."

"मग आम्हीं काय करावे?"

"हिंदुस्थानी मालाचा खप वाढेल असे करावे."

"त्यांत किफायत होत नाही."

"मला हीच वृत्ति आवडत नाहीं! व्यापारांत पडणारानें केवळ पैशाकडे लक्ष देऊन उपयोगी नाहीं."

"तुम्ही हिंदुस्थानी माल खपवावा असें म्हणतां ते हिंदुस्थानी मंडळींनां पैसे मिळावे म्हणून, कीं येथील लोकांच्या नैतिक उन्नतीसाठीं, का हिंदुस्थानी लोकांच्याच अध्यात्मिक उन्नतीसाठीं."

लाला गजपतराय हें वाक्य बोलणाराकडे जरा रोषपूर्वक दृष्टीनें पाहूं लागले. आणि आपणांस या तऱ्हेनें उलट बोलणारा हा आहे तरी कोण असा अर्थ त्या दृष्टींत भरला होता. वरील प्रश्न विचारणारा गंगाधरपंत होता.

गजपतराय यांनां आपण वादविवादांत पडलो तर आपण जरा हास्यस्पद होऊं अशी भीति वाटून कीं काय त्यांनीं बोलण्याचा रोंख बदलला, व म्हणाले. "माझा मुख्य उद्देश हा होता की हिंदुस्थानचा माल येथें खपूं नये यासाठीं कांहीं विशेष गोष्टी येथल्या सरकारने केल्या आहेत काय याची मला चौकशी करावयाची होती. हिंदुस्थानी माल खपण्यास दुसऱ्या कांहीं अडचणी आहेत काय?"

"एक अडचण अशी कीं, येथील मोठाले व्यापारी आणि कारखानदार सहा महिन्यांची उधारी देऊं शकतात. आणि हिंदुस्थानांतले इकडे खपण्यासारख्या वस्तूचे कारखाने इतके लहान आहेत की, त्यांस उधारी देखील देतां येणार नाहीं."

"मग हिंदुस्थानी माल येथे खपण्यासाठीं काय केले पाहिजे?"

"कोणत्या तरी कारखान्यांत येथे काम केलेल्या मंडळींनीं हिंदुस्थानांत जाऊन सर्वच उत्पादन आणि व्यापार सुधारला पाहिजे. त्याशिवाय हिंदुस्थानी पक्का माल येथे येण्याचा संभव नाहीं."

"कां बरे?"

"प्रत्येक धंद्यांत माल एकसारखा निघणें, कारखाना एकसारखा चालणें; मालास गिऱ्हाईकी एकसारखी जागृत ठेवणे, या सर्व क्रिया करण्यासाठीं आणि त्या सर्व काटकसरीने होण्यासाठीं अगदीं अर्वाचीन तऱ्हेचीं यंत्रें वापरणें या गोष्टी येथील अनुभवाशिवाय चांगल्या तऱ्हेने व्हावयाच्या नाहींत असें वाटते."

"या गोष्टी तुम्ही आतां केल्या पाहिजेत."

"तुम्ही परत हिंदुस्थानत जातच आहांत तर तुम्हींच या गोष्टी कराव्यात. येथें आम्हांला काम आहे."

"मला हे शब्द ऐकून फार वाईट वाटतें, तुम्ही हिंदुस्थानची सुधारणा करण्याचें कर्तव्य विसरून जाऊन येथेंच नोकरी किंवा धंदा करीत राहिलात!"

" आम्ही बरीच मंडळी तुम्ही म्हणतां तसे आलो आहो खरे. पण आमची आज जास्त कर-ण्याची ताकदच नाहीं ! "

" ती कां? "

"आमच्यापाशीं हिंदुस्थानांतील उद्योग सुधा-रण्यासाठी पैसा नाहीं. आमची जी मंडळी हिंदुस्था-नांत गेली त्यांपैकी कांहीं तेथे भांडवलच मिळत नाहीं म्हणून परत आली आहेत, व हिंदुस्थानांतल्या पुढाऱ्यांनीं त्यांस कांहीच उत्तेजन दिले नाही म्हणून ते सांगतात. बरे, अमेरिकन भांडवल-वाल्यांचे हिंदुस्थानांत कारखाना काढण्यासाठी पैसा लावण्यास मन वळवावें म्हटलें तर तुम्ही पुन्हां परक्या भांडवलवाल्यांचे कारखाने म्हणून ओरड करणार. !"

" ही ओरड तुम्हास प्रतिबंधक होते काय ? "

" मुळीच नाहीं, कां कीं हिंदुस्थानांत कार-खाना काढला असतां तो कसा फायदेशीर पडेल याची आम्हाला येथें माहितीच देतां येणार नाही. फायदेशीर पडणार म्हणून खात्री असती तर त्या ओरडीला आम्ही मुळींच जुमानले नसतें, कारण ही परक्या भांडवलाविरुद्ध ओरड म्हणजे अज्ञानी लोकांची ओरड आहे. "

" परक्या भांडवलाविरुद्ध ओरड करणारे हिंदुस्थानांतील पुढारी अज्ञानी व तुम्ही स्वतःस सज्ञानी समजतां !" लाला गजपतराय रागावून बोलले.

"आम्ही व्यक्तींची तुलना करीत नाही. विशिष्ट मत सज्ञानी मत आहे कीं अज्ञानी मत आहे याबि-षयींच बोललों. आमची खरोखरच अशी सम-जूत आहे कीं, परकीय भांडवल हिंदुस्थानांत अधिकाधिक गेलें तर त्यांत हिंदुस्थानचा फायदाच आहे."

"तुमचें हें मत अगदीं चूक आहे."

इतक्यांत डॉ. सरंजामे पुढें होऊन म्हणाले "या प्रकारचा वादविवाद सध्यां करून आम्ही आपल्या स्वागतानंदाचा विघाड करूं इच्छीत नाही. मी आज आलों आहे तो विशेषेकरून मिस्तर आणि मिसेस कामत यांचें आपणांस सह भोजनासाठीं आमंत्रण देण्यास आलों आहे. शिवाय आमचे मित्र मि. गंगाधर परभणीकर हेहि आहेत तर शक्य असल्यास मिसेस परभणीकर यांचें आदरातिथ्य स्वीकारण्यास आपणांस सवड असेल तर तेहि आमंत्रण करू इच्छितात, नाही तर तुम्ही मि. कामत यांच्याकडे जेव्हां जाल तेव्हां त्याहि तेथे येतील.म्हणून त्यांनी निरोप कळविला आहे."

"मला मिसेस परभणीकर याच्याकडे मि.कामत यांच्या अगोदर जायची इच्छा असली तर?"

"त्यालाहि हरकत नाहीं. पण मि. कामत हे न्यूयॉर्कच्या मंडळींत सर्वांत वयाने वडील आहेत त्यांच्याकडे आपला सत्कार अगोदर व्हावा!"

" बरे, तुम्ही सांगाल तसे—त्यांचा पत्ता य पत्रावर आहेच."

---

## प्रकरण १९ वें.

## कामत यांच्या घरीं.

मि. कामत यांच्या घरचे स्वागत लाला गज पतराय यांस बरेंच आवडलें. जेवण जरी अमेरि कन पद्धतीने म्हणजे टेबलावरच झालें, तरी जेवण मराठी आंग्लोइंडियन पद्धतींचें मिश्रण करून तयार केले होतें. दहीं व ताक हीं जेव णांत असल्यामुळे त्यास विशेषच खुमारी आली होती. व भोजनोत्तर मुखशुद्धीसाठीं मसाल्याची सुपारी होती. जेवणांत पुष्कळसे खोबरें घातलेली अनेक खाद्ये, चोष्यें व भोज्ये होतीं; व शांता बाईनीं दुसऱ्या अनेक बाबतींत हिंदीपणा ठेवला होता, जेवणाला तीन हिंदी स्त्रिया असल्यामुळे लालाजींनां जेवण अधिक गोड लागलें असेल यांत शंका नाहीं. जेवतांना मराठी रिवाजासंबंधाने

बोलणीं निघालीं, तेव्हां स्त्रिया व पुरुष जेवावयास एकत्र बसतात काय म्हणून लालाजींनीं प्रश्न केला, आणि त्याला "नाहीं हो, पुरुष जेवीत असतां आम्हांला वाढावे लागते" असें त्यांनीं उत्तर दिलें. त्याच्यानंतर लालाजी म्हणाले कीं "उत्तर हिंदुस्थानात स्त्रियांनां वाढावे लागत नाहीं हें खरें, पण त्याचें कारण स्त्रियांनां बरोबरीनें पुरुष वागवितात असे नाही, तर बायकांचें दर्शन पाहुण्यांनां झाले तर, मोठी पंचाईत होईल म्हणून!" जेवतांनां गंगाधरपंत म्हणाले अलीकडे बायकांनीं वाढावे हा प्रकार महाराष्ट्रांतहि कमी होत आहे. आणि याचें कारण पडदा जरी नाही तरी आमच्या बायका अलीकडे फार नाजूक होऊं लागल्या हें आहे." त्या वेळेस रुक्मिणी एकदम म्हणाली, "कधीं हो मी वाढायचे नाकबूल केलें आहे! तुम्ही असें बोलूं लागला म्हणजे लालाजींनां वाटेल की मी फार आळशी आहें."तेव्हां गंगाधरपंत म्हणाले कीं, "मी आपल्या घरची रीत बोलत नाहीं. पण पुष्कळ ठिकाणची अशी स्थिति आहे. प्रो. गोगट्यांच्या घरीं मी एकदां श्रावणीला गेलो होतो, आणि श्रावणीनंतर प्रो. साहेबांनीं मला जेवायला ठेवून घेतलें. त्या वेळेस इंदिराबाई कांहीं वाढायला आल्या नाहींत. मी त्यांनां कधीं पाहिलें नव्हते, तेव्हां मी म्हटले कीं, या वेळेस त्या सहज दृष्टीस पडतील. पण तसें कांहीं झालें नाहीं! आणि पूर्वीची जुनी रीत मोडत चालली म्हणून प्रो. गोगट्यांचें अश्रू गाळणें मात्र चाललेंच असतें. पूर्वीची रीत अशी होती कीं कोणीहि मनुष्य कितीहि श्रीमंत असो, त्याची बायको जेवायला सुरवात करण्यास परवानगी देणारी अन्नशुद्धि म्हणजे तूप वाढायला पुढें आलीच पाहिजे. पेशव्यांच्या घराण्यांत देखील ही चाल होती म्हणतात! आणि बायकांनां देखील आपण स्वत: जाऊन वाढण्याची हौस होती. आतां काय! सर्व कांहीं काम करण्याला धटिंगण पुरुषच!" या वेळेस बाबासाहेब म्हणाले कीं, "बायकांनीं वाढायला यायला चुकवावयाची रीत मुंबईला शेणव्यांत तर फारच वाढली आहे. जेवायला कोंकणस्थ, देशस्थ वगैरे ब्राह्मण येतात, म्हणून स्वैपाकी त्यांच्यांतलाच पाहिजे म्हणून आमच्या बायकांची समारंभांतले वाढणें चुकविण्यास जी सुरवात झाली ती झालीच! बायकांनीं वाढणे म्हणजे अगदीं अशिष्ट होऊन बसलें. पण खरोखर सांगायचें म्हणजे देखण्या, आणि चांगला सुंदर पोषाख करणाऱ्या बायका वाढायला असल्या म्हणजे जेवणहि अधिक चांगले लागतें!"

बाबांसारख्या पोक्त आणि सभ्यतेच्या व शिष्टतेच्या गुणांनी युक्त अशा मनुष्याच्या तोंडून वरील वाक्य ऐकून सर्वच मंडळी हंसायला लागली. तेव्हां मध्येंच शांताबाई म्हणाल्या की "मी पुष्कळदां यांचें पाहिलें. रेस्टरंटमध्यें आम्ही जेवायला गेलों म्हणजे ज्या टेबलाच्या वांट्याला देखणी मुलगी आली असेल त्याच टेबलाशीं जाऊन हे बसतात, आणि कोणती मुलगी कोणत्या टेबलाच्या वांट्याला आली आहे हे चांगले पहाण्यासाठीं रेस्टरंटमध्यें शिरल्यावर ओव्हरकोट काढायला दोनतीन मिनिटें लावतात." तेव्हां गोविंदराव म्हणाले कीं "तुझ्या जरी हे लक्षांत आले असले तरी हे तूं सगळ्या मंडळींच्या देखत बोलायचें नाहीस. नवऱ्याचीं गुह्यें मनांत ठेवायचीं कीं सगळ्या लोकांत सांगत सुटायचीं!"

जेवतां जेवतां लालाजींनां ही एक गोष्ट पटली की हिंदु मंडळींनीं येथें राहिलें तर पाहिजेच. नाहीं तर त्यांच्यासारख्या आल्यागेल्या प्रवाशाला असें रुचकर जेवण मिळालें नसते. कांहीं मंडळींनीं येथें राहिलें पाहिजे हें आपणास पटतें ही गोष्ट लालाजीनीं प्रांजलपणें कबूलहि केली.

हिंदी मंडळीसंबंधानें लोकमत कसे काय आहे म्हणून लालाजींनीं प्रश्न केला. तेव्हां गोविंदरावांनीं सांगितलें कीं "आपण हिंदी लोक इतके थोडे आहोंत कीं, आपल्याविषयीं त्यांचें मत कांहींच

नाहीं. आणि हिंदुस्थान हा देश जगांत आहे अशी त्यांस आठवणच नाही असे म्हटले तरी चालेल." लालाजीनां हें ऐकल्यानतर "हें तरुण मंडळीनीं लक्षांत ठेवले पाहिजे" इत्यादि गोष्टी बोलून तरुण मंडळींनां उपदेश करण्याची हुक्की आली. आणि ते पाहून गंगाधरपंत हसले व हें पाहून डॉक्टर सरंजामे देखील हंसले व पुढे लालाजींच्याकडे वळून म्हणाले कीं, " जास्त वय असण्यांत एक फायदा आहे.प्रत्येक पिढीनें आपला भार तरुण मंडळी पुढे करून त्यांच्यावर टाकावा आणि आपण मोकळे व्हावें. तरुण मंडळींचीं कर्तव्यें त्यांनां सांगावीं आणि आपण स्वत: गोष्ट आपल्या अंगाबाहेर टाकावी ही हिंदुस्थानी परपराच आहे." डॉ. सरंजामे हें वाक्य स्मितयुक्त बोलले खरे पण हंसत हंसत जाऊन तोंडांत चपराक मारण्याची भावना त्यांच्या तोंडावर दिसत होती.

बाबासाहेब कामत यांनी ते बोलणे वाढेल म्हणून आपल्या भाषणाचा विषय बदलला. ते म्हणाले, "कायहो, पंजाबकडे तुम्हां मंडळीचे जे उपाध्याय सारस्वत बाह्मण आहेत ते कसे काय रहातात? ते आमच्या सारखेच आहेत काय; त्यांच्यांत व आमच्यांत कांहीं साम्य आहे काय ?" असे बोलून त्यांनीं विषय बदलला खरा, पण त्यांत असें झालें कीं, बारी आणि बनजाही म्हणून जे त्यांच्यांत भेद आहेत त्यांत एक भेद आपणांस दुसऱ्यापेक्षां मोठा कसा समजतो आणि हलक्या भेदाची मुलगी बराचसा हुंडा घेऊन ते कशी करतात, इत्यादि गोष्टींवर बोलणीं झालीं. बोलतां बोलतां पंजाबवर बोलणें निघाले; तेव्हां पंजाबला हिंदु नांव "पंचांबुदेश" असें आहे. खरें जुनें नांव तेच आहे इत्यादि गोष्टी गजपतराय बोलले, तेव्हां "असे नांव कोणत्या जुन्या ग्रंथांत आलें आहे?" म्हणून डॉ. सरंजाम्यांनीं प्रश्न केला; तेव्हां त्यावर "तुम्ही सर्व संस्कृत ग्रंथ वाचले आहेत काय?" म्हणून गजपतरायांनीं उलट प्रश्न केला. तेव्हां डॉ. सरंजामे "माझ्या प्रश्नाचे हें उत्तर नाही" असें म्हणाले. बाबासाहेबांनी पुन्हां विषय बदलला, ते म्हणाले की, "पंजाबचे लोक उच असतात याचे कारण काय? तेथे उंच लोकांनीं येऊन वसाहत केली हे कारण आहे कीं, तेथल्या हवेमुळेंच मनुष्य उंच बनतो." या प्रश्नाचें लालाजीनीं कांही तरी उत्तर दिले; तेव्हां त्या उत्तरावर पुन्हां वाद उत्पन्न होऊं नये म्हणून त्यांनीं पुन्हा विचारले की, "काश्मीरला जाण्याचा रस्ता कसा आहे, तुम्हीं काश्मीरला गेला होतां काय ?" इत्यादि प्रश्न विचारून डॉ. सरंजाम्यांशीं पुन्हां भांडण उत्पन्न होऊं न देतां भोजनविधि पार पाडला.

भोजनोत्तर पुरुष मंडळी धूम्रपान करण्यासाठीं पारलरमध्ये जाऊन बसली व कांही वेळाने गजपतरायांनीं सर्व मंडळींचा निरोप घेतला, गजपतराय जेवून गेल्यानंतर थोड्या वेळानें डॉ. सरंजामेहि गेले. मात्र जातांनां लीलेचा निरोप घ्यावयास ते विसरले नाहींत. पण हा निरोप घेण्याचा विधि घरांतल्या "पोर्च" वर पंधरा मिनिटे चालला होता. आणि त्यानंतर आनंदयुक्त मुद्रेनें लीला परत आली. रात्र बरीच झाली म्हणून गंगाधरपंत आणि रुक्मिणी यांनी तेथेच रात्र घालवावी आणि सकाळीं ब्रेकफास्ट घेऊन जावे म्हणून शांताबाईनीं केलेली सूचना सर्वांनां पसंत पडली. गोविंदराव आणि गंगाधरपंत भोजनोत्तर पारलर मध्यें धूम्रपान करीत गप्पा मारीत होते, आणि लीला, रुक्मिणी आणि शांताबाई या आंत होत्या. बायकाची जेवणखोलींत बोलणीं चाललीं होतीं आणि बोलणें सुरळीत चालण्यासाठीं शांताबाईनीं खारवलेले भुईमुगाचे दाणे टेबलावर ठेवले होते. बायकांची पुरुषमंडळीवर टीका चालली होती. "डॉ.सरंजामे बोलतांनां बरेच गरम होतात नाहीं?" रुक्मिणी म्हणाली.

" हो, ही गोष्ट मी त्यांच्या कितीदां तरी लक्षांत आणून दिली पण त्यांच्यांत बदल होतच नाहीं! " लीला म्हणाली.

"ते वर्गातल्या विद्यार्थ्यांवर असेच गरम होतात काय?" शांताबाईनीं विचारले.

"नाहीं, ते वर्गात कधीं रागावलेले दिसले नाहींत. उलट विद्यार्थ्यांत त्यांचा शांतपणाबद्दल फार लौकिक आहे."

"त्यांच्या वादविवादांत गरम होण्याबद्दल मी "त्यांच्या" तोंडूनहि कधीं ऐकले नाही." रुक्मिणी म्हणाली.

" डॉक्टर सरंजाम्यांच्या कांही रागावण्याच्या आख्यायिका कोलंबियांत प्रसिद्ध आहेत. केमिकल सोसायटीत एकदां ते आपल्या प्रयोगांवर निबंध वाचीत होते, तेव्हां कोणी त्यांनां वेडेवांकडे प्रश्न केले, तेव्हां ते गरम झाले आणि अमुक अमुक गोष्टीची मूलतत्त्वे समजणारा देखील असा प्रश्न करणार नाही असे ते म्हणाले. तेव्हां त्यांच्यांकडे सर्व मंडळी विस्मययुक्त मुद्रेने पाहूं लागली आणि त्यांचा निबंध संपल्यानंतर प्रो. स्पोर्टस् त्यांनां म्हणाले "अरे, तूं विनाकारण आपल्याला शत्रु निर्माण करतोस! तुला जे सांगावयाचे ते तुला निराळ्या भाषेत सांगतां आले असते. मी जें सांगितले त्यासंबंधानें या प्रश्नाचा अभ्यास केलेल्या लोकांमध्ये मतभेद कधीच नव्हता असे तू सांगायचें होतेंस" असें ते म्हणाले.

"डॉ. सरजाम यांचा स्वभाव सुधारण्याचे कार्य कोण्या बाईवर पडेल कोण जाणे!" शांताबाई म्हणाल्या.

"बाबांचा स्वभाव तूं कितपत सुधारलास!"

"तुझे बाबाहि चिडखोर होते. ऑफीसमध्यें कधीं कांहीं बिघडलें, आणि त्यांनीं मनांत योजिलेला फायदा कारकुनाच्या दुर्लक्षामुळें बिघडला, किंवा त्यानें कांहीं घोंटाळा करून नुकसान केलें म्हणजे ते खूप संतापत असत. कधीं एका मनुष्याला लिहिलेले पत्र दुसऱ्याच्याच पाकिटांत जायचें, किंवा कधीं एक माल गिऱ्हाइकानें मागितला म्हणजे भलताच पाठवायचा; असें झाले म्हणजे तुझ्या बाबांनां असें होत असें की या कारकुनाला काय शिक्षा करूं. असें कांहीं झालें म्हणजे त्यांच्या मनांतली अस्वस्थता ऑफीसांतच रहात नसे. घरीं देखील त्यांनां सर्व प्रकारच्या चुका दिसत!"

"डॉ. सरंजामे वादांत सांपडले म्हणजेच इतके रागीट होतात काय?" रुक्मिणीनें विचारलें.

"मी त्यांचे अस पाहिले आहे कीं, जर कोणी शिष्टपणा दाखवायला लागला तर मात्र त्याच्या विषयी त्यांचे मत वाईट होतें आणि मग त्याचें बोलणे ते तपासायला लागतात दुसऱ्या कोणावर रागावत नाहींत" लीला म्हणाली.

"डॉ. सरजामे याची तुम्ही इतकी कां हो कड घेत असतां?" रुक्मिणीनें विचारले.

शांताबाई हसू लागल्या.

---

## प्रकरण २० वें

## रघुनंदनाचें पत्र.

गजपतरायांनां दिलेल्या जेवणानंतर मि. कामत यांच्या घरांतील पुढची महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे रघुनंदनांच्या लग्नाची बातमी होय. लग्नाची बातमी देणारें पत्र लीलेस आले. ते पत्र पॅरिस येथून लिहिलेले होते. त्या पत्रांत त्यानें लिहिलें होतें की बाबा आणि आई यांस आवडेल कीं नाहीं कोण जाणें पण माझें मयूरीशीं लग्न एक ऑगस्टला झाले ही गोष्ट कबूल केली पाहिजे लग्न रजिस्ट्रारनें लावलें आणि मि. गोळवलकर यांनीं नंतर स्वत: उपाध्याय बनून हिंदु पद्धतीनेंहि लग्न लावले. लग्नानतर दोन दिवसांनींच आम्ही इंग्लंड सोडलें, काल पॅरिसला आलों आणि ४ दिवसांनीं

ब्रिंडिसीहून हिंदुस्थानला निघण्यासाठी बोटीवर चढणार! मयूरी मला किती आवडत असे हें तुला ठाऊक असेलच, पण त्यावेळेस मी तिला आवडत होतों कीं नाहीं यासंबंघानें शंकाच होती. आज ती शंका दूर झाली आहे. आणि आज मयूरी मला पूर्वीच्यापेक्षां किती तरी पटीने प्रिय झाली आहे. दोन आयुष्यें एकत्र होत आहेत आणि आपल्याला आपल्या जन्मभर करावयाच्या कार्यक्रमांत अत्यंत प्रेमयुक्त सहकार्य करण्यास एक स्त्री मिळाली याचा अनुभव ज्यास असेल त्यासच माझ्या आनंदाची कल्पना करतां येईल वगैरे नवपरिणीत तरुण लिहितो त्या प्रकारचा मजकूर पत्रांत होता. तसेच आमचे लग्न झालें तरी मी हिंदुस्थानांत रहावयास जात नाही. आज केवळ महिना दीड महिना बायकोबरोबर घालवितां यावा एवढयाच उद्देशाने जात आहे. हिंदुस्थानांत मी पंधरावीस दिवस राहीन आणि आक्टोबरमध्ये परत येईन. मी आपल्या प्रोफेसरला पत्र लिहिलें आहे कीं, हिंदुस्थानला मी जात आहे आणि परत यावयास मला दहा पंधरा दिवस उशीर लागेल. म्हणजे आक्टोबरच्या पंधरा तारखेच्या सुमारास मी अमेरिकेस परत येईन. जर मला प्रोफेसरनीं परवानगी दिली तर आक्टोबर १५ पर्यंत हिंदुस्थानांत राहून नोव्हेंबर १५ पर्यंत परत येईन. मला हिंदुस्थान पहावयाचेंच होते आणि आतां तेथें जाण्याला कांहीं तरी निश्चित हेतु उत्पन्न झाला आहे. मी परत येतांनां एकटाच येईन असें वाटतें; कां कीं, मयूरीस एकदम अमेरिकेस येतां येणार नाहीं. मयूरी फार पैसेवाली आहे. तिची मालमत्ता दहापधरा लाखांच्यावर असल्यामुळें आणि त्यांत स्थावर इस्टेट बरीच मोठी असल्यामुळें तिला एकदम येता येणार नाही. इस्टेट विकायची झाली तरी एकदम विकतां येत नाहीं. त्यामुळें ती हिंदुस्थानातच कांहीं दिवस राहील. तिची प्राक्टीसहि चांगली जमली आहे. ती एकदम आपलें आडनांव टाकून देणार नाही. मिसेस रायतुरकर–कामन असें आडनांव ती कांहीं दिवस लावणार आहे. आणि पुढें हळूच रायतुरकर हें आडनांव गाळणार आहे.....इ.

रघुनदनाचे पत्र आलें त्याबरोबर मयूरीचेंहि पत्र आलें. त्या पत्रांत मयूरीने लीलेस लवकर लग्न करून घेण्यास उपदेश केला होता. वैवाहिक स्थितीमुळें जरी स्वातंत्र्य कमी होतें तरी त्या स्थितींत जी मजा आहे ती कौमार्याच्या स्वातंत्र्यांत नाहीं. निरनिराळ्या तरुणांबरोबर 'फ्लर्टिंग' तरी किती दिवस करावयाचे! ज्या प्रेमाच्या भाषणांत खरेपणा नाहीं तें भाषण आतां अगदीं मिळमिळित वाटतें. जे तरुण दिसतात त्यांत जो आवडेल तो खटपट करून आपलासा कायमचा करून घेण्यांतच खरी मजा आहे इत्यादि गोष्टी एखादी पुरंध्री ज्याप्रमाणे बालिकेस उपदेश करते त्याप्रमाणे मोठया आढयतेच्या भाषेत मयूरीनें लिहिल्या होत्या.

रघुनंदनाच्या लग्नाच्या बातमीचा निरनिराळ्या मंडळींवर निरनिराळा परिणाम झाला. मि. कामत यांस खरोखर आनंद झाला. मिसेस कामत यांस फारसे बरें वाटलें नाहीं, पण फारसें वाईटहि वाटले नाही. त्यांनां लग्न होईपर्यंत तें होईल काय अशी भीति वाटत होती पण लग्न झाल्यानंतर त्याचें फारसें दुःख वाटले नाहीं. त्या म्हणाल्या जातीची कल्पना त्या पोराला काय, आणि त्यांत दोष तरी त्याला काय द्यायचा! मयूरी शांताबाईना आवडत नव्हती असें नाहीं पण आपल्या मुलाचें सारस्वत जातींत लग्न व्हावें ही जी त्यांची इच्छा होती ती व्यर्थ झाली एवढेंच त्यांनां वाटले. मि.कामत म्हणाले कीं, "लग्न झाल्यावर सुनेचा मुका घ्यावा लागेल. तर मला एवढेंच पाहिले पाहिजे कीं जिचा मुका घ्यावयास मला वाईट वाटणार नाहीं अशी बायको रघूला पाहिजे एवढेंच मी पाहणार. मयूरीचा मुका घ्यायला

ाझी बिलकुल हरकत नाहीं." गोविंदराव असे ोलल्यावर शांताबाई रागावल्या व "तुम्हीं असलीं वात्रट बोलणीं काय बोलतां! हे तुम्हांला शोभत नाहीं!" म्हणून नवऱ्यास शहाणपणा शिकवावयास लागल्या. तसेंच सुनेचा मुका घ्यायची अमेरिकन रीतच घाणेरडी आहे असेंहि बोलूं लागल्या. तेव्हा गोविंदराव म्हणाले कीं, लीलेने एखादा सरंजाम्यां-सारखा देखणा जांवई घरीं आणला म्हणजे त्याचा मुका घेशील तो! त्यावेळेस अमेरिकन रीत चांगली ठरेल कीं वाईट ठरेल?"

त्या दिवशीं लीलेस जरी आनंद झाला तरी तिला थोडेसे वाईटच वाटत होतें. रघुनंदन आणि ती एकमेकांशीं अत्यंत मोकळेपणाने वागत होतीं. रघुनंदनची तिला नेहेमी संगत असल्यामुळे लग्न करण्याचें देखील तिला महत्त्व वाटत नव्हते. आपल्यापाशीं गप्पा मारायला व दोघे मिळून तिस-ऱ्याची टवाळी करायला योग्य सहकारी या नात्याने ती त्याच्याकडे पहात होती. तेव्हां आपलें विश्वासस्थान मयूरीने हिरावून नेलें असे तिला वाटले. आतां मयूरी देखील जेव्हां परत येईल तेव्हां तीच रघुनंदनास घेऊन बसेल व मी जर त्याच्यापाशीं बोलत बसलें तर ते देखील तिला खपायचे नाहीं, इत्यादि कल्पना तिच्या मनात आल्या. माझे कांहीं तरी मयूरी घेऊन गेली असें तिला वाटलें. व मयूरीविषयीं आतां आपण तक्रार तरी कोणापाशी करावी असा विचार करताच तिला तिच्या विष्णूची म्हणजे डां. सरंजाम्यांची आठवण झाली. अलीकडे तिचे असें होत असे कीं, बाबासाहेब कामासाठीं ऑफिसांत, रघू घरीं नाही, आई घरकामांत, सुंदर शाळेंत आणि ती मात्र एकटी. असें झाल्यामुळें रोज संध्याकाळी ती विष्णूची वाट मोठ्या आतुरतेने पहात असे. रोज कांहीं घडल्यास सांगायचें तरी कोणाला, तर विष्णूला. कां कीं, बाबा पुष्कळदां रात्रीचे क्लबांत जात असत. आपण कांहीं वाचलें व त्यावर चर्चा करावीशी वाटली तर ती आईबापांपाशी थोड-कीच करणार! तेव्हां ती करायची म्हणजे विष्णू-पाशीं आणि विष्णूच्या वाचनासंबंधाने तर तिला फारच आदर होता.

नित्याप्रमाणें आज संध्याकाळीं विष्णूपंत आले, तेव्हां दोघेहि पोर्चवर बसलीं. लीला थोडा वेळ बोलली नाहीं. तेव्हां विष्णूपंतांनीं आज मुग्ध कां म्हणून प्रश्न केला. तेव्हां ती म्हणाली "रघूचे मयूरीशीं लग्न झाले हें तुम्हाला ठाऊक आहे काय?"

विष्णुपंत म्हणाले "आजच मला पॅरिसहून चित्राचे पोस्टकार्ड आलें. मि. रघुनंदन व मिसेस कामत जूनिअर अशी सही होती आणि मिसेस कामतच्या पुढें कौंसांत मत्तमयूरी रायतुरकर असे लिहिले होते. तेव्हां यांचे लग्न केव्हां झालें म्हणून मी तुला विचारणारच होतों पण आज तू उल्ल-सित दिसत नाहींस. कां? हें लग्न तुला पसंत पडले नाहीं काय?"

"हें लग्न पसंत पडले नाहीं असें नाहीं, पण रघुनंदनने लग्न केले हेंच मला बरे वाटत नाहीं"

"म्हणजे काय? रघूने लग्नाशिवायच रहावें!"

"असें कांहीं नाहीं—पण"

"तर मग?"

"पण मी आतां एकटी झाले असे मला वाटायला लागलें. मयूरी आतां रघूला घेऊन बसेल आणि तो माझ्या वांट्यास मुळींच याव-याचा नाहीं!"

"तर मग तूं एकटी राहूं नको, दुकटी हो."

"आणि तें कसे व्हावयाचे?"

"मी आतांच तुला विचारतो, माझ्याशीं लग्न करतेस का म्हणून—आपण लग्न करूं म्हणजे तुला एकलकोंडेपणा कधीं वाटायचा नाहीं म्हणून मी खबरदारी घेतो. सांग पाहूं! माझ्याशीं लग्न करतेस का?"

"लीलेनें उत्तर दिलें नाहीं. ती एकदम आपल्या विष्णूच्या बाहुपाशांत निमग्न झाली!"

" तर मग बाबांनां केव्हां विचारणार? "

"आजच विचारतों, घरांत आई नाहीं काय?"

" आहे. "

" मग तिलाच सांगतो. खरोखर बाबांनां विचारायचें आहे काय? त्यांनां खरोखर नुसतें कळवायचें !"

" नुसतें कळविणें म्हणजे फारच " आजतागाईतपणा " होत नाहीं काय ? "

" बाबांनीं नाहीं म्हटले तर तूं लग्नाचा विचार रहित करण्यास तयार आहेस काय ? "

"मुळींच नाहीं!"

" तर मग विचारण्याचा खोटा विधि तरी कशासाठीं? "

"तर मग काय करायचें?"

" तुझ्या आईला आतांच कळवितो की तूं होय" म्हणालीस."

"चला तर मग!"

मग दोघेहि आंत गेलीं. शांताबाईस विष्णुपंतांनीं सांगितलें कीं, " मी लीलेस विचारलें आणि ती होय म्हणाली."

शांताबाईला अत्यंत आनंद झाला, व त्यांनीं लीलेचें चुंबन घेतलें व त्याबरोबर विष्णुपंतांचेंहि चुंबन घेतलें तेव्हां लीला आईला म्हणाली " तूं आतां बाबांनां काय म्हणशील. विष्णुपंत अजून तुझे जांवई झाले नाहीत?"

"आपला वाङ्निश्चय तर झाला. वाङ्निश्चय आजच होईल ही माझी कल्पना नव्हती. माझ्यापाशीं आतां आंगठी नाहीं. पण माझ्यापाशीं सिगार आहे तिचा कागदी कंबरपट्टा तुला आंगठी म्हणून देतों. हिऱ्याची आंगठी आणली म्हणजे मी तो परत घेईन!"

---

## प्रकरण २१ वें.

## गजपतरायांचें सार्वजनिक स्वागत.

त्या दिवशीं जेवणास जी हिंदुस्थानी मंडळी एकत्र झाली होती ती अनेक प्रकारची होती. डॉ. मैत्र नांवाचे एक कलकत्त्याचे प्रोफेसर आपल्या शोधांची अमेरिकन लोकांस ओळख करून देण्यास आले होते; ते त्या जेवणाला होते. डॉ. नाग नांवाचे एक बंगाली गृहस्थ यूरोपीयन स्त्रीशीं विवाह करून बोस्टनला स्थाईक झाले होते तेहि तेथेच होते. एक हिंदी राजपुत्र शिक्षणासाठी अमेरिकेत आला होता तो व त्याबरोबर आलेले त्याचे कांहीं अनुचर तेथें आले होते, ख्रिस्ती मिशननें हिंदुस्थानांतून अभ्यासासाठीं आणलेल्या कांहीं ख्रिस्ती मुलींहि तेथें होत्या. व कोलंबिया मधले विद्यार्थी हे तर घरचेच. त्यांची संख्या सर्वांत जास्त होती. त्याशिवाय मि. विलकाक्स सारखी कांहीं अमेरिकन मंडळी देखील त्या भोजनास जमली होती. प्रो. शंकरराव गोगटे गैरहजर होते. त्यांस त्यांच्या कंपनीच्या कामासाठीं महिनाभर हिंडावे लागलें असल्याकारणानें त्यांची व गजपतरायांची भेट झाली नव्हती. तथापि प्रो. गोगट्याचा स्वागतपर संदेश त्या जेवणाच्या प्रसंगी वाचला गेला. प्रो. गोगटे यांचे आप्त डॉ. सरंजामे हे हजर होते, व त्यामुळे तेथील मंडळीनां, प्रो. गोगटे यांचे प्रतिनिधि येथें आहेत त्याअर्थी आजचे जेवण तेथील सर्व प्रकारच्या हिंदुस्थानी मंडळीचे झालें आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नव्हता; कां कीं, डॉ. सरंजामे हे प्रो. गोगटे यांचे आप्तच होते एवढेच नाहीं तर त्यांनां त्यांच्या मतांचे दर्शक समजत असत. पुष्कळ लोक अशी चर्चा करीत की, डॉ. सरंजामे हेच प्रो. गोगटे यांच्या मतांचे उत्पादक जरी नसले तरी व्यवस्थितपणें व सयुक्तिकपणे मांडणी करणारे आहेत. डॉ. सरंजामे या वेळेस बरोबर मिस कामत हिला घेऊन आले

होते. मि. कामत हेहि कांही कारणामुळे गैरहजर होते.

लाला गजपतराय हिंदुस्थान देशाचे प्रसिद्ध पुरुष म्हणून हिंदुस्थानांत त्यांची ख्याति होती, आणि त्यामुळेच अमेरिकेतील हिंदुस्थानी मंडळीत त्यांच्याविषयीं आदरभाव होता. गजपतरायहि आपल्या मोठ्या अधिकाराची जाणीव ठेवून तरुण विद्यार्थ्यांपाशीं वागत होते, आणि आज त्यांच्याबरोबर जेवण्याच्या निमित्ताने त्यांचा खास उपदेश ऐकण्यासाठीं कांहीं मंडळी जमली होती. जेवतांनां अर्थात गजपतराय यांनींच मुख्य संभाषण करावे आणि इतरानी त्या संभाषणास पूरक असेल तेवढेच बोलावे हा सभाषणक्रम स्वाभाविक होता. जेवणाचे स्वरूप खाजगी जेवणासारखें होतें. यजमानकी करण्यासाठी टोस्ट मास्टर कोणीच नव्हता. गजपतराय यांनी, इतकी मंडळी आज जेवणास जमली ही गोष्ट त्या मंडळीच्या लाला गजपतराय या व्यक्तीवर वैयक्तिक प्रेमाची द्योतक नसून जे कार्य त्यांनीं म्हणजे सुशिक्षित हिंदी लोकमताने अंगावर घेतले आहे त्या कार्यावरील प्रेमाची द्योतक आहे वगैरे सांगितले आणि अमेरिकन जनतेत अनुकूल लोकमत तयार करून अमेरिकेतील हिंदी मंडळीला त्या कार्याला कशी मदत करतां येईल हेहि सांगितले. हे सर्व अर्धेमुर्धे सभेत बोलण्याच्या आवाजांत तर अर्धेमुर्धे खासगी बोलण्याच्या आवाजांत त्यांनीं सांगितलें. नतर पुढे त्यांचें बोलणें अगदीं खासगीसारखें होऊं लागलें. लाला गजपतराय आधल्या दिवशीं सध्याकाळीं एका प्रसिद्ध व्यापाऱ्याकडे जेवावयास गेले होते, आणि तेथे त्यांचा जो सत्कार झाला त्यावरून तेथील अमेरिकन मंडळी हिंदुस्थानाविषयीं कशी सहानुभूति बाळगतात, त्यांनां हिंदुस्थानविषयीं माहिती तरी किती आहे, याविषयीं तेथील हिंदी मंडळीशीं तें आश्चर्ययुक्त शब्दांनीं बोलत होते. ते बोलणे कांही नवख्या मंडळीनीं केवळ सत्य म्हणून ग्रहण केलें तर कांही मडळीनीं तें म्हणणे ऐकून नवख्या मंडळीवर अमेरिकन लोक आपला उठाव कसा करतात अशा भावनेमुळें उत्पन्न झालेलें स्मित तोंडावर दाखविले, तर कित्येकांनी, गजपतरायांनी या प्रकारची कल्पना घेऊन हिंदुस्थानांत जाऊं नये असे आपआपसांत उद्गार काढले. या प्रकारचे उद्गार काढणारांत डॉ. सरंजामे प्रमुख होते. व त्यामुळे सरंजामे व गजपतराय यांचा थोडासा मनोरंजक संवाद झाला.

" मी काल मि. रोझनबाम यांच्याकडे गेलें तेव्हां हिंदुस्थानाविषयी अमेरिकन लोकांनां किती कळकळ आहे हे दृष्टीस पडले. "

" मी अमेरिकन लोकांच्या कळकळीविषयीं बराच साशंक असतो, तथापि आपला अनुभव हिंदुस्थानाला अनुकूल आहे हे ऐकून मला फार आनंद होतो. " डॉ. सरंजामे यांनीं प्रत्युत्तर दिले.

" अमेरिकन लोकांनां इंग्रज लोकांनीं हिंदुस्थानावर राज्य करावे हें मुळीच आवडत नाही. त्यांच्या सहानुभूतीचा आपण फायदा घेतला पाहिजे. "

" अवश्य घेतला पाहिजे, पण त्यांच्या सहानुभूतीचे स्वरूप आम्हांस कळलें पाहिजे आणि त्यांच्या सहानुभूतीचा फायदा कसा घेतां येईल यासंबंधानेंहि आपली कांहीं कल्पना असेल तर तीहि आम्हाला कळवावी. प्रत्येक अनुकूल परिस्थितीचा फायदा घेण्यास येथील हिंदुस्थानी मडळी अगदी टपलेली आहेत. "

" मला अगोदर असे दिसून आलें कीं, अमेरिकन लोकांस हिंदुस्थानाविषयीं माहिती किती तरी आहे! पुष्कळ प्रसंगीं इतकी माहिती मला देखील नाहीं म्हणून मला त्याची लाज वाटायला लागली. "

" अशी कोणती माहिती, कीं जी त्यांनां आहे व तुम्हाला नाहीं? "

" मिस् रोझनबाम मला अनेक गोष्टींविषयीं विचारूं लागली. तुम्ही कालिदास वाचला आहे काय ? वेदांतलीं सूक्तें ही जोरदार कविता आहे काय ? द्रविडियन पद्धतीचें वास्तुशिल्प तुम्हांस आवडलें काय ? मोनिस्ट पद्धतीची विचारपद्धति हिंदूंच्या धार्मिक विचारांत वाढत आहे काय ? इत्यादि प्रश्न तिने विचारले."

" आणि त्या प्रश्नांवरून तुम्हांला असे वाटूं लागलें कीं अमेरिकन मुलींनां सुद्धां हिंदुस्थानची किती तरी माहिती आहे? "

" अर्थात असें वाटलेंच! आणि त्या बरोबर असेंहि वाटले कीं, ज्या देशांतल्या मुली आपणां-संबंधानें इतकी माहिती मिळविण्याची तसदी घेतात त्या मुलींनां आपल्या देशाविषयीं जिज्ञासा, आदर किंवा स्नेहभाव हीं असलींच पाहिजेत."

हें ऐकून लीला एकदम हंसूं लागली. तिचीं बोटें दाबून तिला हंसूं नको म्हणून डॉ. सरंजामे यांनीं सुचविलें व पुढें ते बोलले.

" गजपतराय, मी आपल्यापेक्षां लहान आहें. आपण जास्त अनुभवाचे गृहस्थ आहांत. तथापि मला असें वाटतें कीं, या अमेरिकन लोकांचे अंतःकरण मी अधिक जाणतो आणि तुम्हांस मी एवढेच सांगतो कीं रोझनबाम मंडळींनीं तुम्हांला बनविलें! "

" आणि तें कसें ? "

" पहा, आजच्या सकाळच्या पत्रांत तुम्हीं त्यांच्याकडे जेवावयास गेला होता त्याचें वर्णन आहे. पत्र १२ वाजतां छापायला गेलें आणि तुम्हीं ११ वाजेपर्यंत त्यांच्याकडे होतां. पत्रामध्यें तुम्हीं, हिंदुस्थानामध्ये इंग्रज लोक हिंदुस्थानी मंडळीस कसे वागवितात याच्यासंबंधानें बोललां त्याचें संक्षेपानें वर्णन आहे, यावरून तुम्हांस काय वाटतें ? "

" मला एवढेंच वाटतें कीं हिंदुस्थानाचीं दुःखें जगाच्या नजरेस आणण्यांत मि. रोझनबाम यांनी तत्परता दाखविली."

" आणि ती सर्व हिंदुस्थानच्या प्रेमासाठींच दाखविली असेहि वाटते काय ? "

" तुम्हीं मराठे लोक म्हणजे फारच साशंक, दुसऱ्याच्या चांगल्या हेतूविषयीं शंका घेणारे! मला तुमच्या पुण्याचा स्पिरिट ठाऊक आहे. कोणी कांहीं चांगले काम करायला लागला म्हणजे तुम्हीं त्याच्याविषयी साशंकबुद्धि दाखविलीच ! "

" गजपतराय, मी महाराष्ट्रीय आहे, पण मी पुण्यास फारसा गेलोहि नाहीं."

" तर मग हा साशकपणा तुमच्या रक्तांत आहे. नाहीं तर आईच्या दुधांतहि असेल !"

" गजपतराय, तुम्ही प्राणिशास्त्रज्ञ किंवा मानसशास्त्रज्ञ नाही. आणि त्यामुळे रक्तांत किंवा दुधांत सद्‌बुद्धि, दुर्बुद्धि यांसारखे गुण बीजरूपानें असतात किंवा नाहीं यासंबंधाने तुमचे विचार परीक्षणासाठीं घेण्याचे कारण नाही व तीं शास्त्रे मीहि इतक्या मर्यादेपर्यंत अभ्यासली नाहीत, तेव्हां संशयबुद्धीसारखे गुण रक्तांत असतात असे मलाहि अधिकारपूर्वक सांगतां येत नाही. तथापि मी तुम्हांला एवढें सांगू शकतों कीं, तुमच्या दृष्टीस पडलेली माझी ही साशंकबुद्धि जगाचा व्यवहार पाहून आणि त्या व्यवहारांतील स्वाभाविक आर्थिक हेतु दृष्टीस पडून वाढली. अमेरिकन परिस्थितीची आणि तींत वाढलेल्या मानवी हेतूंची मला माहिती नसती तर तुमचे जे समज झाले तेच माझेहि झाले असते खरे."

" तर मग तुमच्या अमेरिकन शास्त्राप्रमाणें तुम्हाला यांत काय दिसलें हे तरी दृष्टीस पडूं द्या. तुम्हीं पाहिजे तर असे सांगा कीं, मि. रोझनबाम यांनां हिंदुस्थानाबद्दल जिज्ञासा नाहीं, माहिती नाहीं व कळकळहि नाहीं."

भली मरगठ्याची फजीति झाली म्हणून पंजाबी व बंगाली विद्यार्थी हंसूं लागले.

"मला काय वाटलें ते मी सरळ सांगतों. मि. रोझनबामचा तुम्हाला जेवावयाला बोलावण्याचा प्रधान हेतु एक प्रसिद्ध गृहस्थ त्यांच्याकडे जेवा-वयाला गेला एवढ्याच गोष्टीची प्रसिद्धि करावी हा होता. त्या हेतूचें प्राधान्य असल्याशिवाय तुम्हीं अकरा वाजेपर्यंत जें बोललां तें रात्रीं बारा वाजण्याच्या अगोदर वर्तमानपत्राच्या हपीसांत पोचलें नसते आणि वर्तमानपत्रांत साधारणपणें दहा वाजेपर्यंतच मजकूर पुरा करून ठेवतात, तर तुमच्या जेवणासंबंधाने व तुमच्या सभाषणासबं-धानें मजकूर रात्री वेळेवर येईल असें अभिवचन रोझनबामकडून "मार्निंग टयाटलरला" अगो-दरच गेले असलें पाहिजे.

"आणि इतकें करण्यांत रोझनबामचा हेतु काय?"

"हेतू अनेक असतील; रोझनबाम हा गोमांस आणि चरबी यांच्या व्यापारांतून आलेला, आपण श्रीमंत झालो पण महत्त्वाच्या वर्गांत मोडत नाहीं, म्हणून त्यास भावना असली पाहिजे व थोडेंसें दुःखहि होत असले पाहिजे व यासाठी तो सामा-जिक प्रसिद्धीसाठी हापापला आहे. आपल्याकडे पुष्कळ मोठे लोक येतात हें त्यास जाहीर करा-यचें असतें. आपलें नांव वर्तमानपत्रांतून वारं-वार यावें म्हणून वर्तमानपत्राच्या कंपन्यांचे शेअर यानें विकत घेतले आणि त्याच्याकडे कोणत्या शास्त्रज्ञाचा किंवा विद्वानाचा सत्कार झाला इत्यादि वर्णनाचे लेख वर्तमानपत्रांत वारं-वार येतात. या आठवड्यांत कोणाला बोलवावें याविषयीं विचार ज्यावेळेस चालू असेल त्यावेळेस आमंत्रणास योग्य अशा व्यक्तींची यादी चालू वर्तमानपत्रें पाहून त्यांच्या सोशल सेक्रेटरींनीं तयार करून दिली असेल. तींत तुमचेंहि नांव असेल तेव्हां वैचित्र्यासाठीं म्हणून तुम्हांस आमंत्रण केलें असेल. तें हिदुस्थानच्या प्रेमासाठींच असावें असे मला वाटत नाहीं."

"पण माझ्या पुस्तकासंबंधाने त्याला माहिती होती. आणि त्या पुस्तकाचा उल्लेख येथील पत्रां-तहि आलेला नव्हता!"

"तुम्हांस बोलवावयाचें टरल्यानंतर तुमच्या-संबंधीं माहिती स्पेशल सेक्रेटरीनीं तयार करून रोझनबामपुढें ठेवली असेल."

"पण या प्रकारच्या सोप्या स्पष्टीकरणाच्या स्वीकारास एक अडचण येते."

"ती कोणती?"

"मी ज्यावेळेस गेलो त्यावेळेस खुद्द मि. रोझ-नबाम घरीं नव्हतेच. मिस् रोझनबामच ड्रॉईंग-रूममध्ये होत्या, आणि माझे प्रथम बोलणें मिस् रोझमबामशीं झाले आणि त्यांच्या बोलण्यावरून त्यांनां हिदुस्थानची माहिती किती आहे हें मला कळलें, इतकी माहिती–त्यांतली पुष्कळ मलाहि अपरिचित–त्यांनां हिंदुस्थानविषयीं सहानुभूति असल्याशिवाय कशी झाली?"

"लाला गजपतराय, तुमचा हा प्रश्न ऐकून सामान्य सुशिक्षित अमेरिकन मुलीस हंसूं आल्या-शिवाय राहणार नाहीं. सत्काराच्या कल्पना इकडे जशा वाढल्या आहेत तसें सत्कार करण्यांत कौशल्यहि वाढले आहे. प्रत्येक सुशिक्षित आणि त्यांतल्या त्यांत "सोसायटी" मधली तरुणी संभाषणकुशल असावी लागते, कोणत्याहि प्रका-रचा मनुष्य येवो, त्याला परिचित असें वातावरण उत्पन्न करण्यासाठी त्याला ज्यांत गम्य असेल अशाच गोष्टी काढावयाच्या. कोणी केमिस्ट असेल तर त्याला केमिस्ट्रीसंबंधाने बोलण्याची संधि देण्या-साठी भाषण उकरून काढावयाचे, कोणी कायदे-पंडित आला, तर कायद्यासंबंधाच्या कांहीं विषयां-वर चर्चा करावयाची. या सर्व गोष्टी सामान्य "होस्टेस"च्या परिचयाच्या आहेत. इंग्लंडांतील

कोणी लॉर्ड येवो, त्याच्या आप्तासबंधाची चौकशीहि, त्यांची नावें घेऊन मिस् रोझमबामसारख्या मुली त्यांच्यापाशी करतील, कोणी बाल्कन आला तर बाल्कन भांडणासबंधीं बोलतील. काय बोलावयाचे याची तयारी दुपारी करतील व सध्याकाळी जे बोलणे बोलावयाचे ते बोलतील आणि दुसऱ्या दिवशी ते विसरून जातील! "

त्यानतर लालाजींनी संभाषणाविषय दुसराच काढला. सुशिक्षित हिंदूंनी हिदुस्थानांत परत जावें किंवा अमेरिकेतच रहावे हा प्रश्न त्यांनीं पुढें घेतला. हा वादविवाद जेव्हां सुरू झाला तेव्हा लीलेने डॉ. सरजामे याची बोटे घट्ट दाबली. हा प्रश्न थोडाबहुत मुख्य भांडणाचा होता. का की, या दोहोमध्ये जी गोष्ट श्रेयस्कर ठरणार ती गोष्ट करणारे अधिक चागले ठरणार, आणि हिदुस्थानांत परत न जाता अमेरिकेत रहाणें ही गोष्ट जर वाईट ठरली तर "सेटलर्स असोसिएशन" चे सर्व सभासद म्हणजे अश्रेयस्कर मार्ग आचरणाराची टोळी ठरणार!

डॉ. सरजामे म्हणाले " हा अत्यत वादाचा प्रश्न आहे. यावर आमच्यांत तीव्र मतभेद आहे. तर आपण हा प्रश्न येथें चर्चेला घेऊं नये अशी मी आपणांस सूचना करतों. "

" जर या प्रश्नावर तीव्र मतभेद आहे तर मला तो समजलाच पाहिजे. या प्रश्नावर माझे आतांचे मत येथे सुशिक्षितांनी कायमचा निवास करण्याविरुद्ध आहे. तथापि दुसऱ्या बाजूला सत्य नसेल असें म्हणण्यास मी प्रवृत्त होणार नाहीं. येथेंच रहाणारी मंडळी अमेरिकन समाजांत मिसळून जाणार, म्हणजे ती आपल्या देशाला पारखी होणार; तर येथें कायमचा निवास करण्याचें ध्येय येथील तरुणांनीं ठेवूं नये असे माझे मत आहे. येथें तुम्हांस राष्ट्ररूपानें अस्तित्व राहणार नाहीं. यासाठीं येथेंच कायमचा निवास करण्याची कल्पना श्रेयस्कर नाही असें मी समजतो. "

आशुतोष चौधरी मध्येंच म्हणाला " या विषयावर आमचा आणि डॉ सरजामे यांचा वादविवाद नेहमीं चालतो. "

" डॉ. सरंजामे, तुमची विचारमालिका लालाजींच्या कानावर येऊं द्या; ते त्याची चांगली तपासणी करतील. " दुसरा एक विद्यार्थी म्हणाला.

" मी तपासणी करण्याच्या दृष्टीने विचारीत नाही. मला दुसरी बाजू समजावी हीच माझी इच्छा आहे." लालाजी बदले.

" आम्ही जे हिंदुस्थानांत परत जात नाहीं व अमेरिकेतच निवास करून रहातो, त्यांचा आयुष्यक्रम व्यर्थ आहे, त्या आयुष्यक्रमास ध्येयरूपता नाही, असे कसे म्हणाल? आम्ही आपली उपजीविका येथे करतोंच आहों ना? आणि ती उपजीविका हिदुस्थानमध्ये होत असते तिच्यापेक्षा किती तरी पटीने अधिक चांगल्या तऱ्हेने आम्ही करीत आहो! प्रत्येकाने आपली सांपत्तिक स्थिति सुधारावी हेचं ध्येय साधारणपणें कुटुंबापुढे असते. येथें येणारे जर्मन, रशियन, पोलिश, डच, स्कँडिनेव्हियन हे सर्व प्रकारचे लोक आपल्या स्वतःच्या आर्थिक उन्नतीकडे व आपल्यापेक्षां आपल्या मुलाला कौटुंबिक स्थिति चांगली यावी एवढेंच पहात आहेत. तर मग आम्हीं जर आमच्याच वैयक्तिक हिताकडे पाहू लागलों तर तुम्ही आम्हांस वाईट का समजतां? "

"येथेच निवास करूं इच्छिणाऱ्या व आपलें सांपत्तिक दृष्ट्या बरे व्हावे म्हणून प्रयत्न करणाऱ्या भारतीयांस मी तरी निदान येथें कायम वसती करूं इच्छिणाऱ्या डयानिश किंवा पोलिश लोकांपेक्षा कमी समजत नाही. पण माझ्या बोलण्याचा उद्देश तुमच्या लक्षांत आला नाहीं. एखादा हिंदु ख्रिस्ती झाला म्हणजे तो ज्याप्रमाणे आपल्या जातीला किंवा समाजाला पारखा होतो त्याप्रमाणेंच मनुष्य अन्य देशी जाऊन त्या समाजाचा नागरिक बनल्यानें होतो आणि या

तत्त्वावर यूरोपातील, किंवा एशियांतील लोकांनी अमेरिकेचे नागरिक व्हावे हे मला आवडत नाही. आता अमेरिकेन हिंदुस्थानातून आलेल्याना नागरिकत्व देणारे कायदे केले आहे त्याअर्थी हिंदूंना येथे नागरिक होण्याचा प्रश्नच मिटला आहे. व जरी [illegible] एक अधिकार येथे [illegible] आहे तरी मला एका दृष्टीने आनंदच होतो. अमेरिकन राष्ट्राने हिंदु [illegible] म्हणजे त्यास स्वदेशी जाण्याची आवश्यकता [illegible]. हिंदु ख्रिस्ती झाला तरी त्यास [illegible] म्हणून यूरोपीयन समाज बरोबरीने [illegible] नाही याबद्दलही मला त्याच कारणामुळे आनंद होतो. पण त्याबरोबर मी हेहि सांगतो की जरी स्कॉडिनेव्हियन लोक या राष्ट्रांशी एकरूप झाले तरी त्यास [illegible] दोष देणार नाही पण हिंदुस्थानी [illegible] जर या देशाशी एकरूप झाली तर मी त्यास दोष देईन."

"आणि ते का?"

"स्कॉडिनेव्हियन जर येथे राहून एकरूप झाले तर तो केवळ तैलंगी ब्राह्मण कुटुंब महाराष्ट्रीय झालें एवढया पुरताच फरक आहे. ते आपला धर्म सोडीत नाहीत."

"आणि धर्म म्हणून तरी तुम्ही काय समजतां? ईश्वरविषयक मत [illegible] बदलण्यास प्रत्येकास अधिकार नाही काय? धर्म हा कोणी केला आणि तो कोणासाठी आहे? धर्म हा माणसांसाठीच माणसांनी केला आहेना? जो कपडा अनुपयुक्त आहे तो टाकून देऊन नवीन कपडा धारण करण्यांत ज्याप्रमाणे काही दोष नाही त्याप्रमाणेच धर्माची गोष्ट आहे. जो धर्म उपयोगी पडेल तो ठेवावा आणि जो अनुपयुक्त होईल तो टाकून द्यावा."

"हे हो! माझ्याच्याने हे शब्द ऐकवत नाहीत! तुम्हीं धर्मशून्य, दुर्बुद्ध, [illegible] आणि अधःपतन झालां आहां. कपड्यासारखेच धर्मास लेखणे हे बरोबर नाही. उपमा देणे ही लटपट आहे."

गजपतरायाचे हे बोलणे ऐकून लीलेने डॉ. सरजामे यांच्याकडे पाहून जरा स्मित केले.

"तुम्हांला माझे बोलणे ऐकवत नसेल पण त्यावरून ते चुकीचे होत नाही." डॉ. सरजामे म्हणाले.

लीलेचे स्मित पाहून थोडे ताळ्यावर येऊन गजपतराय म्हणाले "मी जो जरा कडक भाषा [illegible] याबद्दल तुमची माफी मागतो, पण माझे म्हणणे एवढेच की ज्या समाजात जाण्याने फायदा होईल त्या समाजाचे [illegible] हे तत्त्व बरोबर [illegible] त्याचच म्हणण्याची [illegible] स्वार्थत्याग आहे."

"स्वार्थत्याग [illegible] तर तो ज्याच्या हितासाठी [illegible] जागृत [illegible] पाहिजेना? तुम्ही म्हणाल तो पुढे जागृत होईल. पण व्यक्तीचे आयुष्य [illegible] आहे हे लक्षात ठेवा. समाज जागृत होण्यापूर्वीच व्यक्ती स्वार्थत्यागाने मरून जाणार [illegible] होणार नाहीना?"

"हिंदुस्थान आता जागे होत आहे; आत्महितासाठी कर्तव्यतत्पर होत आहे; तुम्ही त्यास मदत केली पाहिजे."

"जे मोठे कार्य हिंदुस्थान अंगावर घेईल त्याला मदत करण्याचे काम आम्ही अवश्य करू."

"तर मग तुम्ही स्वराज्यसंपादनासाठी कांग्रेसने जो प्रयत्न चालविला आहे त्यास मदत का करीत नाही?"

"कांग्रेस जर खरोखर प्रयत्न करीत असेल तर आम्ही [illegible] मदत करू. परंतु जी प्रत्येक गोष्ट तुम्ही कराल तिची 'री' आम्ही ओढावी असें नाही. स्वराज्यसंपादनासाठी कांग्रेस काय प्रयत्न करीत आहे व त्यास आम्ही मदत कोणत्या [illegible] केली पाहिजे [illegible]. [illegible]

"हिंदुस्थानात जर तुम्ही [illegible] प्रयत्न कराल आणि [illegible] सरकारची काहीं [illegible] आम्ही

सेटलर्स असोसिएशनची मंडळी व्यक्तिशः किंवा शक्य झाल्यास संस्थेच्या मार्फत मदत करण्यास कमी करणार नाहीं. सध्यां अमेरिकेने लीग ऑफ नेशन्सच्या बाहेर पडावें म्हणून मत होऊं लागलें आहे. अमेरिका जर लीग ऑफ नेशन्सच्या बाहेर पडावयाची राहिली, आणि हिंदुस्थानासंबंधाने तुम्हाला लीग ऑफ नेशन्सच्या पुढे काही ठराव मांडावयाचा झाला तर आम्ही त्यासंबंधानें येथील सरकारनें तुमच्या योजनेस मदत करावी म्हणून अवश्य प्रयत्न करूं. त्यासाठीं वाशिंगटनला जाऊन फॉरिन सेक्रेटरीची व खुद्द प्रेसिडेंटची गांठ घ्यावयाचे प्रो. गोगटे व मी अंगावर घेतो. तुम्ही हिंदुस्थानांत जा, राज्यव्यवस्थेची जबाबदारी पत्करण्यासाठीं एक संघ तयार करा, व त्या संघावर हिंदी जनतेचा इतका विश्वास उत्पन्न करा कीं, हिंदी जनतेस असे वाटले पाहिजे की, हिंदुस्थान-सरकारच्या नोकरशाहीच्या हातीं जी राज्यव्यवस्था आहे ती त्यांच्या हातची जाऊन प्रस्तुत संघाच्या हाती आली तर चांगले होईल इतका त्याविषयीं विश्वास उत्पन्न करा. त्या संघांत वाटेल तर इकडचीं देखील माणसे घ्या. डॉमिनियन स्टेटस मागावयाचें आहे तर त्यासाठीं आपली बरीच मंडळी लष्करी शिक्षणासाठीं जातील अशी व्यवस्था करा, त्या मंडळींनां एकदम राजाचे कमिशन मिळाले नाही तरी व्हाईसरायचे कमिशन मिळेल असें करा. ज्याप्रमाणे सिव्हिलसर्व्हिसमध्ये जागा मिळाली नाहीं तर निदान प्राव्हिनृशिअलमध्ये मिळते म्हणून सामान्य शिक्षणासाठीं लोक जातात त्या-प्रमाणेंच लष्करी शिक्षणासाठीं या देशांत अनेक लोक येऊं द्या--"

"तुम्ही आज एकदम मोठा कार्यक्रम सांगतां! आजच्या आमच्या असलेल्या तयारीत तुम्ही सह-कारिता करूं इच्छीत नाहीं काय?"

"तुम्ही आमच्याकडून काय अपेक्षितां?"

"आम्ही हें अपेक्षितो कीं, आम्ही हिंदुस्था-नांत म्हणजे कॉंग्रेसमध्यें ज्याप्रमाणें योजना करूं किंवा ठराव करूं त्याप्रमाणे तुम्ही येथे करावें. तुम्ही देशाचे येथील प्रतिनिधि आहांत।"

"म्हणजे तुमचे म्हणणे मुख्यत: असें आहेसें दिसते कीं, विचार करून ठरवायचे तुम्हीं; आणि तुम्ही ठरविलेलें पार पाडायचे आम्ही!"

"होय, माझी समजूत जवळ जवळ तशीच आहे."

"येथेंच मतभेद उत्पन्न होतो।"

"कां बरें?"

"मला असे वाटते की आम्ही योजना करावी आणि तुम्ही त्या योजनेप्रमाणे चालावे."

"हे मुळींच शक्य नाहीं."

"तर मग केवळ तुमची 'री' ओढणें येथेंहि शक्य नाही."

"मला वाटते कीं, तुम्ही योजना करावी आणि आम्ही तीप्रमाणे करावे असले अत्यन्त धाडसाचे मत तुम्ही मला मुद्दाम चिडविण्यासाठीं बोलत आहांत. तुमचा हेतु असा आहे काय कीं. मी रागवावें आणि कांहीं तरी बोलायला लागावें? डॉक्टर सरंजामे, तुम्ही चुकत आहांत. मी वकिली आज तीस वर्षें करीत आहे."

"मी चिडविण्यासाठीं बोलत नाहीं. मी हे सर्व मनापासून बोललो."

"तर मग तुमच्या अपेक्षाच अतिशयोक्तीच्या आहेत."

"मला असे वाटत नाहीं. हिंदुस्थानच्या लोकांची आज अशी भावना झाली आहे कीं, पर-देशीं गेलेले आणि विशेषेंकरून इंग्लंड, अमेरिका यांसारख्या ठिकाणीं गेलेले जे भारतीय आहेत ते केवळ हिंदुस्थानी लोकांचे प्रतिनिधि आणि हिंदु-स्थानी पुढाऱ्यांच्या अपेक्षांचे पूरक व्हावेत. त्यांच्या ज्या राजकीय आकांक्षा व बेत असतील त्यांचेच अमेरिकेंत आलेल्यांनीं पूरक व्हावें. जणूं काय परदेशी गेलेल्यांनां आपलें भवितव्य स्वतंत्रपणें

ठरविण्याचा अधिकारच नाहीं व देशाचे भवितव्य ठरविण्यास त्याहून नाहीं ! तुम्हीं अमुक करतां पण त्याचा हिंदुस्थानास काय उपयोग? या तऱ्हेची भावना हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांच्या खाजगी पत्रांत व्यक्त होते, व तीच भावना अमेरिकेस आलेले हिंदुस्थानांतील पुढारी वारवार आमच्यापुढे मांडतात, व येथें आलेल्या लोकांच्या प्रगतिमार्गांत बुद्धिभेद करून विघ्नें आणतात. जेव्हां कांहीं हिंदी मंडळी अमेरिकेची नागरिक झाली तेव्हां हिंदुस्थानी मडळीनीं परदेशीं जाऊन तेथल्या जनतेचे नागरिक होणे हा मातागमनी प्रकार आहे असे तुम्ही बोलूं लागला. परदेशीं गेलेल्यांचे कर्तव्य तुमच्या मतें एकच, आणि तें हें कीं, परत येऊन देशाच्या औद्योगिक राजकीय विकासास मदत करणे. माझे हरदयाळशीं भांडण याचमुळे होत होतें. हरदयाळ येथच्या लोकास असे सांगे कीं हिंदुस्थानांत राज्यक्रांति करणे हेच येथील लोकांचे कर्तव्य आहे. दुसरे कांहीं नाही. जो पैसा तुम्हाला मिळेल तो राज्यक्रांतीकडे लावा. आमच्या मतें हा प्रयत्न व्यर्थ होता. राज्यक्रांति हिंदुस्थानांत लढाईच्या वेळेस देखील होणार नाही. व जोपर्यंत ब्रिटिश आरमार भरभक्कम आहे तोंपर्यंत अमेरिकेंत खरेदी केलेला दारूगोळा पोचणारच नाहीं. आणि मी साक्रामेंतोच्या गदर परिषदेत जे युद्धांत पडण्याचें नाकारलें तें एवढयाच साठी की माझ्यामते हें कार्य मुळींच यशस्वी होणार नाहीं. आणि जो प्रयत्न ब्रीज धरून रोपटे दिसूं लागल्याबरोबरच कापला जाणार त्या बंडाच्या प्रयत्नांत आपण पडूं नये व इतरांस तिकडे जाण्यास उत्तेजनहि देऊं नये असे मी ठरविले. इकडून प्रयत्नानें पाठविलेला दारूगोळा ब्यांकॉकला अडकून पडलाच की नाहीं?"

"हरदयाळाचे प्रयत्न मला सर्व प्रकारें समत नाहींत पण जो प्रयत्न फसणार तो करायला लागूंच नये असेहि माझे मत नाहीं. कां कीं, प्रयत्न कोणता यशस्वी होईल हें नेहमी कधींच अगोदर सांगतां येत नाहीं. जर देशाला स्वतंत्र करण्याचा प्रयत्न फसणार आहे तर तुम्हीं तरी लष्करी शिक्षण कशासाठीं घेतलें, आणि क्याप्टनच्या हुद्दयापर्यंत चढण्याची यातायात कां केली?"

"माझा शिक्षण घेण्यांत कांहीं निश्चित हेतु नव्हता, तथापि लष्करी शिक्षणामुळें मला या प्रश्नाचा लष्करी दृष्टीनें जो विचार करतां आला त्याचा फायदा मी स्वतःला व इतरांना करून देऊं नये काय ?"

"मी तुम्हांस लष्करी शिक्षण घेण्याबद्दल किंबहुना लोकांस तुम्हीं बंडापासून परावृत्त केलें त्याबद्दल दोष देत नाहीं. मी अयशस्वी होईल असा प्रयत्न करूं नये या तत्त्वाला आक्षेप घेतों."

"जो प्रयत्न फसणार तो करूं नये असे सर्वसामान्य विधान मी केलें नाहीं. माझें म्हणणे प्रकृत राज्यक्रांतीच्या विषयासंबंधानें आहे."

"तुम्हीं लोकांस परावृत्त केले याबद्दल जरी तुम्हांस मी दोष देत नाहीं तरी राज्यक्रांतीसाठीं आपल्या मंडळीकडून झालेला हा प्रयत्न केवळ व्यर्थ झाला असे म्हणण्यास मी तयार नाहीं. जेव्हां युद्धाचा किंवा हिंदुस्थानचा इतिहास लिहिण्याची वेळ येईल तेव्हां या साम्राज्यावरील संकटाच्या काळात देखील हिंदुस्थान स्वस्थ बसला नाहीं त्याने स्वातंत्र्यासाठीं थोडेसे हातपाय हलविले असे यानें सिद्ध केलें आणि हिंदुस्थानचा काळिमा दूर केला असें मी म्हणेन."

"मला हे कळत नाहीं कीं, तुम्हीं राष्ट्रविकास कसा करूं पहातां ? तुम्हाला हिंदुस्थानांत ब्रिटिश अमलाखाली स्वराज्य पाहिजे कीं, हिंदुस्थान हें स्वतंत्र राष्ट्र करावयाचें आहे?"

"मी सध्यां एवढेच सांगतों कीं, आम्हांस साम्राज्यांतर्गत स्वराज्य याच्या पलीकडचें कांहीं दिसत नाहीं, पण जर कोणी देश स्वतंत्र करण्याची खटपट केली तर तीहि वाईट होईलसें वाटत नाहीं."

"पण या दोन्ही गोष्टी परस्परविरोधी नाहीत काय?"

"मुळीच नाहींत."

"त्या कशा काय? जर तुम्ही स्वतंत्र होऊं इच्छीत असला तर ब्रिटिशांनां तुमच्यावरील अमल करडा केला पाहिजे, आणि साम्राज्यान्तर्गत स्वराज्य व उगाच रक्तपात व्हावू नये हेंच हिंदुस्थानच्या राष्ट्राचे ध्येय असेल तर आपला अमल करडा राखण्याचे त्यानां कारण नाहीं!"

"माझें स्वतःचे मत असे आहे की रक्तपाताचा किंवा ब्रिटिश सत्ता झुगारून देण्याचा जितका प्रयत्न होईल तितका आम्हाला, अंतर्गत सुधारणा करा, नाहीं तर वेडे तरुण वेडाकडे प्रवृत्त होतात असे सांगण्याचा मार्ग मोकळा होईल."

"म्हणजे तुम्हांला राज्यक्रांतीचा प्रयत्न व्हावयास पाहिजे आहे, पण तो दुसऱ्या कोणी तरी करावयास पाहिजे आणि तो एवढ्याचसाठी की त्या प्रयत्नाकडे बोट दाखवून तुम्हीं दोन पैसे मिळवावेत, किंवा तुम्हाला महत्त्व यावें!"

"तुम्ही आमचे हेतू अत्यंत वाईट दाखवितां! दोन पैसे मिळविण्याचा आमचा हेतु नाहीं, अंतस्थ सुधारणेचा आहे."

"आणि या दोहोंत विशेष भेद आहेसे मला वाटत नाहीं. तुम्ही अंतस्थ सुधारणा कोणत्या मागता की कायदेमंडळांत आणखी माणसे शिरावीत आणि सिव्हिलसर्व्हिसच्या नोकऱ्या देशी लोकांनां अधिक खुल्या व्हाव्यात, आणि या मागणीला जोर येण्यासाठी इतर लोकांनी लक्षावधि रुपये खर्च करावेत, बंड करावें आणि फांशी जावें."

डॉ. सरजाभ्यांकडे बरीच मंडळी सस्मित पाहू लागली. लाला गजपतराय यांच्या तोंडावर देखील आपण जरा वाईट पकडींत पकडलो गेलो आहोत अशी भावना दिसली. पण ते पुन्हां म्हणाले,

"मग सिव्हिलसर्व्हिसमध्ये आपल्या लोकांचा प्रवेश व्हावा यासाठी खटपट हे देशासाठी काम नव्हे काय?"

"देशातल्या फारच थोडया वर्गासाठी हें काम आहे ज्या इंग्रजी शिकलेल्या थोडया लोकांनां नोकऱ्या जास्त पाहिजे आहेत त्यांचा हा केवळ अशा वर्गाच्या स्वार्थाचा प्रश्न आहे आणि हा तुम्ही सर्व जनतेची फसवणूक करणारे पुढारी राष्ट्रीय म्हणता. सामान्य जनतेस शिक्षण मिळावे म्हणून तुम्ही चळवळ कितपत जोराने केली?— असो. कोणत्याहि दृष्टीने तुमच्याकडे पाहिले तरी तुमच्या अपेक्षा इतक्या भिकार आहेत की, त्याच्यासाठी कोणत्याहि मनुष्याने रक्ताचा एक थेंबहि खर्च करणे अयोग्य होईल. तुम्ही काय म्हणतां की, अधिक चांगल्या जागा कांही लोकांना मिळाव्या व कौन्सिलांत जाणाऱ्या कांही लोकांची हौस भागावी. या प्रकारच्या सुधारणा सरकारला करावयास भाग पाडण्यासाठी सरकारला बुजगावणे दाखवावयाला कांही तरी सापडावे एवढ्याच दृष्टीने तुम्ही अमेरिकेत सुरू झालेल्या क्रांतिकारक चळवळीकडे पहातां आणि तिचे अभिनंदन करता, व या एवढ्याच फायद्यासाठी येथील हजारो लोकांनी आपली हाती नव्हती ती संपत्ति खर्च केली आणि हजारो तरुणांनी आपल्या माना फासात घातल्या या सर्व क्रिया चांगल्या झाल्या असे म्हणता; आणि याचा चांगला परिणाम काय म्हणता, तर काही लोकांना मोठ्या नोकऱ्या मिळतील व कौन्सिलांत जमावयास सांपडेल! गजपतराय, तुमची कल्पनाशक्तीच नष्ट झाली आहे काय?"

हे आवेशाचे शब्द ऐकून हा सभ्यतेचा अतिक्रम झाला या भावनेने बरीच मंडळी सरजाभ्याकडे पाहू लागली. इतक्यात लीला म्हणाली, "मि. गजपतराय सरजाभ्यांच्या बोलण्यात जर कांहीं कठोर शब्द निघाले तर त्याच्यासंबंधाने तुम्ही

वाईट मत करून घेऊं नका. त्यांच्या मनांत आपल्याविषयी योग्य आदरभाव नाही असे मुळीच नाहीं. डॉ. सरजामे यांस त्यांचे न्यूयॉर्कचे मित्र चांगलेच ओळखतात. ते आता पुष्कळ सुधारले. ते ज्यास सत्पक्ष समजतात त्याच्या समर्थनासाठीं वादविवाद करतांनां पूर्वी ते फारच आवेशयुक्त संभाषण करीत."

"डॉ. सरजामे यांच्या बोलण्याचा मला राग बिल्कुल येत नाहीं. मला माझे तारुण्य आठवते. मी आपल्या तारुण्यांत पुष्कळच कडक भाषा वापरली आहे. आमच्यासारखी मडळी तरुण असतांनां त्यांनी जुन्या पुढाऱ्यांना जी विशेषणे लावली त्यांच्या पुढे डॉ. सरंजाम्याचे म्हणणे काहीच नाहीं !"

"मला तुम्हां वकीली आणि राजकारण ही एकत्र करणाऱ्या मडळीचे अंत:करण ठाऊक नाही असे नाहीं. या बाबतीत पुण्यांतली राजकारणी मंडळी, कलकत्त्याची मंडळी आणि पंजाबची मंडळी एकच नमुन्याची आहेत. राज्यक्रांति करावयाचीच झाली तर तीस मदत करावयाची नाही. आपल्या पैशाला व्याज काय सुटलें म्हणून तुम्ही हिशोब पहात बसणार. राजकारणी मंडळीकडून इंग्रजांचे खून झाले म्हणजे तुम्हांस अंत:करणांतून आल्हाद होणार आणि वर्तमानपत्रांतून तुम्ही खुनाचा तिटकारा दाखविणार, एवढेंच नव्हे तर तो खून करणाऱ्या मनुष्यास, आपल्या कृत्यानें कांहीं लोकांस तरी आनंद झाला, व त्यामुळें देशाचा कांहीं तरी फायदा झाला इतकें समाधानहि मिळूं नये अशी खटपट करणार; तुम्ही त्याला कावर्ड उर्फ नपुंसक म्हणणार. त्याला देशाचे शत्रू म्हणणार, त्याच्या सद्धेतुविषयीं संशय घेणार, जणूं काय त्याने खून करून दोन पैसेच मिळविण्याचा प्रयत्न केला आहे! लालाजी, सांगा पाहूं अशा प्रकारच्या लेखांनी तुम्ही आपली लेखणी विटाळविली आहे किंवा नाहीं ! "

"पण तुम्ही या देशाचे नागरिक होण्यांत फायदा तो काय ? "

"या देशाचे नागरिक होण्यानें हिंदुस्थानसंबधानें येथील लोकमतास जागृत करून येथील सरकारास परराष्ट्रीय राजकारणांत सल्ला देण्यास आम्हांस कायदेशीर अधिकार उत्पन्न होतो—हा राष्ट्रदृष्टीनें फायदा आहे. आणि शिवाय ज्या देशांत आम्ही रहातो त्या देशांत इतर लोकांच्या बरोबरीनें अधिकार मिळविणें हें आमचे कर्तव्य आहे. येथें रहावें कीं नाहीं हें आम्हास आमच्या वैयक्तिक हिताच्या दृष्टीनें ठरविलें पाहिजे. "

"तुम्हीं वैयक्तिक हिताच्या गोष्टी कां करतां ! देशभक्तीची जरूर नाहीं काय? देशभक्ति हा विषय मोजमापाचा नाही; हा अंत:करणाचा आहे. केवळ फायदा कशाने होईल याकडे दृष्टि ठेवून प्रेम करणे हे जितकें कौटुंबिक व्यवहारांत गर्ह्य आहे तितकेंच देशभक्तीने प्रेरित होऊन कार्य करण्याऐवजी फायद्यातोटयाचा हिशोब करून कार्यप्रवृत्त होणें गर्ह्य आहे. आपल्या मुलाला वाढवून त्याच्यासाठीं खर्च करणे किती फायद्याचे होईल हें जर आईबाप पहात बसले व त्यामुळें पितृप्रेमास व मातृप्रेमास जर नियम उत्पन्न झाले तर जग अधिक सुखी होईल काय? जें कार्य प्रेमामुळें व्हावयाचे त्याला तुमचे अर्थशास्त्रीय नियम नको आहेत. स्वातंत्र्यप्रेम ही गोष्ट तशीच आहे. त्यासहि स्वातंत्र्यानें फायदा जास्त होईल किंवा तोटा होईल इत्यादि तत्त्वें लावणारा अधम होय. येथील निग्रोनां जे खावयास व अंगावर घालावयास मिळतें तें एशियांतल्या काय पण यूरोपांतल्या राष्ट्रातील लोकासहि मिळत नसेल. आणि त्यावरून आर्थिक दृष्टया हें नीग्रोंचें दास्य इराणांतील जनतेच्या स्वतंत्र स्थितीपेक्षा अधिक सुखकारक आहे असें म्हणण्यास तुम्हीं तयार व्हाल काय?"

हें व्याख्यान देतांनां विजययुक्त मुद्रेनें गजपतराय सर्व लोकांकडे पहात होते.

"भक्ति व प्रेम यांसारख्या भावना ज्या मनुष्याच्या मनांत आहेत, त्या भावनांचें व्यवहारांत प्रयोजन आहे म्हणूनच आहेत. त्यांची आवश्यकता कधीं कोणी नाकारली आहे? वैयक्तिक हिताची भावना मनुष्यांत असते, तिच्याप्रमाणे प्रत्येकाचें आचरण होतें, आणि तुम्हीं तर ती भावना असमर्थनीय समजतां याबद्दलच मला मौज वाटते. तसेंच प्रेम आणि भक्ति या भावनांच्या मुळाशीं आत्महिताची जाणीवच आहे. तर आत्महिताच्या गोष्टींची तपासणी प्रेमभावास निरुपयोगी करण्यासाठीं खास नाहीं तर प्रेम भावनेस जास्त कार्यकारी बनविण्यासाठीं आहे."

"पण तुम्हीं आपल्या मुख्य मुद्दयापासून दूर पळतां, अमेरिकेंत आयुष्य घालविणें किंवा येथे नागरिक होणें या विषयावर आपण बोलत होतों."

"विषय सोडून दूर कोण पळतो ? वैयक्तिक हित व देशभक्ति यांच्या इष्टानिष्टतेवर विषयांतर मी केलें नाहीं!"

"येथे आपली वस्ती कां झाली पाहिजे ! आपल्या लोकांनीं येथें काय कुटुंबासह यावे ?"

"अवश्य, अगदीं अवश्य!"

"आणि तें कां !"

"आम्हाला कोणतीहि विद्या पूर्णपणे हस्तगत करण्यास अनेक वर्षें येथे राहिले पाहिजे. येथे आम्हीं अनेक वर्षें रहाणार तर आम्हाला लग्नहि येथेंच करण्याची सोय झाली पाहिजे, नाहीं तर आम्हांला इतर राष्ट्रीयांच्या मुलीबरोबर लग्नें करावीं लागणार !"

"मग काय आपल्या मुलींनांहि येथें आणायाचें !"

"अवश्य आणायचें! त्या आल्या म्हणजे त्यांनां येथील हिंदी मंडळींतून नवरे मिळतील. दहावीस हजार रुपये हुंडा खर्च करण्याच्या ऐवजीं जर एक हजार रुपये खर्च करून मुली येथें पाठविल्या तर त्यांनां महिन्या दोन महिन्यांतच मागणी येईल. आणि येथील मंडळींनां देखील या देशांत वर्षानुवर्षे राहण्यास हरकत नाही असे वाटेल. मंडळी दहा बारा वर्षें शिकून अनुभव घेऊन हिंदुस्थानांत आली तरच त्यांच्या हातीं भांडवल विश्वासतां येईल."

"येथे तुम्हांस ब्रह्मचर्यवृत्तीने रहातां येणार नाहीं काय ? विद्यार्थी म्हणजे ब्रह्मचारी असला पाहिजे !"

"याविषयीं देखील तुमचे आमचे विचार भिन्न आहेत. पण गजपतराय, आपले बरेचसे सुशिक्षित विद्यार्थी येथून व इंग्लंडहून उपदंश किंवा प्रमेह यांसारखे विकार सपादून जात नाहींत काय ? व ते विकार आपल्या उच्च वर्गांत शिरूं लागले नाहींत काय ?"

"याविषयी मला निश्चित माहिती नाही, पण असें होत असणें शक्य आहे !"

"हिंदुस्थानची संस्कृति वाढण्यासाठीं आपल्या देशांत खटपट पाहिजे आहे. जर आपल्या स्त्रियाहि विदेशी शिक्षणाच्या आणि भावनांच्या बनल्या तर देशी संस्कृतीची जोपासना कशी होणार? आपण विदेशी बनत चाललों आहों. पण आपला स्त्रीवर्ग आपणांस देशी ठेवीत आहे. तर आपल्या सुशिक्षित गृहांतून पूर्ण विदेशी व्यवहार सुरू होईल आणि तो तसा व्हावा हें मला बिलकुल पसंत नाहीं."

"स्त्रियांस पाश्चात्य क्षिक्षण मिळालें म्हणजे त्यांचा हिंदुस्थानीपणा कमी होईलसे वाटत नाही."

"पण मला हिंदुस्थानास पाश्चात्य वळण लागावें हेंच इष्ट वाटत नाहीं. आपली संस्कृति बदलतां कामा नये; तिचा विकास झाला पाहिजे."

"कोणत्याहि संकृतीचा विकास होण्यास परकीयांशीं संबंध अनुपयोगी आहे काय ? मला असें वाटतें कीं संकृतीस चालना परकीयांशीं संबंध आला तरच मिळते. भारतीय संस्कृतीची जोपासना

चांगल्या तऱ्हेनें हिंदुस्थानांत होणें शक्य नाहीं, असें आता माझे मत झालें आहे."

"हिंदुस्थानांत शास्त्र व कला यांची जोपासना होणार नाहीं तर हिंदुस्थानास इतर राष्ट्रांच्या बरोबरीनें यावयाची शक्यताच नाही काय?"

"शक्यता नाहीं असें मी म्हणूं शकत नाहीं. पण भारतीय भवितव्य उज्वल करण्यासाठीं जो प्रयत्न करावयाचा त्याचें पहिलें कार्यस्थान हिंदुस्थान हें खास नाहीं."

"आणि असें तरी तुम्हीं कां म्हणतां?"

"कां म्हणतां! तुम्ही असे बोलतां कीं जणूं काय तुम्हीं हिंदुस्थान पाहिलेंच नाहीं, आणि एखादा अमेरिकन हिंदुस्थानच्या प्राचीन संस्कृतीचे काव्य वाचून ज्याप्रमाणे बोलेल त्याप्रमाणेच तुम्हीं बोलत आहां. वस्तुस्थितीची माहिती असून खोटें अज्ञान तुम्हीं पांघरीत आहां अशी मला शंका येते."

"हिंदुस्थानास स्वातंत्र्य नाहीं म्हणून आज हिंदुस्थान सर्व प्रकारे वाईट झाला आहे. ते स्वातंत्र्य असते म्हणजे संस्कृतीची जोपासना करण्यास साधन झालें नसतें काय? आणि हिंदुस्थानी संस्कृति ही जगाच्या बरोबरीची करतां येणार नाही काय?"

"स्वातंत्र्य हें एक प्रगतीचें साधन आहे ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. पण स्वातंत्र्य हें एवढेंच प्रगतीस पुरेसे नाहीं. गोरे लोक अमेरिकेस येण्यापूर्वी येथील आमच्या तांबड्या बंधूंस स्वातंत्र्य होतेंच पण संस्कृतीची जोपासना त्यांच्याकडून फारशी झाली नाहीं. एखाद्या राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा नाश हा दोन राष्ट्रांच्या संस्कृतीच्या पायऱ्यांचा दर्शक आहे. राष्ट्र सुसटित असतां संस्कृतीच्या अप्रगतीमुळें स्वातंत्र्य नष्ट झालें तें स्वातंत्र्य संस्कृतीचा विकास न होतां, आणि पूर्वीची सुसंघटित स्थिति नसतां पुन्हां प्राप्त होईल ही आकांक्षा ठेवणें म्हणजे राजकीय गोष्टींचें अज्ञान व्यक्त करणें आहे. देशांत आज संस्कृति वाढावयाची नाहीं. शास्त्राच्या उत्तेजनासाठीं सरकार पैसा खर्च करणार नाहीं, देशी लोकांच्या मार्फत शास्त्रास उत्तेजन मिळेलसे वाटत नाहीं. यासाठीं शास्त्रवर्धनासाठीं ज्यास धडपडावयाचे आहे, त्यानें हिंदुस्थानांत निवास करावयाचा नाहीं हेच व्रत स्वीकारलें पाहिजे."

"शास्त्रवर्धनाचे हें ढोंग मला देशाभिमानाचें वाटत नसून देशविषयक कर्तव्य चुकविणाऱ्या व्यक्तीचें, आपला आयुष्यक्रम उच्च तत्त्वांवर आपण चालवीत आहोत, स्वार्थासाठीं चालवीत नाहीं. अशा प्रकारची संपादणी करण्यासाठीं चालविलेले ढोंग आहे असे वाटतें. मी स्पष्ट बोलतों मला माफ करा!"

"आपल्याला माफी करण्यासाठीं अगोदर राग आला पाहिजे, आणि जो मनुष्य शास्त्रज्ञ नाही त्यानें आपलें आमच्याविषयीं एखादें मत ठरविले आणि तें आमच्याविरुद्ध असले तर त्याबद्दल राग कसा येणार? तुम्ही व्यवहारांत पडलेले राजकीय चळवळे नसून इतिहासशास्त्राचे आणि राजनीतीचे तत्त्ववेत्ते आहांत आणि अर्वाचीन जगद्विकास पूर्ण जाणणारे आहांत अशी आमची खात्री असती तर तुमचें मत आमच्या विरुद्ध झाले म्हणून आम्हांस वाईट वाटले असते, व कदाचित तुमचे मत आमच्याविषयी बदलावें म्हणून प्रयत्नहि केला असता. पण खरें सांगायचें म्हटलें म्हणजे तसा प्रयत्न करावा असेंहि वाटत नाहीं."

हे उद्गार अत्यंत शांतपणानें आणि स्मितयुक्त मुद्रेने उद्गारले, एवढेच नव्हे तर ते उद्गारतांना आपण हिंदुस्थानांतील एका पुढाऱ्यापाशीं आणि आपल्यापेक्षां उच्च अशा मनुष्याशीं बोलत आहोत अशा भावनेनें काढले नसून निराळ्याच भावनेने शांतता धरून उच्चारले. एखाद्या

खेड्यांतला वृद्ध मनुष्य शहरांतल्या तरुण मनुष्यास त्याच्या [illegible] दोष देतो त्या वेळेस आपल्यास अवश्य काय हे या खेडवळाच्या लक्षांत काय येणार असे नागरिक तरुणांस वाटते? तथापि आपल्या गांवच्या वृद्ध गृहस्थाशीं सन्मानाने वागावें या भावनेने कधीं कधीं तरुण मंडळी जे आत्मसंयमन दाखवितात त्याच वृत्तीने प्रेरित होऊन डॉ. सरजामे ते असे बोलले दिसले.

"तुम्ही मुद्दाम एक निराळा पक्ष म्हणून आपले म्हणणे पुढे मांडीत असाल तर तुमच्या बोलण्यांत कांहीं सत्य आहे म्हणून कबूल करायला मी तयार आहें पण हिंदुस्थानांत तुम्हाला कांही करतांच येणार नाहीं असे जे मांडतां ते मला खरोखरच पटत नाही तुमच्यासारख्या बुद्धिमान रसायनशास्त्रज्ञाने हिंदुस्थानात येऊन येथील उद्योगवृद्धि अंगावर घेतली पाहिजे."

"तेथे पैसा चांगला मिळेल काय?"

"कदाचित् नाही मिळणार पण तेथील उद्योगधंद्याचा विकास करणे हे देशकार्य आहे. आणि यासाठी ते अंगावर घेतलेच पाहिजे."

" आम्हां तरुण सुशिक्षितांस त्यांचीं कर्तव्ये उच्चासनावरुन सांगावयाचीं, त्यांत तरुणांसंबधाने मोठमोठया अपेक्षा व्यक्त करावयाच्या, आणि आपण मात्र केवळ वकीलीसारख्या धंद्यांत गढून जावयाचे, आणि सरकारी जागेची अपेक्षा करावयाची, तरुण मंडळी जर तुमचा सल्ला ऐकून कांही योजना करूं लागली तर त्यांच्या योजनांनां कांहीं एक मदत करावयाची नाहीं, साहस करण्यास तरुणांस भर द्यावयाची, आणि त्या साहसांत आपण मिसळावयाचे नाही, आपली कातडी बचावण्यांत तत्पर रहावयाचें या तऱ्हेचे पुढारी आम्हांस परिचित आहेत आणि यामुळें पुढाऱ्यांच्या परोपदेशे पांडित्याकडे लक्ष देण्याइतके आम्ही वेडे नाहीं."

"डॉ. सरंजामे, मी वकीली पत्करिली पण मी आपल्यासारखा रसायनशास्त्रज्ञ असतों तर मी खरोखरच आपले कार्यक्षेत्र हिंदुस्थान केले असतें. तुमचें आतांचे बोलणें पुढाऱ्यांच्या योग्यतेसंबंधानें झालें. आम्ही अनेक वाईट गोष्टी करीत असूं. आपल्यापुढे जो प्रश्न आहे तो तुम्ही वाईट कीं आम्हीं वाईट या विषयीचा नाहीं. अमुक गोष्ट वाईट की चांगली हा आहे. यासाठीं जरी आम्ही तुम्हांस म्हटले की स्वार्थाकडे लक्ष देऊन अमेरिकेत राहू नका तर आम्ही स्वत: स्वार्थी आहों हे उत्तर योग्य नाहीं, गजपतराय स्वत: लबाड मनुष्य आहे असे जरी तुम्हीं तंतोतंत सिद्ध केले तरी अमेरिकेत न राहतां देशांत जाऊन काम करण्याच्या क्रियेचें उच्चत्व खोडलें जात नाहीं, किंवा अमेरिकेत राहून अमेरिकन समाजांत अंतर्भूत होणे गैर आहे हे खोडले जात नाही."

गजपतरायांच्या बोलण्यांत कांहीं सत्यांश असला पाहिजे अशी शका डॉ.सरंजामे यांस येऊ लागली. पण डॉक्टर सरजामे यांस वादांत हरावयाचें नव्हते. ते म्हणाले "येथे रहावे किंवा हिंदुस्थानांत जावें याविषयीं वादविवाद संपायचा नाही. इंडियन सेटलर्स असोसिएशनचा मी सेक्रेटरी आहे. प्रो. गोगटे अध्यक्ष आहेत यासाठीं त्यांच्या सल्ल्याशिवाय मी बोलूं इच्छीत नाही. या विषयावर कांही मी बोललो तर तें संस्थेचे बोलणें म्हणून समजले जाईल आणि यासाठी जे मला बोलावयाचे ते खरे खुरे संस्थेचेंच बोलणे होऊं द्या. यासारख्या कठिण पण महत्त्वाच्या प्रश्नावर जर आपणांस आमचे म्हणणें हवें असेल तर तें संस्थेकडून संस्थामुखानें म्हणजे आफिशिअली व्हावे म्हणजे त्यांत वैयक्तिक कारणांस फांटा दिला जाईल. उदाहरणार्थ कोलंबियामध्यें मला नोकरी आहे म्हणून मी येथे रहाण्याची तरफदारी करतो, ही नोकरी गेली तर मी येथे रहाण्याची तरफदारी करणार नाहीं, असा माझ्याविरुद्ध

वैयक्तिक आक्षेप येईल. आणि यासाठीं मला जे कांहीं बोलावयाचे ते संस्थामुखानेंच बोलेन."

"मी एवढेंच म्हणतों कीं शास्त्रवर्धन देखील मनुष्य कल्याणासाठी आहे. मनुष्यकल्याण हें जर ध्येय आहे तर तुम्ही सांगा बरें की तुम्ही आपल्या जवळच्या लोकाचे कल्याण इच्छितां कीं दूरच्यांचे इच्छितां? अनेक अडचणी सोसून हिंदुस्थानांतील उद्योग जगविणे त्यांचा विकास करणें ही गोष्ट देशकल्याणाची नाही काय? तसेच तेथील राजकारणामध्यें पडून देशांत लोकमताचा दाब सरकारवर पडावा यासाठीं प्रयत्न अनवश्य म्हणतां काय?"

"" देशकल्याण " " देशकल्याण " या शब्दांचा आतां मला अगदीं वीट येऊं लागला आहे देशकल्याणाविषयीच्या हिंदुस्थानी मंडळींतल्या कल्पना घेऊन आम्ही तपासूं लागलो म्हणजे आम्हांस हंसूं येऊ लागते. स्वदेशाभिमानी मंडळी म्हणजे काय तर सरकारला अधिक ओरडून जे शिव्या देतात ते लोक आणि त्याच्या ओरडण्यांत आम्ही आपला आवाज मिसळला म्हणजे तुम्ही टाळ्या वाजविणार, हिंदु मंडळींच्या हातीं म्युनिसिपालिटीचा कारभार आला असतां काय परिणाम होतो ते पाहून मला तर असे वाटूं लागलें आहे कीं नालायख मंडळीच्या हातीं राज्यकारभार असण्यापेक्षां तो इंग्रजांच्या हाती असलेलाच बरा. इंग्रजानी तुम्हास फटके मारावे आणि आपल्या मनांत असेल तसे करावयास भाग पडावे यांतच लोकांचे कल्याण आहे. हिंदुस्थानाची उन्नति व्हावयास पाहिजे असेल तर हिंदी लोकांच्या हाती पन्नास वर्षेपर्यंत कांहीं एक ठेवूं नये."

"डॉ. सरंजामे तुम्ही जणूं काय आमचा सूड घेण्यासाठीं आमच्या मतांपेक्षा भिन्न मतें प्रतिपादन करीत आहांत. तुमच्याशी या प्रश्नासंबंधानें वादविवाद करण्यापेक्षां तुमचे सन्मान्य. अध्यक्ष प्रो. शंकरराव गोगटे यांच्याशीच वादविवाद करणें मी अधिक पसत करतों."

हा संवाद मौजेने ऐकत असलेले डॉ. मैत्र म्हणाले आपण अगदी योग्य बोलला गजपतराय. आपण प्रो. गोगटे यांच्याशींच वादविवाद करावा.

डॉ. मरंजामे यांस आपला वादांत पराभव झाला असें लोकांस वाटलें असलें पाहिजे अशी अंधुक कल्पना मनांत आली.

थोडया वेळानें काफीपान पुन्हां झाले. आतां झाले आतां वेळ पुष्कळ झाला आतां घरीं जावे अशी डॉ. मैत्र यांनीं सूचना केली तेव्हां सर्व मंडळी जाण्यास उठली. जातां जातां लीलेने गजपतराय यांशी बोलण्याची संधि साधली आणि विचारलें की " हिंदू मुलींनीं येथे येऊं नये असें म्हणतां तर माझ्या आईच्या किंवा इतर येथील हिंदु तरुण मुलींच्या वर्तनांत आपणांस वावगें तें काय दिसले."

लाला गजपतराय यांस एकदम धक्का दिल्यासारखे झाले ते म्हणाले " माझ्या कल्पना यासंबंधानें निश्चित नाहींत. तुमच्या आईसंबंधाने तर मला फारच आदर आहे."

घरी परत जातांना लीला डॉ. मरंजामे यास म्हणाली कीं हिंदुस्थानांत जाऊन कार्य करावे या गोष्टीचें मला महत्त्व मुळींच कमी वाटत नाहीं. मिशनरी जाऊन कार्य करतात ना, त्यांच्यापेक्षां आपल्या हिंदी मडळींमध्ये कर्तव्यभावना कमी असावी काय. तिकडे फायदा कदाचित् कमी मिळेल.

"तिकडे जाण्याचे महत्त्व नाहीं असे माझें म्हणणें नाही. उच्च शास्त्रीय शोध तेथे होणार नाही, देशविकासासाठी किंवा उद्योगविकासासाठी लागणारा पैसा तेथे मिळणार नाही."

" तर मग तेवढेच सांगावयाचें होतें पण तेवढयासाठीं इतका गरम वाद कशाला पाहिजे होता."

" मी वादविवादांत चांगली मांडणी केली नाही काय? "

"कांहीं वेळ चांगली मांडणी केलीस. अनेक महत्त्वाच्या गोष्टी सांगितल्यास. पण प्रतिपक्षाच्या बोलण्यांत कांहीं सत्य असेल याची जाणीव दाखविली नाहींस त्यामुळे शेवटीं शेवटीं तुझे म्हणणे पक्षांधासारखें वाटावयास लागलें."

---

## प्रकरण २२ वें.

## लग्नानंतर.

लग्न झाल्यामुळें एखाद्या लहान मुलाला नवीन खेळणें मिळालें म्हणजे जसा आनंद होतो तसा आनंद रघुनंदनाला झाला होता. मयूरी देखणी त्याप्रमाणेच चांगली सशक्तहि होती आणि त्यामुळें रघुनंदनाचे आवेशपूर्ण प्रेमसाधन तिला त्रासदायक झालें नाहीं. रघुनंदनाच्या प्रियाराधनांत कमरेला विळखा घालून बायकोला डोक्यावर घेणे वगैरे कसरतींचे प्रकार असत. लग्न झाल्यानंतर कांहीं दिवस पॅरीसमधील एका हॉटेलमध्ये नवराबायको रहात होतीं त्या हॉटेलांतील खोलीच्या बाहेर त्यांपैकीं कोणीं मुळींच पडलीं नाहीत. जेवण खोलींतच घ्यावयाचें; इतर सर्व विधी त्या खोलीच्या आंतल्या बाजूस असलेल्या क्लाझेटमध्ये करावयाचे असे कांहीं दिवस त्यांनीं घालविले. मोठमोठ्या हॉटेलांत प्रत्येक खोलीला एक क्लाझेट जोडलेलें असते. व त्यांतच फ्लशचा पायखाना, शावरबाथ व टबबाथ यांची सोय असते. असली खोली जोडप्यास रहावयास किती तरी पसंत. एकटें एकटेच स्नान करीत असलें म्हणजे पाठ धुण्याची नेहेमी पंचाईत पडते तसली पचाईत दंपतीस पडत नाहीं आणि खोलींतच स्नानगृह असलें म्हणजे अनेक गोष्टी सोप्या होतात रघुनंदन स्नानाला जाऊं लागला तेव्हां त्याला स्नानाला मदत करण्यास मयूरी तयार झाली. ती म्हणाली कीं तुला स्नान घालायला मी येते, मला घोडा धुवायची संवय आहेच. पूर्वी मी घोडयावर बसून फिरावयाला जात असे तेव्हां पुष्कळदां मौजेने मी घोडयाला आंघोळ स्वतः घातली आहेच. रघुनंदन म्हणाला तूं मला काय घोडा समजतेस तुला थप्पड पाहिजे काय ?

हे बोलणे चालले होतें, तेव्हां मयूरी पलंगावर बसली होती आणि पलंगा शेजारीच रघू सेफ्टीरेझरने हजामत करीत होता. तेव्हां मयूरी सहज पलंगावर उभी राहिली व रघूच्या कमरेवर एकदम स्वार झाली आणि घोडयास हांकण्याचा अविर्भाव करूं लागली. रघुनंदनास हजामत अर्धीच टाकून देऊन मयूरीचा समाचार घ्यावा लागला. प्रथम मयूरीच्या इच्छेप्रमाणें रघुनंदन घोडेपणा कबूल करून खोलींत इकडे तिकडे हिंडू लागला तेव्हा घोडयाने लौकर हिंडावें म्हणून मयूरीच थपडा मारूं लागली. तेव्हां रघुनदन म्हणाला फार शहाणपणा करूं नको घोडा बेफाम होईल आणि चटकन खोलीबाहेर जाईल. मयूरी म्हणाली "जाईना" मयूरीच्या अंगावर त्या वेळेस कपडे फारच अपुरे होते, तेव्हां तो म्हणाला "तुला लोकांनीं असें उघडे पहायला मनाला हरकत वाटत नाही काय?" ती म्हणाली "तुझीच इच्छा असली तर माझी हरकत मुळींच नाहीं." तेव्हां रघुनंदन म्हणाला कीं "तूं अगदी निर्लज्ज आहेस आणि फाजील आहेस." मयूरी म्हणाली "मुळींच नाहीं. बायकोचें शरीर किती उघडें असावें व किती झाकलेलें असावे हें नवऱ्याच्या इच्छेप्रमाणें ठरतें. बायकोचें शरीर वाजवीपेक्षां जास्त दृष्टीस पडलें तर ते नुकसान कोणाचें नवऱ्याचें कीं बायकोचे. मला या स्थितींत लोकांनीं पहायला तुझी हरकत नसली तर माझी कोठून असणार?"

रघुनंदन म्हणाला कीं "अलीकडच्या पोरी फाजील झाल्या असे मी अमेरिकेंतच ऐकत होतों, पण मला असे वाटले नव्हते कीं हिंदुस्थानच्या मुली देखील चावट होत चालल्या असतील. काय तुमची फायद्या तोटयाची कल्पना. त्या कल्पनेत लॉजिक आहे हें मात्र कबूल केलें पाहिजे. उतरआतां, तूं देखील फार हलकी नाहींस."

हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर उतरल्यापासून रघुनंदन कामत हा सर्व गोष्टी मोठया कौतुकानें पहात होता. त्याचा हिंदुस्थानांतला निवास फार थोडया दिवसांचा असल्यामुळे त्यास या थोडक्या दिवसांत काय करूं आणि काय नाहीं असे झाले होतें. त्याच्या अंगांत अगोदरच हसलिंगची संवय आणि त्यांत आपला निवास थोडेच दिवस आहे तर जें काय पहावयाचे ते थोडया दिवसांत सर्व कांहीं पहाण्याची अवश्यकता व त्यामुळे त्याची घाई विशेष वृद्धिंगत झाली होती. त्याच्यापुढे प्रश्न हा होता की बायकोबरोबर मुबईंतच बागडत रहावे आणि नवपरिणीत जोडप्याला जी मजा करायाची ती करावी, किंवा इकडे तिकडे हिंडावें. इकडे तिकडे हिंडायचें म्हणजे बायकोबरोबर मुंबईंत मजा करायची धंधि जाते, आणि मुंबईंतच रहावे तर हिंदुस्थान पहावयाचे रहाते. बायकोचें म्हणणे होते कीं जे थोडे दिवस हिंदुस्थानांत आहेत ते सर्व देश बघण्यांत घालवूं नये आपण घर करून कुटुंबी मंडळींप्रमाणे एकत्र रहावयाचें तें कसें साध्य होणार. आपण लग्न केल्यानंतर नवऱ्याला कसें खूष करूं यासबंधानें मनांत अनेक चित्रें मयूरीनें रंगविलीं होतीं. व आपण आपल्या नवऱ्याबरोबर मोटारीत हिंडत असतां मोटार अगदीं हळु हळु चालवावी आणि लोकांनी आपल्याकडे पहात रहावे अशी तिची फारच तीव्र इच्छा होती. तसेच आपल्या अनेक ओळखीच्या मैत्रिणींनां आपला उंच, मजबूत शरीराचा आणि उत्साहपूर्ण आणि हिंदुस्थानी मंडळींत असलेल्या चापल्यापेक्षां अत्यंत निराळें चापल्य असलेला नवरा दाखवावा आणि त्यांनां आपल्याविषयीं मत्सर उत्पन्न होईल तो पाहून आपण कृतार्थ व्हावें ही इच्छा होती.

इंग्लंडमध्ये असतां रघुनंदन जरी बराचसा वेळ मयूरीपाशी घालवी तरी त्याची दृष्टि केवळ तरुण पोरीबरोबर मजा मारावी एवढीच नव्हती. तो जिकडे तिकडे जात असे पण तो कधीं एकटा जावयाचा नाहीं तो मयूरीबरोबर जाई, त्यामुळें व नेहेमींच्या वृत्तींत अगदीं अल्लडपणा दाखवी, तरी त्याच्या आयुष्यक्रमांत गंभीर वृत्तीचे कांहीं एक नव्हतें असे नाहीं. उलट तो तेथील किंवा अमेरिकेंतील अनेक हिंदूंपेक्षां हिंदुस्थानच्या सामाजिक व राजकीय प्रश्नावर अधिक माहिती असलेला व अधिक विचार करणारा होता. त्याच्या आयुष्याचे गांभीर्य त्याच्या उल्लसित वृत्तीखालीं लपत असे, तथापि हुशार अर्थशास्त्रज्ञ म्हणून त्याची प्रसिद्धि होती ती विशेषेंकरून कोलंबियांतील सामाजिक राजकीय आणि आर्थिक विषयांच्या अभ्यासकांतच होती. त्याचे खरे स्वरूप डॉ. सरंजामे यांस ठाऊक होतें, पण तितकें त्याच्या बापालाहि ठाऊक होतें कीं नाहीं कोण जाणें. घरांत असतां त्याचा वेळ खेळाडूपणांत जाई; व त्याचे वाचन तो कोलंबियायुनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत करी. वाचनाचीं कांहीं टिपणें तो घरीं आणीत असे एवढेंच. घरीं लोकांवर टीका करणे, वर्तमानपत्रांतून आलेल्या गोष्टींवर चर्चा करणें, लग्नें, घटस्फोट इत्यादि गोष्टींमध्ये जे विचित्र प्रकार ऐकूं येतील त्यांच्यावर निळया पेन्सिलीच्या खुणा करून त्या आईस दाखविणे, इत्यादि प्रकारांमुळें त्याच्या आयुष्याला किंवा आयुष्यविषयक विचाराला गंभीर स्वरूप असेल असें त्याच्या बापाला समजणार तरी कसे ? जेव्हां तो आपल्या बापाचाच ट्राव्हलिंग सेल्समन बनला, आणि बऱ्याच हिंदुस्थानी मालाला मागणी मिळवून त्यानें पैसे मिळविले तेव्हां

त्या पोरामध्यें कांहीं पाणी आहे ही गोष्ट बापाच्या नजरेस आली.जेव्हां विशेष शक्ति वापरण्याचे प्रयोजन नसे तेव्हां ती दाखवावी कां? लोकांमध्ये आपण हुशार आहोंत अशी कीर्ति झाली तरी तिनें काय मिळणार आहे. त्या कीर्तीने दोन पैसे तर कधींच मिळणार नाहींत; तर आपली विद्वत्ता आपल्या प्रोफेसराच्या नजरेस पडली म्हणजे पुरे, इतरांच्या दृष्टीस आपण खेळाडू आहोत हे ठाऊक असले म्हणजे झाले. इतर लोकाचा उपयोग काय तर आपण धंदा करीत असलों म्हणजे मालाचे ग्राहक ते लोक होतात म्हणून.दररोज भेटणाऱ्या सामान्य मनुष्याचा आपणास उपयोग काय तर पत्ते खेळण्यास, किंवा टेनिस खेळण्यास दुसरी माणसे लागतात म्हणून. यासाठीं लोकांमध्ये आपली खेळाडू म्हणून प्रसिद्धि झालेली पुरे. अशी त्याची मनोरचना बनली होती.

लंडन येथें असतां त्याला लागणारी बरीचशी अवलोकने त्याने मत्तमयूरीबरोबर फिरत फिरत असता केली. पण त्याचे अवलोकन चालले आहे हे पुष्कळांच्या लक्षांत आलेहि नसेल. हिंदुस्थानास निघण्यासाठीं जेव्हां त्यांनी यूरोपचा किनारा सोडला तेव्हां त्याचे हिंदुस्थानांतील कार्यक्रमासंबधाने विचार सुरू झाले त्याला असे वाटले कीं हिंदुस्थानांत आपल्याला अनेक स्थळे पहावयाचीच आहेत आणि आपल्याला बायकोबरोबरहि रहावयाचेच आहे. लग्न करायचे ते काय बायकोपासून दूर रहाण्यासाठीं? अर्थात् नव्हे. त्याने त्यासबंधी असा विचार केला कीं सात आठ दिवस मुंबईस रहावे. मयूरीची नवरा घेऊन मिरवायची हौस थोडीबहुत त्या वेळांत पुरी होईल. आणि त्याच्यानंतर आपण जसे चोहोंकडे फिरायला जाऊं इच्छितो तर मयूरीलाहि बरोबर रहायला काय हरकत आहे. मयूरीची प्रॉक्टिस जर या मधल्या काळाने दुखावली गेली नाहीं तर आणखी काही वेळ जर तिने प्रवास केला तर आणखी कितीशी दुखावेल. मयूरीनें ता प्रश्न सुरू झाला असतां असे उत्तर दिले कीं मी जी प्रॉक्टिस करणार ती आपण कामांत गुंतलें असावे या हेतूनेच करते. जर आपण एकत्र प्रवासाचाच विचार ठरविला तर त्या योजनेस माझी फारसी हरकत नाहीं. तूं एकटयानेंच प्रवास करावास याला माझी खरी हरकत आहे. अमेरिकेंतल्या हिंदुस्थानविषयीं प्रेम बाळगणाऱ्या मंडळीनी हिंदुस्थानासाठी काय करावें यावर रघूस विचार करावयाचा होता आणि त्यासाठीं हिंदुस्थानांत अवलोकने करावयाची होतीं. तीं सामान्य "ग्लोब ट्राटर"पेक्षां निरनिराळ्या प्रकारची होती. त्याला अगोदर हिंदुस्थानांतले अनेक लोक गोरेपणाच्या कसोटीने पहावयाचे होते. त्याला असे वाटे कीं जर अमेरिकेतील हिंदी लोकांनां हिंदुस्थानी लोकाची वसाहत वाढविण्याचा निश्चयात्मक प्रयत्न करावयाचा असला तर हिंदूंमध्ये जास्त गोऱ्या जाती कोणच्या आहेत हे पहावे, आणि ज्या अधिक जाती गोऱ्या असतील त्यांसच अमेरिकेंत वसाहत करण्यास उत्तेजन द्यावे. तसेच सांपत्तिक स्थिति सुधारल्यामुळे स्त्रियांचा काळा वर्ण जाऊन त्यांच्याठायी गोरेपणा येण्याचा कितपत संभव आहे हे पहावयाचे होते. कां कीं जर हिंदुस्थानातील जास्त गोऱ्या जातीच अमेरिकेत जाऊं लागल्या तर अमेरिकेन लोकांनां त्यांच्याविषयीं आपलेपणा अधिक वाटेल. तसेच हिंदुस्थानांतील सर्व व्यवहार लहान प्रमाणावर कसे होतात त्याचे प्रत्यक्ष चित्र पहावयाचे होते, त्यांपैकी बऱ्याच गोष्टी प्रत्यक्ष मुंबईतच त्याला दिसल्या. जुन्या तऱ्हेने चाललेलें धोबी काम, चुना मळणे, घाण्यावर तेल काढणे, रंगाऱ्याने कपडे रंगवणे, हातामागावरील कामे यांसारख्या गोष्टी त्याने पाहिल्या पण त्याबरोबरच यूरोपियन पद्धतीप्रमाणें चाललेलें कारखानेदेखील पहिले आणि ते कितपत फायदेशीर चालले आहेत हें

पाहून जे कांहीं निर्णय काढावयाचे ते काढले; मजुरांची स्थिति पाहिली आणि त्यांची स्थिति इतकी वाईट कां असावी या संबधाचा विचारहि तेथील गिरण्यातील उत्पादनाच्या आंकडयाकडे पाहून केला.

रघूस आणखी एका गोष्टीवर विचार करावयाचा होता, आणि ती म्हटली म्हणजे अमेरिका हिंदूच्या कोणत्या शिक्षणास उपयोगी पडेल. यासाठी प्रथम त्याने अमेरिकन शिक्षणाने जो वर्ग तयार होतो त्यास कार्यक्षेत्र काय आहे, हे ठरविण्यासाठी अवलोकने केली. सरकारी नोकरींकडे लक्ष ठेवून जो शिक्षण घेणार असेल तो अमेरिकेंत शिकावयास न येता ग्रेटब्रिटनमध्ये शिकावयास जाणार? कां की हिंदुस्थान सरकारच्या परिचयाचे चलनी नाणे म्हणजे इंग्लंडचे शिक्षण होय. ज्यास नागरिकत्वाच्या उच्च कल्पना वाढवून सरकारयंत्र सुधारावयाचे आहे त्यास सरकारी यंत्राबाहेरच राहिले पाहिजे. लोकसत्ता अधिक जागृत असलेल्या अमेरिकेत राहून शिकून आणि आपल्या अधिक विकासलेल्या कल्पनाचा सरकारवर परिणाम घडवीत राहिले पाहिजे या दृष्टीनेच अमेरिकन शिक्षणाचा सार्वजनिक आयुष्यास उपयोग होणार, तथापि वैयक्तिक आयुष्यास शिक्षण उपयोगी पडणारे म्हणजे पैसे मिळविण्यास समर्थ करणारे शिक्षण होय. सामान्यतः काही पैसे घरून आणणाऱ्या आणि कांही पैसे अमेरिकेतच मिळविण्याची खटपट करण्यास तयार असलेल्या विद्यार्थ्यांनीच अमेरिकेस यावें असें त्याचें मत झाले. तसली मंडळी म्हणजे ज्यांनां अमेरिकेत काम करावें लागतें असली मंडळी. त्याच मंडळीस मेहनत करण्याची संवय राहील आणि तीच मंडळी औद्योगिक आणि कृषिविषयक गोष्टींकडे लक्ष देऊं शकेल. तीच मंडळी सामान्य उद्योग घेऊन अधिक शास्त्रीय पद्धतीनें आणि मोठ्या प्रमाणावर करतील.

रघूनें आपल्या बायकोबरोबर हिंदुस्थानांतल्या अनेक ठिकाणी प्रवास केल्यानंतर तो मुंबईस कांहीं दिवस होता. त्यावेळेस एक समाजसेवक होऊं इच्छिणारा तरुण मनुष्य त्याच्याकडे आला. तो मुंबईतील एका नायकिणीचा मुलगा होता. या तरुणास रघूस भेटण्याची इच्छा झाली याचे कारण रघू हा समाजशास्त्राचा अभ्यासक आहे इ. मजकूर वर्तमान पत्रांतून त्यानें वाचला होता. या मनुष्याने रघूस भेटावयास यावें हे मयूरीस आवडलें नाही. आणि त्याचे भेट मागण्यासाठीं जेव्हां पत्र आलें तेव्हां त्याच्या कुलाचा पूर्ववृत्तांत मयूरीनें त्यास सांगितला देखील. तेव्हां रघू तिला म्हणाला की, त्याला तर अवश्य भेटलें पाहिजे. जर तो आपल्याकडे आला नसता तर त्याला आपण जाऊन भेटावयास पाहिजे होते, कां कीं जो सामाजिक स्थितीविषयी असंतुष्ट आहे तोच समाजाच्या प्रगतीस कारण होतो. तो तरुण मनुष्य आला व त्यानें रघूला असा प्रश्न केला कीं जी नायकिणीची संतति आपला वंशपरंपरेचा धंदा सोडून देऊं इच्छील तीस कार्यक्षेत्र काय?

रघूने प्रश्न केला, "परंपरागत धंदा कां सोडतात?"

"त्या धंद्याची लोकांत वाईट प्रसिद्धि आहे म्हणून!"

"गाणे आणि नृत्य या गोष्टीच वाईट आहेत काय?"

"मुळींच नाहीत."

"तर मग त्यांकडे दुर्लक्ष कां करावयाचे, लोकांत जर त्याविषयी वाईट मत असेल तर ते चांगलें करण्याचा प्रयत्न केला पाहिजे."

"तो कसा करावयाचा?"

गाणेबजावणें हा धंदा करणाऱ्या ज्या स्त्रिया आहेत त्यांची असोसिएशन करा. ती असोसिएशन रजिस्टर करा, आणि त्या असोसिएशनमध्ये ज्या गाण्याबद्दल प्रसिद्ध नाहींत, ज्या केवळ

वेश्या आहेत, त्यांनां येऊं देऊं नका. पुढें ज्या स्त्रिया गाण्याबजावण्याचा धंदा करतील त्यास तोच धंदा लग्न लावून करण्याबद्दल उत्तेजन द्या. आणि ज्या कॉलेजमधील शिक्षण घेऊन मुली तुमच्यांत तयार होऊं लागल्या आहेत त्यांनां देखील हाच धंदा करण्यास उत्तेजन द्या, आणि याप्रमाणे आपली प्रतिष्ठा वाढवून घ्या ''

"तरी देखील लोक त्यांची निंदा करतील !"

" तर मग एकदां असें करा कोणत्या तरी सोशल कान्फरन्सची वाट पहा, त्या वेळेस एखादा चंदावरकर अध्यक्ष होईल, आणि लग्नामुंजीत नायकिणी बोलवूं नयेत म्हणून ठराव पास होईल असा ठराव पास झाला म्हणजे, तो ठराव प्रपोझ व सेकंड करणाऱ्या लोकांवर व सभाध्यक्षावर प्रामाणिक धंद्याची बदनामी करण्याचा प्रयत्न म्हणून कोर्टांत खटला करा; आणि त्यांनां दाखवा कीं जर कांहीं सुईणी व दाया यांच्या वर्तनामुळे धंद्यास कमीपणा येत नाही किंवा त्या धंद्यावर बहिष्कार घालावा असे कोणी बोलत नाही तर गाण्याबजावण्याच्या धंद्यावर उपजीविका वाईट कशी होते. कोर्टापुढे खेंचावें पंचवीस तीस हजार रुपये डयामेजेस मागावेत आणि तो खटला जिंका किंवा न जिंका तो वर्ष दीड वर्ष चालवून त्यांनां इतकें हैराण करा कीं पुन्हां त्यांची जीभ तसल्या विषयावर बोलण्यास प्रवृत्तच होऊं नये. "

" पण आमचें सामाजिक भवितव्य काय "

तुम्हांस येथें भवितव्य चांगले नसले तर तुम्हीं अमेरिकेंत येऊन निवास करा. तेथील हिंदी मंडळीनें आतां केवळ वैयक्तिक गुणांकडे व शिक्षणाकडेसच लक्ष देण्याचें ठरविले आहे. त्यांच्याशीं एकदम तुमचे लग्न व्यवहार होतील असें नाहीं पण कांहीं तरी होतील आणि तुम्हांस आपणास समाजावेगळे आहोंत असें कधीं भासणार नाहीं जातीकडे किंवा कुलाच्याचकडे पहावयाचें नाहीं हे ध्येय इंडियन सेटलर्स असोसिएशनने निश्चित केलें आहे. त्या संस्थेच्या मताचा व त्यांतील व्यक्तींच्या आयुष्याचा परिणाम हिंदुस्थानावर होईलच.

---

## प्रकरण २३ वें.

## परागंदा व तत्त्वज्ञान.

सेटलर्स असोसिएशनने आपले स्वतंत्र हितसंबंध काय आहेत आणि केवळ हिंदी राजकारणाची एक शाखा म्हणून आपल्या संस्थेस स्वरूप देण्यासाठीं काय अडचणी आहेत याचे सविस्तर विधान करण्याचे कबूल केलें होतें, आणि त्या संस्थेसाठीं तें विधान प्रो. गोगटे यांनी तयार केलें हेच विधान पुढे "फिलासफी ऑफ दी एमिग्रे" म्हणून हिंदी मंडळींत सर्व परिचित झालें हें विधान वाचून दाखवावे कोठे असा प्रश्न उपस्थित झाला. सेटलर्स असोसिएशननें स्वत: यजमान होऊन जुन्या संस्थेस आमंत्रण द्यावे किंवा त्या संस्थेनें जुन्या संस्थेचे पाहुणे म्हणून यावे याची वाटाघाट होऊन आणि चिठ्ठया टाकल्या जाऊन सेटलर्स असोसिएशनने पाहुणे व्हावे असे ठरलें. वाल्डार्फ अस्टोरिआ हॉटेलच्या अनेक सभागृहांपैकीं एका सभागृहांत एका रात्री भोजनोत्तर बैठक झाली. त्या वेळेस न्यूयॉर्कमधील बहुतेक प्रमुख हिंदुस्थानी मंडळी जमली होती, त्यांत कित्येक रसायनशास्त्री, कित्येक व्यापारी आणि कित्यक युनिव्हर्सिटया व कॉलेजें यांतील अध्यापक, व एकदोन वर्तमानपत्रकर्त्यांकडे लेखक म्हणून नोकरी करणारे, कांही मोठमोठाल्या कार्पोरेशनकडे नोकऱ्या करीत असलेले, कांहीं विमा कंपन्यांचे आंकडेशास्त्री आणि कांहीं धर्मोपदेशक स्वामी इतक्या विविध प्रकारची हिंदुस्थानी मंडळी होती व हिंदुस्थानचे कित्येक अमेरिकन स्नेही

देखील त्या प्रसंगास आले होते. डॉक्टर सरंजामे याच्याकडे जमलेल्या मंडळींमध्यें एकमेकांची ओळख करून देण्याचे काम होते. लाला गजपतराय आपला पंजाबी फ्याशनचा पटका बांधून आपले फुगीर गाल आपली उंच शरीरयष्टि शोभवीत होते. भोजनाच्या वेळेस गोविंदराव कामत यांच्याकडे टोस्ट मास्टरचे काम आलें होतें. जेवण झाल्यानंतर गोविंदराव कामत हे तर दोन्हीं संस्थांचे उपाध्यक्ष आणि त्यामुळे भोजनाध्यक्षाचे काम करण्यास ते खरोखरच लायख होते. त्यानी भोजन बरेचसे आटपून जेव्हां फळे व कॉफी पुढे आली तेव्हां ताठ उभे राहून आणि विनोदयुक्त भाषण करून सेटलर्स असोसिएशनला टोस्ट प्रपोझ केला. त्यावेळेस मि. कामत म्हणाले, हिंदुस्थान हा तत्त्ववेत्त्याचा देश म्हणून वेदकालापासून प्रसिद्ध आहे. हिंदुस्थानी मंडळींचा जो वर्ग देशाबाहेर गेला तो तर अधिक विचारक्षम होतो. असल्या बाहेर देशी गेलेल्या हिंदी लोकांच्या संस्थेने आपल्या आयुष्यक्रमाचे स्पष्टीकरण करणारें विधान आज प्रसिद्ध करण्याचे योजिले आहे. तर जगाच्या सामाजिक तत्त्वज्ञानामध्ये आज मोठी भर पडणार आहे. येणेंप्रमाणें बोलून सेटलर्स असोसिएशनचे तत्त्ववेत्ते अध्यक्ष, प्रो. गोगटे यास आपल्या संस्थेच्या व्यवहारनीतीचें विधान करण्यास विनंति केली. तेव्हां प्रो. गोगटे यांनीं आपले विधान वाचून दाखविण्यास सुरवात केली.

"येथे कायम वस्ती करून रहाणाऱ्या लोकांची संस्था निराळी निघाली याबद्दल जुन्या संस्थेस वैषम्य वाटण्याचे कारण नाहीं. आम्ही या संस्थेचे सभासद दुसऱ्या संस्थेचेहि सभासद आहोत पण आम्हांस आमच्या स्वतंत्र स्थानिक हितसंबंधाची जाणीव आहे, व ती आपणांस आम्ही स्पष्ट केली पाहिजे. जे आम्ही येथें रहात आहोत त्यांनां या भूमींत इतर सर्व व्यवहार करणाऱ्यांच्या बरोबरीनें हक्क पाहिजेत. प्रत्येक सुशिक्षिताने अमेरिकेंत रहाण्यापेक्षां हिंदुस्थानातच परत जावें किंवा काय हा प्रश्न अलाहिदा आहे, जे आम्ही येथे रहातो, किंवा ज्या आम्हांस येथें रहावें लागतें त्या आम्हांस येथे नागरिकाचे हक्क मिळविणे, अमेरिकेंतील अत्यंत शिष्ट अशा वर्गांत आमचा अंतर्भाव होणे यासाठीं कराव्या लागणाऱ्या खटपटींकडे आम्हांस लक्ष दिलें पाहिजे. प्रथमतः हे लक्षात ठेवले पाहिजे कीं कांहीं हिंदी मंडळी येथेंच कायम रहाण्याच्या उद्देशाने आली आहे, तर कांहींचा येथे जन्मच झाला आहे. याशिवाय असे झालें आहे कीं पुष्कळ हिंदीमंडळीपाशीं त्यांचे शिक्षण संपल्यानंतर हिंदुस्थानांत जाण्यापुरते भाडयाचे पैसेहि नव्हते, व त्यामुळें त्यांनां येथेच काम धंदा अगर नोकरी करावी लागली, आणि कांहींचीं लग्नेंहि येथेच झालीं आहेत. यांचा आमच्या संस्थेंत अंतर्भाव झाला आहे. याशिवाय हेहि लक्षांत ठेवले पाहिजे कीं, कांहीं मंडळींनां ब्रिटिश साम्राज्यांत परत जाणे धोक्याचे असल्यामुळें येथेच स्थाईक होणे अवश्य झालें आहे. या अनेक कारणांमुळें येथेच कायम राहूं इच्छिणारा वर्ग तयार झाला आहे. हिंदुस्थानाला परत न जातां जो वर्ग अमेरिकेंतच रहातो त्या वर्गास आपल्या देशाशीं निमकहराम इत्यादि विशेषणे देणे सोपे आहे. पण हें लक्षांत ठेवा कीं याच वर्गांत ज्या लोकांनीं हिंदुस्थानांत राज्यक्रांति करण्यासाठीं गदर चळवळ उभारली ती मंडळी होती आणि ती मंडळी देशावर प्रेम करणारी होती, त्या मंडळींनां " देशाचे शत्रू " इत्यादि विशेषणे आपले इंग्रजी राज्यावर प्रेम व्यक्त करण्यासाठी किंवा इंग्रज अधिकाऱ्यांची कृपा संपादन करण्यासाठीं ज्या हिंदी पुढाऱ्यांनीं लावली आहेत त्या पुढाऱ्यांच्या शब्दांस आम्हीं महत्त्व देत नाहीं; एवढेच नव्हे तर कोणीहि स्वतंत्र वृत्तीचा मनुष्य देणार नाही. प्रयत्न केला

आणि तो फसला ही गोष्ट खरी पण त्यावरून ही मंडळी "देशाचे शत्रु" होते. इत्यादि विशेषणे लावणे, म्हणजे नामर्दपणाची कमाल होय."

इतक्यांत गजपतराय बोलले की त्या मंडळींनां "देशाचे शत्रु" मीं कधींच म्हटले नाही. मी त्यांस "अविचारी" म्हणालो एवढेच.

"देशाचे शत्रु" हे शब्द ज्या कांग्रेसची वकीलात करण्यासाठी तुम्ही येथे आला आहांत त्या कांग्रेसच्या तुमच्याइतक्याच प्रसिद्ध पुढाऱ्यांनीं लावल्याचे आपणांस माहीत आहेत काय?"

"होय."

"आणि असे असून त्या तऱ्हेच्या अन्याय्य विशेषणांचा निषेध करण्याचे धैर्य तुम्हांस झाले नाही ही गोष्ट तुम्हीं नाकारतां काय?"

गजपतराय यांनी उत्तर दिलें नाहीं. प्रो. गोगटे यांनीं "विधान' पुढें वाचण्यास सुरवात केली.

"कांहीं असो, एवढे निश्चित आहे कीं येथे कायमची वस्ती करणारा हिंदुस्थानी वर्ग निश्चितपणे स्थापन झाला आहे. या वर्गापुढें केवळ पैसे मिळविण्याचें आणि अमेरिकन नागरिकांच्या समूहांत विलीन होण्याचे ध्येय आहे काय? याविषयीं हें कबूल केले पाहिजे कीं, येथील कांहीं वर्गामध्ये वैयक्तिक हितापलीकडे लक्ष न देणारा वर्ग आहे. पण तसा वर्ग येथें आलेल्या प्रत्येक राष्ट्राच्या लोकांत आहे, आणि त्यांच्याशीं जर तुलना केली तर आपल्या मायदेशाची आठवण ठेवणारा वर्ग येथील हिंदी लोकांत इतर राष्ट्राच्या लोकांपेक्षां जास्तच आहे. वैयक्तित हिताकडेसच लक्ष देण्याची प्रवृत्ति कांहीं मडळींत दिसून आली असेल तथापि आपल्या भारतविषयक कर्तव्यांविषयीं जागृति ठेवणारा वर्ग स्थानिक हिंदी मंडळींत इतका आहे कीं तो येथील एकंदर हिंदी जनतेवर आपलें वजन ठेवूं शकेल. आपलें आयुष्य येथेंच सर्व जाणार हेंच भवितव्य ज्यांस दिसत आहे त्या मडळींमध्यें भारतविषयक दृष्टि नष्ट झाली नाही, तर आपल्या विदेशीं निवासामुळें आपणांस हिंदुस्थानची सेवा अधिक चांगल्या तऱ्हेनें करतां येईल अशी त्यांची कल्पना आहे; आणि या वर्गाच्याच कल्पना मी आपल्यापुढें मांडीत आहें. या कल्पनांस सामुच्चायिक नांव काय द्यावें म्हणून मी विचारांत होतो, पण ती माझी अडचण लाला गजपतराय यांनीं सोडविली. आमचे कांहा विचार लालाजींच्या दृष्टीस पडले त्यांनी त्यांस "परागंदा आयडियाज" म्हणजे देशोधडी लागलेल्यांचे विचार असें नांव दिले आहे. या नांवाचा आपण मोठया आनंदानें सत्कार करूं.

आमच्या मते येथे असलेल्या समाजाकडून जें मुख्य कार्य होईल तें हें कीं भारतीयांच्या राष्ट्रीकरणासाठीं प्रारंभ म्हणून जी केंद्रवर्ती जात तयार व्हावयाची ती जात तयार करण्याचे होय.

देशासाठीं उच्च संस्कृतीची वाहक अशी एक मोठी उघडया तोंडाची जात तयार व्हावयास पाहिजे. त्या जातीत अर्थात् वाटेल त्या कर्तृत्ववान् लोकांचा प्रवेश झाला पाहिजे. असे झाले तरच तिला उघडया तोंडाचे म्हणतां येईल. तिला वर्ग शब्द न वापरतां जात शब्द मी वापरतो याचे मुख्य कारण असे कीं, एका जातीच्या निरनिराळ्या मंडळींमध्यें जी एकत्वाची भावना असत ती या कर्तृत्ववान् वर्गांत उत्पन्न व्हावी. असला वर्ग म्हणजे राष्ट्रीय उच्च वर्ग होय. एखाद्या राष्ट्राच्या उच्च वर्गाच्याठायीं त्या देशांतली विद्या, शौर्य, आणि द्रव्य यांचें एकीकरण झाले असते आणि म्हणूनच तो वर्ग उच्चत्वाला पोंचतो. हिंदुस्थानामध्ये राष्ट्रीय उच्चवर्गाची अत्यंत आवश्यकता आहे. पण तसला उच्च वर्ग हिंदुस्थानांत तयार होईल असें वाटत नाहीं ज्या वर्गाशीं देशांतील सर्व वर्गाचे लोक लग्न व्यवहार करूं इच्छितील असा तो उच्च

वर्ग बनला पाहिजे, आणि तो वर्ग सहानुभूतीने सर्व देशांशीं संबद्ध असला पाहिजे. असला वर्ग तयार होणें म्हणजे खऱ्या राष्ट्रीयत्वाला प्रारंभ झाला असें म्हणावे, हिंदुस्थानामध्यें हा राष्ट्रीय उच्च वर्ग तयार होणें अशक्य आहे कां कीं सर्व हिंदुस्थान एका ठिकाणी केंद्रीभूत होतच नाहीं. हिंदुस्थान जर एका शहरीं किंवा लहानशा भागांत केंद्रीभूत झालें असतें तर असला वर्ग निर्माण होणें शक्य होते. तथापि, तेवढ्यानेच कार्य भागत नाहीं. जो मनुष्य प्रगतीच्या रस्त्यावर जाऊं इच्छील त्याची तंगडी खेचणारे लोक अगदी त्यांसभोवतालीं नकोत. मागासलेल्या विचारांच्या स्वजनाशीं एकसारखा संपर्क असतां आणि प्रत्येक व्यक्ति आपल्या गांवढळ आणि जातीच्या विचाराने गराडली गेली आहे, अशा स्थितीत तिच्या हातून स्वतंत्रपणें आचरण शक्यच नाही. महाराष्ट्रांत भांडारकर, चंदावरकर हे जातीभेद नको म्हणून सात मजल्यावरून ओरडत होते. परंतु त्यांच्या हातून जन्मांत त्यांच्या मुलांच्या लग्नव्यवहारांत पोटजातींपलकिडे जाण्याचीहि सुधारणा झाली नाही. याच्यावरून चंदावरकर, भांडारकर लुच्चे आहेत असा निष्कर्ष कित्येक लोक काढीत असतील. मी तसा काढणार नाही. ते ज्या परिस्थितीत आहेत त्या परिस्थितीमध्यें त्यांच्या हातून यांपेक्षां जास्त क्रिया करणे अशक्य होते. ते हिंदुस्थानांत आहेत आणि त्यांची हिंदुस्थानीय परिस्थिति त्यांनां इतकी विकट भासली की, ते आजपर्यंत आपण दुसऱ्या जातीच्या पंक्तीला जेवण्याची बहादुरी केली एवढ्या गोष्टीबद्दलच गर्व बाळगीत आहेत आणि असल्या बाष्कळ गोष्टी सांगत सांगतच ते मरतील. आणि येथें तसेच लंडन येथे वस्ती करणारा हिंदुस्थानी खानसमा देखील इंग्रज मुलींशीं लग्न करतो. म्हणजे जातीच्या कल्पनेच्या विरुद्ध वागण्याचें धैर्य दाखवितो. आणि येथें असलेला कोणताहि मनुष्य वाटेल त्याच्या हातचें खातो. तर या खानसमादींचे "मॅारल करेज" भांडारकर, चंदावरकरापेक्षां उच्च धरावयाचे काय ? अर्थात नाहीं तर अर्थात जातीभेदाच्या बंधांपासून अलिप्त राहून राष्ट्रस्वरूपी निराळी जात बनविण्याची क्रिया हिंदुस्थानमध्यें न होतां लंडन, न्यूयॉर्कमध्येंच होईल. म्हणजे परागंदा झालेल्या लोकांकडूनच होईल अशी आमची अपेक्षा आहे.

"येथलि भारतीयांचा समाज आज लहान आहे आणि जो आहे तो बऱ्याच गरीब लोकाचा बनला आहे. येथे आलेल्या बऱ्याच मंडळींपाशीं आले त्या वेळेस ५०० रुपये देखील जवळ नव्हेत. तर अशी मडळी हिंदुस्थानी लोकांचा उच्च वर्ग होईल काय ? या वर्गाकडे हिंदुस्थानी लोक आदरपूर्वक पहातील काय ? हा प्रश्न आहे. माझे असें मत झाले आहे कीं, आम्हीं आजचे परागंदा झालेले गरीब लोक भावी हिंदुस्थानचा उच्च वर्ग होणारच आहोत. संस्कृतीच्या विकासावर मनुष्यसमूहास मोठेपण येतें आणि संस्कृतीचा विकास शास्त्रविकासावर, शिक्षणावर, उत्पादनशक्तीवर व रहाणीच्या उच्चतेवर अवलंबून असतो. हिंदुस्थानामध्ये शास्त्राचा विकास फारसा होणे शक्य नाही. कांकीं शास्त्रविकास हा भोवतालच्या औद्योगिक परिस्थितींशीं संयुक्त असतो. भोवताली जर उद्योग धंद्याची वाढ होऊन शास्त्रीय ज्ञानाच्या माणसांची गरज उत्पन्न झाली, तरच राष्ट्रांत शास्त्रविकास होणार. आज हिंदुस्थानांत सर्व व्यवहार वाढत जाण्यास शास्त्रीय ज्ञानांच्या माणसांची, मोठमोठीं कार्यें करण्यास लागणारी उरकशक्ती असलेल्या माणसांची तशीच मोठ्या भांडवलाची उणीव आहे. शास्त्रीय ज्ञानाची, उरकशक्तीचीं व भांडवलाची माणसें हीं ज्या देशांत जवळ जवळ असतील किंवा वारंवार सहजगत्या भेटतील त्या ठिकाणीं मोठमोठ्या

योजना तयार होणार. अर्थात त्या योजना हिंदुस्थानांत तयार होणार नाहींत. म्हणजे हिंदुस्थानाच्या विकासासाठी लागणाऱ्या योजना लंडन येथेंच होतात, हें आपणांस अनेक रेल्वे कंपन्यांच्या उदाहरणावरून स्पष्ट समजणार आहे. यासाठीं बराच काळपर्यंत हिंदुस्थानच्या विकासाचे कार्य दूरस्थांकडून होणार हे लक्षांत ठेविले पाहिजे.हे लक्षात ठेविलें असता या विकासक्रमांत आज जो केवळ परकेच लोक भाग घेत आहेत, त्याच्याऐवजीं आपणच तो भाग हळू हळू घेत जाणें अवश्य आहे. या गोष्टीचे महत्त्व हिंदुस्थानांतील लोकांनीं आपल्या डोळ्यांसमोर ठेवावयास नको काय ? हिंदुस्थानाच्या विकासाच्या अत्यंत मोठमोठया योजना जशा लडन येथे होऊ शकतील तशाच न्यूयॉर्क येथे होऊं शकतील. तर हिंदुस्थानाबाहेर राहणाऱ्या लोकांनां हिंदुस्थानीय विकासाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचा कार्यक्रम हाती घेण्याजोगा आहे. विदेशीं गेलेल्या लोकांचे काम केवळ हिंदुस्थानीय वकीलांच्या किंवा मध्यम वर्गाच्या विचाराची री ओढणे हे खास नव्हे. या गोष्टीची जाणीव आम्हांला आहे, पण ती जाणीव हिंदुस्थानांतील राजकीय चळवळयांनी देखील करून घेतली पाहिजे.

जो उच्च वर्ग असतो त्याची रहाणी उच्च प्रकारची असली पाहिजे व तो इतर वर्गापेक्षा सुशिक्षित असला पाहिजे अशी इतरांची अपेक्षा असते ही अपेक्षा येथे असलेल्या हिंदुस्थानीय मंडळींसंबंधाने सहजच पुरी होईल येथील मजुरांचे खाणेंपिणे व पोषाख इत्यादि रहाणी ही हिंदुस्थानांतील मध्यम वर्गामध्यें ब्यारिस्टरांचा व डॉक्टरांचा जो उच्चतर वर्ग आहे त्या वर्गाच्या राहाणीपेक्षां अधिक चांगली आहे हे तुम्ही दररोज पाहतां. शिक्षणाविषयीं म्हणाल तर येथील अगदी सामान्य मुलगी देखील हायस्कूलचें शिक्षण पुरें करते. आणि या न्यूयॉर्क संस्थानांत तर १९१६ सालापासून १८ व्या वर्षापर्यंत शिक्षणाची सक्ति झाली आहे. आणि हें शिक्षण त्यांनां स्वभावेंतूनच मिळणार. आणि हे शिक्षण मिळत असतां व शास्त्रीय साधनांचे वैपुल्य असतां, येथील शिक्षण अनेकांगी असल्याने येथील नागरिक अत्यंत कार्यक्षम होणार. हिंदुस्थानांतल्या कॉलेजांतून बाहेर पडणाऱ्या मनुष्यापेक्षां येथील न्हावी किंवा रस्तेझाडू अधिक सुशिक्षित असणार; तर या ठिकाणी राहणारा भारतीयांचा वर्ग सरसकट शिक्षणदृष्ट्या हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांच्या तोडीचा बनेल ही अपेक्षा चुकीची होईल काय? त्याप्रमाणेच येथील शास्त्रसेवक वर्ग भारतीय विद्वानांपेक्षां किती तरी उच्च प्रकारचा तयार होईल.

समाजाचा उच्च वर्ग जसा विद्या, शौर्य आणि द्रव्य यांही युक्त असला पाहिजे तसाच तो खुळ्या कल्पनांपासून दूर असला पाहिजे. जातिविषयक दुरभिमान, कुलविषयक दुरभिमान हा उच्च वर्गास संकुचित स्वरूप आणूं पहातो. या उच्च वर्गाने अमुक मनुष्य दासीपुत्र आहे, अमुक मनुष्य वेश्याकुलांत जन्मला आहे इत्यादि कल्पना मनांत आणतां कामा नयेत. सर्व देशांतल्या सर्व प्रकारच्या समाजांत या अधर्मसंततीविषयी जुगुप्सा असते पण हिंदुस्थानांत ती तर फारच तीव्रत्वाला पोचली आहे; हिंदुस्थानांत या जुगुप्सेचे परिणाम केवळ अकरमाशांच्या जातीला लघुत्व आणण्यावरच थांबले नाहीत तर ते परिणाम फार दूरवर पोचले आहेत. त्या प्रकारच्या मुलांचे संगोपन करण्यास ज्याना मुले नाहीत असा वर्गहि तयार होणार नाही.

ज्या मुलांचे आईबाप वारले आहेत अशीं मुले दत्तक घ्यावयाचीं झाली तर हिंदु धर्मशास्त्राचा खून झाला म्हणून देशांतले इग्रजांच्या पुस्तकांतून

हिंदू धर्मशास्त्र पढलेले वकील ओरडूं लागतील; आणि तेथील न्यायाधीश तसलें दत्तविधान बेकायदेशीर ठरवितात; सामान्य पोरक्या मुलांबद्दल देशास जर इतकी काळजी, तर अधर्मसंततीची काळजी कोण करतो? अधर्मसंततीची काळजी तर कोणी घेणारच नाही पण त्या संततीची काळजी ख्रिस्ती मंडळींनीं घेतली तर आम्हांस वाईटच वाटते. आपला समाज जातीच्या कल्पनांनीं इतकी नियमित की आहे अधर्मसततीचा कोणत्याहि समाजांत प्रवेश होत नाहीं. दर शभर जनना-मध्ये तीनपासून बारापर्यंत अधर्मसंततीचे प्रमाण असते तर ज्या समाजांत यांची सोय नाही तो समाज बालहत्या करणारा होय. हिंदुस्थान-सारख्या देशांत जर हीं अधर्मसंततीचीं मुलें गोळा करून त्यांचे रक्षण पद्धतशीर झाले तर तीं मुले एक मोठी स्वतंत्र बलवान जात होईल; आज तीं मुले ख्रिस्ती व मुसुलमान समाजात शिरत आहेत. या सर्व गोष्टींनां प्रतिकार हिंदु करीत नाहींत याचें कारण ते जगाबाहेरचे अमानुष आचरणाचे लोक आहेत अशांतला भाग नाहीं. ज्या जातीचे तोड उघडे आहे अशी जातच हिंदूंत नाहीं. आणि त्यामुळे जे कोणत्याच जातीचे नाहीत त्यांनां ज्या वर्गांत शिरतां येईल असा वर्गच नाहीं आणि या वर्गाची जोपासना हिंदुस्थानच्या हवेत शक्यच नाहीं. यासाठीं मी असे सुचवितो की या उघडया तोंडाच्या राष्ट्रीय जातीने अधर्मसंततीची घाण न बाळगतां त्या प्रकारच्या समाजांतील योग्य व्यक्तींचा समावेश आपल्यामध्ये निर्भयपणे करून घेतला पाहिजे. प्रत्येक ब्राह्मणाने हे लक्षांत ठेवावे कीं मोठमोठे ऋषीदेखील अधर्म व्यवहारानें उत्पन्न झालेले आहेत. येथें हिंदी रक्ताची राष्ट्ररूपी उघडया तोंडाची जात निर्माण करावयाची, तिचें गुणकर्मावरच उच्चत्व राखावयाचें, आणि तींत वाटेल त्या जातीसच केवळ नव्हे तर अधर्म सततीसहि उघडपणें स्थान द्यावयाचे ही क्रिया हिंदुस्थानांत शक्य आहे काय?

शेतकरी आपल्या बियांचीं रोपें करण्यासाठी ते बीं कांही विशिष्ट परिस्थितीत आणि विशिष्ट तयार केलेल्या जमीनींत उगवितो आणि रोप तयार झालें म्हणजे आपल्या नेहेमींच्या जमीनींत नेऊन लावतो, ही ज्याप्रमाणें शेत तयार करण्याची पद्धत आहे तीच सामाजिक व्यवहारांत लावावी लागते. हिदुस्थानाला उच्च स्थितींत आणण्याचे जे मोठे कार्य आहे ते कार्य करणारे कर्तृत्ववान लोक आजच्या हिंदुस्थानच्या परिस्थितींत उत्पन्न होणार नाहींत. वीरांची "नर्सरी" आज इंग्रजांपुढे त्यांचे फटके खाऊन नमणाऱ्या लोकांनीं व्यापलेल्या देशांत तयार व्हावयाची नाहीं. पूर्वी राज्यक्रांति झाली असतां राज्याचा हक्कदार अल्पवयी राजा ज्याप्रमाणे ते राज्य सोडून अन्य राज्यांत जाऊन रहातो त्याप्रमाणेच ही देखील गोष्ट आहे. ज्या देशातील वातावरण आज पूर्णपणे दूषित झाले आहे त्या देशांत देशास उच्चत्वाला नेणारीं माणसे मुळींच तयार होणार नाहींत. दौर्बल्य, व दडपशाही, यांच्या योगाने श्रेष्ठ गुणांचा विकास कधींच व्हावयाचा नाहीं. हिंदुस्थानाचें राज्य गेलें आणि त्यास सस्कृतीच्या दृष्टीनें जी हलकी पदवी प्राप्त झाली तिचें कारण संस्कृतीच्या विकासासाठीं ज्या विविध प्रकारच्या व्यक्ती लागतात त्या व्यक्तींच्या वाढीला लागणारे व्यक्तीस्वातंत्र्य हिंदुस्थानांत नष्ट झालें आहे, आणि आज जरी तेथील समाज स्वतंत्र बुद्धीच्या मनुष्याला शिक्षा करण्याच्या दृष्टीने बलहीन झाला आहे तरी स्वतत्र बुद्धीच्या मनुष्याची वाढ होऊ नये अशा तऱ्हेचे वातावरण गेले नाहीं. त्या प्रकारच्या मनुष्याचा अधिक अनूकूल भूमीत विकास होईल तर तो हिंदुस्थानाचें कार्य अधिक करील. अधिक सुशिक्षित आणि अधिक कार्यक्षम आणि स्वयंशासक अशा समाजांत हिदुस्थानी मंडळी राहिल्याशिवाय हिंदुस्थानाचीं

वैगुण्ये तरी कशीं समजणार. ज्याप्रमाणे इंग्लंड किंवा अमेरिका येथे शिक्षण घेतलेला विद्यार्थी हिंदुस्थानांत गेल्यावर तेथील इतर लोकांपेक्षां अधिक कार्यक्षम होतो, त्याप्रमाणें येथेंच वाढलेला भारतीय समाज हिंदुस्थानांतील सुशिक्षित समाजापेक्षां अधिक कार्यक्षम होईल.

या आमच्या नवीन समाजांत स्त्रीपुरुषांचा परस्परव्यवहार एकमेकांशीं अधिक मोकळेपणाने व्हावा आणि त्यामुळे जो एकमेकांचा परिचय चांगला होईल त्या परिचयाच्या पायावर विवाह वेदी बांधली जावी याची आवश्यकता आहे. जातीबाहेर विवाह मुद्दाम आईबापांनी करावे हे कधींच शक्य होणार नाहीं; आणि त्यानी त्या भानगडींत पडतां कामा नये. त्याचा अधिकार मुलांच्या लग्नांच्या बाबतींत "ट्रस्टी"चा आहे. तुम्हाला स्वतःचे पैसे विहिरीत टाकता येतील. पण तुम्ही जर अज्ञानाचे पालक असला तर तुम्हांस अज्ञानाचे पैसे ठरावीक शास्त्रार्थाप्रमाणेच वापरले पाहिजेत. तोच नियम लग्नांत लागू आहे. जर तुम्हांस अज्ञानांचे लग्न करून द्यावयाचे आहे तर ते जातीबाहेर लावून देण्याचा विचारहि करणे योग्य होणार नाही. तुम्हांस स्वतःचे लग्न करावयाचे असलें तर तें तुम्ही जातीबाहेर लावा. आज तुम्हांस हिंदुस्थानांत परिचयमूलक व प्रेममूलक विवाह जुळविण्यास अडचण पडणार. तसले विवाह सुरू झाल्याशिवाय जातिभेद कधीं जाणार नाहीं हिंदुस्थानांत जर तरुण मुली आणि मुलगे बरोबर फिरावयास गेली तर भोवतालच्या व्यक्ती त्यांवर इतकी टीका करतील कीं तें त्यांस नको नकोसे होणार; आणि त्यांत जर मुलगी एका जातीची आणि मुलगा दुसऱ्या जातीचा असें असेल तर विचारावयासच नको या बाबतीत येथे स्वातंत्र्य असणार म्हणून राष्ट्रस्वरूपी जात अमेरिकेतच संवर्धित झाली पाहिजे आणि त्या केंद्रवर्ती जातीनें हिंदुस्थानांतील सर्व जातींशी व्यवहार ठेवून आपल्याच आचारांचा प्रचार केला पाहिजे."

इतक्यांत एका कोंपऱ्यांतला एक महाराष्ट्रीय विद्यार्थी उठून उभा राहिला व म्हणाला "आमच्या पुण्यास फर्ग्युसन कॉलेजा शेजारच्या कालव्याच्या बाजूच्या रस्त्याला अनेक प्रीति विवाह जुळविल्याचे श्रेय मिळालें आहे."

" तर मग त्या कालव्याचे मी अभिनंदन करतो—तथापि हेहि सांगितले पाहिजे की माझ्या बोलण्याला जर कांहीं स्थानिक अपवाद निघाले तर तेवढ्याने माझें मुख्य विधान पालटूं शकत नाही. प्रीतिविवाह अनुनयाच्या संधीशिवाय उत्पन्न होणे शक्य नाही, आणि अनुनयाची संधि हिंदुस्थानांत तरुणांस किंवा तरुणींस आज किंवा येत्या दहा वीस वर्षांत निर्वेध मिळेल असें वाटत नाहीं.

" आमच्यापुढे एक विशिष्ट अर्थशास्त्रीय ध्येय आहे आणि ते ध्येय आमच्या समाजाचें स्वरूप ठरवील. जुन्या जगांतील वैरे आम्हांस येथे जोपासावयाची नाहीत.जुन्या देशांतल्या जमीनीवर ज्यांची सत्ता असते, आणि त्या जमीनीवर ज्यांनां काम करावें लागते त्यांत मालक, कूळ, अशा तऱ्हेचे संबंध उत्पन्न होतात. काम करण्याचे महत्त्व सर्वांस समजलेले नसते, त्यामुळे प्रत्येक बलवान आणि सुशिक्षित व्यक्तीची अशी समजूत होते कीं, मला जे काय मिळवावयाचे ते काम न करतां मिळावे, मी असे कांही तरी सपादावें की ज्यामुळे माझ्या मुलाला तरी गुलामासारखें काम करावे लागूं नये आणि यासाठीं प्रत्येक मनुष्य उत्पन्नावर राहूं इच्छितो किंवा अशा कामासाठी धडपडतो कीं जें काम दुसऱ्या मजल्यावर बसून "स्वच्छ काम" म्हणून करतां येईल. किंवा कांहीं अदृश्य शक्तीच्या पाठिंब्याने ते काम करतां येईल. यामुळे शासक वर्गात जाण्यासाठीं प्रत्येकाची धडपड असते आणि उपाध्याय वर्गाचें

अस्तित्व शक्य होतें. उपाध्याय वर्ग म्हणजे जें कांहीं अदृश्य असेल त्यासंबंधाने कांही तरी थापाथापी करून उपजीविका करणारा वर्ग. धर्म बदलतो म्हणजे एक उपाध्याय वर्ग जाऊन दुसरा उपाध्याय वर्ग येतो, किंवा दोन तऱ्हेच्या उपाध्याय वर्गांची आपल्याभोवती माणसें ठेवण्यांत चुरस उत्पन्न होते. तसें होऊं लागले म्हणजे लोक दोन संस्कृती झगडत आहेत असे बोलूं लागतात. जणू काय कुराणाचें पुस्तक उठून बायबलच्या किंवा वेदांच्या पुस्तकांशींच लढायला लागलें. जुन्या देशांतलें राजकारण म्हणजे काय तर जास्त आळशीपणानें, किंवा कमी मेहनतीनें जो आयुष्यक्रम चालवितां येतो त्यासाठी निरनिराळ्या वर्गांची धडपड. आमच्या या नवीन होणाऱ्या राष्ट्रजातींत आज प्रत्येक व्यक्ति शिक्षणाच्या किंवा परिश्रमाच्या जोरावरच सुख वस्तु होत आहेत. परिश्रम करण्याचे पावित्र्य येथील मनुष्यांच्या मनांवर इतकें ठसलें आहे की तितकें उद्योगवृद्धीच्या मोठमोठया बाता मारणाऱ्या पुढाऱ्यांच्या मनावर ठसले नसेल. आमच्या हिंदुस्थानीय समाजांतील विद्वान संशोधक सदस्य रघुनंदन कामत यांचे असे मत आहे की " परिश्रमाचे पावित्र्य " हे तत्त्व जुन्या जगांतील लोकास आज समजणेच अशक्य आहे. परिश्रम करण्यास काटक असें ज्याचे शरीर आहे आणि तें त्या शरीरवर्धनास अनुकूल असा आहार करून बनले आहे, ते आणि जे लोक अर्वाचीन तऱ्हेने शास्त्रीय शिक्षण घेऊन उद्योगधंद्यांत पडणार तेच हिंदुस्थानाच्या भूमीवर येऊन उत्पादन करूं लागले तरच हिंदुस्थानी समाज जिवंत राहील.

"मी यापेक्षां जास्त सांगूं इच्छीत नाहीं आम्हीं जिवंत आहो एवढेच सांगतो. जिवंत लोक अधिकाधिक विचार करून आपल्या सांघिक आयुष्याचें नियमन करतील."

वरील सर्व विधान ऐकून लाला गजपतराय म्हणाले कीं "येथील हिंदी मंडळींचे देशहित साधनेसाठीं कार्य केवळ दुय्यम स्वरूपाचे नसून तुम्हांस देशाच्या राष्ट्रीकरणासंबंधाने महत्त्वाचे कार्य करतां येईल एवढी जाणीव मला आपल्या विधानानें उत्पन्न होते, तथापि हिंदुस्थानच्या भवितव्यनियमनासंबंधाने महत्त्वाचे कार्य तेथे नाहीं हे म्हणणे आम्हांस पटत नाहीं. हिंदुस्थानचा जनसमूह मोठा आहे त्यावर सर्व सत्ताधारी सरकारहि फारसा परिणाम घडवूं शकत नाहीं तर तुमच्यासारखा देशाभिमानी परंतु अल्प आणि अल्पशक्तीचा समुच्चय काय कार्य करूं शकेल हा आम्हांला प्रश्नच वाटतो. हिंदुस्थानासंबंधानें मुख्य कार्य हिंदुस्थानांतच व्हावयाचे, तर त्यांतील मुख्य कार्यभाग तेथल्याच लोकांच्या हातून पार पडणार आणि बाहेरच्यांचे प्रयत्न जे काय व्हावयाचे ते पूरक होणार, हें स्वाभाविक वाटतें. हिंदी जनतेची जागृति होऊन ती जनता कार्यकर्ती व्हावी त्या जनतेस स्वराज्य मिळावे आणि ते त्यांस चालवितां यावें यासाठी मुख्य प्रयत्नांचें स्थान हिंदुस्थान न होतां अमेरिका होईल हे आम्हीं जरी ग्रहण केलें तरी पचावयास जडच जाईल."

"आपण बोललां तें अगदीं खरें आहे. आमचे कार्य केवळ पूरक असेच होईल. सर्व भारतीय जनता ही भावी हिंदुस्थानांत कार्यकर्ती करावयाची आहे, आणि ती जेव्हां कार्यकर्ती होईल तेव्हांच आपला देश सुधारलेल्या देशांच्या बरोबरीला येईल. आम्हीं जे काय पुरविणार तें प्रगतीसाठी जीं कार्यें करावीं लागणार त्यांचें नेतृत्व होय. खरे कर्ते करविते हिंदुस्थानांतील लोकच आहेत."

लाला गजपतराय म्हणाले तुमच्या संस्थेच्या पाठीमागे असलेली विचारपद्धति मला बरीचशी मान्य होण्यासारखी आहे. व तुमच्या विचारामध्यें

नवीन आलेल्या लोकांकडून व्यत्यय होऊं नये म्हणून तुम्हीं पांच वर्षें रहिवासी झाल्याशिवाय तुमचें सदस्य होऊं न देण्याचा जो नियम केला आहे त्याचेंहि महत्त्व मी ओळखतो, तथापि माझी सहानुभूति दाखविण्यासाठीं जर कोणत्या तरी नियमाप्रमाणे आपल्या संस्थेशीं संबंध जोडण्यांत आला तर मला त्याबद्दल अभिमान वाटेल.

तर मग हिंदुस्थानांतील सहानुभूति बाळगणाऱ्या व्यक्तींचे एक सदर नवीन उघडून त्यांत आपले नांव घालूं. आपणांस मत मात्र असणार नाही.

व्होटची मला मुळींच जरूरी नाहीं मी तुमच्या मतांचा हिंदुस्थानभर प्रचार मोठया आवेशाने करीन अशी आपण खात्री बाळगावी.

---

## प्रकरण २४ वें.

## लीला व विष्णुपंत.

मि. कामत यांना आपल्या आयुष्यक्रमाचा शेवटचा भाग चांगल्या तऱ्हेनें जाईल अशी आशा वाटूं लागली. लीला कोणातरी अमेरिकन तरुणाबरोबर लग्न करील कीं काय अशी शांताबाईस जी धास्ती वाटत होती, ती त्यांची धास्ती नाहींशी झाली एवढेच नव्हे तर जांवई चांगला मिळाल्यामुळे आनंद झाला. मि. कामत हे तर जांवयावर पूर्वीपासूनच खूष होते. आणि त्यांनां नेहमीं काळजी वाटे ती ही कीं, हीं दोघेजण बरोबर फिरावयास इतकीं वर्षें जात आहेत पण त्यांचे जुळत कसें नाहीं. मध्ये लीला गंगाधरावर प्रेम करीत आहे असें त्यांस समजलें होतें तेव्हां त्यांस फारसें दुःख झाले नाहीं. गंगाधरावर प्रेम करण्याच्या निमित्तानें तरी हृदयाला प्रेमसंस्कार झाला म्हणजे तो अनेक उच्च भावना जागृत करील. बरें गंगाधराची बायको जर हिंदुस्थानांतच वारली तर गंगाधरावर प्रेम करणें फलद्रूपहि होईल. गंगाधर हुशार आहे सद्वर्तनी आहे; इंग्रजांचे राज्य हिंदुस्थानावर आहे याबद्दल दुःख करणारा, आणि बडाचे जे कट होतात त्यांशीं संबंध ठेवणारा आहे. पण मनुष्य काय तेवढ्याने वाईट झाला, इत्यादि गोष्टी त्यांच्या मनांत येत असत पण ते बोलत मात्र नसत. पण रुक्मिणी जेव्हां आली तेव्हां आतां पुढे काय होणार हे ते पहात होते. रुक्मिणीच्या आगमनाचे पर्यवसान लीलेकडून सरंजाम्याच्या स्वीकारांत झाले हें पाहून त्यांस आनंद झाला. जांवई गरीब आहे, हिंदुस्थानी आहे, चांगल्या प्रवृत्तीचा आहे, हिदुस्थानी लोकांचा अभिमान धरून सार्वजनिक कार्य करणारा आहे, यापेक्षां जांवई आणखी कसा पाहिजे असें ते प्रो. गोगट्यांनां बोलले. पैसेवाला जांवई पाहण्यांत विशेष मतलब नाहीं, मनुष्य निर्व्यसनी असेल आणि पराक्रमी असेल तर तो पैसा मिळवील. आमचें दोघांचे लग्न झाले त्या वेळेस मजजवळ पैसा कोठें होता. सासरा श्रीमंत होता, आणि त्यांनीं मुलगी देतांना माझ्या पैशाकडे कोठे पाहिले होतें, तर आम्ही तरी कां पहावे असे ते म्हणाले.

लीलेचे डॉ. सरजाम्यांशीं लग्न लाला गजपतराय अमेरिका सोडून गेल्यानंतर लौकरच झालें. लग्न अगोदरच व्हावयाचे, पण लीला रघुनंदनाची वाट पहात होती. रघुनंदनाने जसें लग्न घरीं न कळवतां लावलें तसें लीलेस करावें लागलें नाहीं, याबद्दल लीला रघुनंदनापाशीं जरा तोऱ्यानें बोलली. तेव्हां रघुनंदन म्हणाला कीं, " चोरून लग्न लावण्यांत जी मजा आहे ती तुला काय ठाऊक ? नवीन लग्न झालेल्यांबरोबर घरांतली इतर मडळी नसलेली बरी. बरें तुमचा हनीमून माझ्या हनीमूनपेक्षां अधिक सुखकर होईल अशी व्यवस्था मला केली पाहिजे. मी या बाबतींत तज्ज्ञ झालों आहे. वधूवरांस आपल्या एका मित्राच्या घरीं शेतावर रहाण्यास रघूनें पाठविलें. तो डिसेंबर महिना होता.

हिम सपाटून पडलें होतें. व स्लेज गाडीनें बर्फा-वरून हिंडण्यात खरी मजा होती. कांहीं गाडींत दोनच माणसांनां जागा, थंडीचा काळ, त्यामुळें गरम फरचे कपडे वगैरे घालून जरी फिरावें लागे तरी तें फिरणें न्यूयॉर्कसारख्या गजबज-लेल्या वस्तींत रहाणारास विशेष मजेचें होई. रघुनंदनाचें नुकतेच जरी लग्न झालें होते तरी तो म्हणे कीं " हनीमून उपभोगावयाचे दोन प्रकार आहेत, नवरा बायकोची शरीरप्रकृति धणधाकट असेल, तर अनेक गोष्टी बरोबर एकत्र पहाण्याचें ध्येयच उपयोगी नाहीं. आपल्या खोली-बाहेर जें पडावयाचें ते स्वच्छ हवेसाठींच पडावें दुसऱ्या कशासाठींहि पडूं नये. कपडे चांगले करण्याचीहि अवश्यकता नसावी, यासाठी शहर टाळावें.

"नाटकें पहाण्याचा, किंवा यूरोपांतील किंवा हिंदुस्थानांतील दीर्घकालपरिचित दृश्यें पहाण्याचा काल निराळा आहे. हनीमूनचा मधुकाल या असल्या बाबतींत खर्च करतां कामा नये. तुम्हीं दोघेजणांनीं अनेक देखावे आतांपर्यंत पाहिलेच आहेत. अनेक मौजांच्या ठिकाणीं एकत्र गेला आहांत. तुम्ही जें आतां लग्न लावतां ते एकत्र देखावे पहाण्यासाठीं नसून एकमेकांनां एकमेक हवे आहांत म्हणून; तर तुम्हां एकमेकांचे लक्ष एकमेकांवर केंद्रभूत झालें पाहिजे. आणि तुमच्या मधलें जें अंतर होतें तें अजीबाद नष्ट झालें पाहिजे. तुमच्यांतलें तें अंतर नष्ट होण्याची क्रिया तुम्ही सृष्टिदेवतेचीं दोन पिल्लें म्हणून एकमेकां-शींच बागडाल तेव्हांच होणार आहे. यासाठीं ज्या ठिकाणीं अनेक मौजा आहेत आणि ज्या तुमचें लक्ष ओढतील तीं ठिकाणें तुम्ही टाळलीं पाहि-जेत. आमच्या लग्नानंतर आम्हीं दोघेजण पारिस-मध्यें आपेरा पहावयास गेलों पण ते पैसे फुकट गेले. आपेरा पहात असतां अनेक वेळां हा आपेरा पहाण्यापेक्षां आपण दोघे एकमेकांच्या संगतींत रात्र घालविली असती तर किती तरी बरें झालें असते असे वाटे, आणि अर्थात त्यामुळें नाटकाकडे लक्ष नव्हतें, आणि तरी देखील पैसे पुष्कळ खर्च करून तिकिटें घेतलीं होतीं तेव्हां तें नाटक सोडून हॉटेलमध्यें गेलों नाहीं. पारिस-सारख्या हॉटेलांतील जेवण्यासाठीं डाइनिंग हॉल-मध्ये अनेक व्यक्ती जमत, आणि त्या हॉलमध्यें जाण्यानें देखील कधीं कधीं पंचाईत उत्पन्न होई. एखादी सुंदर पोरगी दिसली म्हणजे तिला डोळे भरून पहाण्याची संवय मला आहे हें तर तुला ठाऊकच आहे. पण ही माझी सौंदर्यविषयक रसि कता मयूरीच्या रागास कारण झाली माझ्या शेजा-रच्या टेबलाशीं एखादी सुस्वरूप तरुणी बसली आणि तिच्या सौंदर्याची तारीफ मी मयूरीपाशीं करूं लागलों म्हणजे मयूरी रागावे आणि तुला दुसऱ्या मुलीच्या सौंदर्याशीं काय करावयाचें आहे असें म्हणे. जणूं काय माझें लग्न झालें म्हणून मी दुसऱ्या स्त्रिया सुंदर आहेत कीं नाहींत या गोष्टीवर आपलें मतच बनवितां कामा नये ? "

"पण माझें मत देखील मयूरीसारखेच आहे."

" तूहि जर मयूरीसारखीच वेडी असलीस तर एकलकोंडेपणांतच तुम्हाला हनीमून काढला पाहिजे. पण एकलकोंडेपणांत सामान आणण्याचा आणि स्वयंपाक करण्याचा त्रास पडतो. तो त्रास हनीमूनच्या गोड दिवसांत नसावा म्हणून मी शेतावर राहावयास जाण्याची सूचना करतो. "

" पण शेतकऱ्याला एखादी देखणी मुलगी नाहींना.—नाहीं तर विष्णु तिच्या सौंदर्याची तारीफ माझ्यापाशीं करावयाचा. "

" मग केली तर काय बिघडलें. "

"तूं माझ्या प्रश्नाचा जाबाब देत नाहींस"

"तुझ्या प्रश्नाचा जबाब द्यावयाचा काय म्हणजे दोन प्रश्नांचें उत्तर द्यावयाचें,शेतकऱ्याला मुलगी आहे काय? आणि ती सुंदर आहे काय? या दोन्हीं प्रश्नांना मी होकारार्थी उत्तर देतों."

" तर मग शेतकऱ्याकडे नको जायला. "

" कां बरें, ती तेथेच आहे, आणि अविवाहित आहे हें तुला कोणी सांगितलें ? "

" येणेंप्रमाणें चर्चा झाली, आणि शेवटीं डॉ. आणि मिसेस सरंजामे यांनीं हनीमूनचे दिवस शेतावरच घालविले. अमेरिकेंत शेतकरी मंडळी फार चांगल्या तऱ्हेने रहातात. दूध व अंडीं फळे यांची चगळ तेथें असते आणि हे जेवण व राहणे याबद्दल फार माफक दर घेऊन " पैसे देणारे पाहुणे " स्वीकारतात. त्यांनांहि शहरांतल्या मंडळींचा सहवास हवा असतो, व शहरांतल्या मंडळीनां शेतावरील स्वास्थ्य हवे असते. यामुळें हा प्रसंग जुळून येतो. हनीमूनचे दोनतीन आठवडे आटपल्यानंतर डॉ. आणि मिसेस सरंजामे न्यूयॉर्कला आले व कांही दिवस डॉ. सरंजामे यांनी

असारे खलु संसारे सार श्वशुरमंदिरम्

या जुन्या सूत्राची सत्यता तपासून हे सूत्र अक्षरशः खरें आहे म्हणून सांगितले. जेवणांत नवीन प्रकारचे पदार्थ दररोज करून जांवयाला खुष करण्यांत शांताबाईंनी बरीच दक्षता दाखविली असली पाहिजे.

लीलेला हिंदुस्थान पहाण्याची इच्छा होती. डॉ. सरंजामे यांनां देखील एक फेरी मारून यावयास हवें होते. पण डॉ. सरंजामे हे कोलंबिया युनिव्हर्सिटींत नोकर असल्यामुळें तो योग एकाएकीं आला नाही. त्यांनां एप्रिलपर्यंत थांबावे लागलें. तथापि ते दोन तीन महिने हीं नव परिणीत वधुवरें स्वतंत्र रहात होतीं. लीला घरांतून गेल्यामुळें मि. आणि मिसेस कामत यांस चुकल्यासारखे थोडेसें वाटले पण फार वाटले नाहीं. दुपारी टेलीफोनवरून मायलेकींच्या गप्पा होत, आणि पुष्कळदां घरचा स्वैपाक करावयाचा चुकवून लीला नवऱ्यास माहेरींच जेवणास नेई. कधीं कधीं दुपारी तिकडे बसावयास जाई ती संध्याकाळीं नवरा घरीं येण्याच्या वेळीं परत येई. लीला नवऱ्याची स्तुति तर पुष्कळच करीत असे पण नवऱ्याविरुद्ध कागाळयाहि करी. त्या कागाळ्यांमध्ये नवरा फार खार्चिक आहे, मला नको असतां विनाकारण पैसे खर्चून माझ्यासाठीं जिन्नसा घेऊन येतो, या प्रकारच्या असत तर कधीं कधीं मला सकाळची झोंप लागली तर न उठवितां स्वतः ब्रेकफस्टची तयारी करून ब्रेकफस्ट आमच्या निजण्याच्या खोलींत आणतो, जणूं काय मी आळशी आहे आणि आपणच मोठें मेहनत करणारे आहोंत असे दाखवितो, या प्रकारच्या असत. या प्रेमाच्या कागाळया ऐकून आईस मोठे समाधान होई.

एप्रिलमध्ये हिंदुस्थानांत जाण्याचा योग आला. युनिव्हर्सिटीने डॉ. सरंजाम्यांची सुटका १ एप्रिल ला केली आणि १९ आक्टोबरपर्यंत आलास तरी हरकत नाहीं म्हणून सरंजाम्यांस अनुज्ञा दिली. मुंबईस मिस्टर आणि मिसेस सरंजामे आली ती डॉ. मत्तमयूरीकडे उतरली हें सांगावयास नकोच.

लीला आणि डॉ. सरजामे हीं दोघेजण हिंदुस्थानांत देश पहाण्यास आलीं होतीं त्या वेळेस तिच्या कांहीं काके मामे बहिणीची व भावांची ओळख झाली आणि सरंजामे यांचे दूरचे आप्त होते त्यांची ओळख झाली. पण तिला हिंदुस्थानांत फार दिवस रहातां आलें नाहीं. नवऱ्याला सुट्टी थोडेच दिवस होती त्यामुळे हिंदुस्थानांत दोघांचे सहा आठवडेच गेले. त्या सहा आठवड्यांत घाई घाईनें सर्व देश त्यांनीं पाहिला. लीलेनें ताजमहाल, हिमालयपर्वत, अजंठा केव्हज, मधुरा येथील मीनाक्षीचे देऊळ, महाराष्ट्रांतले सिंहगड वगैरे एक दोन किल्ले, पुण्याचा शनवारवाडा इत्यादि स्थानें पाहिलीं. फार घाई घाईनें सर्व प्रवास करावयाचा असल्यामुळें लीलेस आपल्या आप्तांनां भेटण्यास आणि त्यांच्याशीं ओळखी करण्यास एक आठवडयापेक्षां जास्त वेळ मिळाला

नाहीं. त्यामुळें तुम्ही पक्के अमेरिकन ग्लोबट्राट आहांत इत्यादि विशेषणें तिला मिळालींच. सरंजाम्यांना कांहीं कोंकणस्थ "मित्रांनीं" कायरे शेणवी मुलगी कशाला केलीस वगैरे प्रश्न विचारलेच आणि त्याचीं त्यानीं निरनिराळया ठिकाणीं निरनिराळीं उत्तरें दिलें. एक ठिकाणी म्हणाले, अरे माझ्यासारख्याचें लग्नच व्हायचें कठीण, "शेणवी मुलगी कशाला केलीस" असें मला विचारण्यापेक्षां कढीभातावर वाढलेला एक भटाचा मुलगा तूं कसा पसंत केलास असे माझ्या बायकोला विचारशील तर त्यांत कांहीं अर्थ आहे. दुसऱ्या एका मित्राला सांगितलें कीं माझा आहार रूढ ब्राह्मणी आहारापेक्षां जास्त व्यापक असतो म्हणून मला शेणव्यांची मुलगी करणेच जास्त योग्य होतें. सोवळ्या ब्राह्मणाची मुलगी माझ्या संसर्गानें दूषित मी कां करावी? तिसऱ्या एका कोंकणस्थ ब्राह्मणांच्या उच्चतेचे आणि सारस्वत ब्राह्मणांच्या कमीपणाचे गीत गाणाऱ्याला तो म्हणाला, मी शेणव्याच्या मुलीशीं लग्न लावूं नये हें तुझें म्हणणे अगदीं बरोबर आहे. आपण आपल्यापेक्षां उच्च जातीची मुलगी कधीं करूं नये! अर्थात् तो स्नेही चिडला आणि म्हणाला कायरे शेणवी लोक कोकणस्थ ब्राह्मणांपक्षां उच्च आहेत काय? अर्थात् आहेत ते तर सगळ्यांत जुने ब्राह्मण आहेत सारस्वत उत्तरेकडचे आणि त्यांतल्या त्यांत अगदीं पश्चिमेकडचे, म्हणजे सर्व ब्राह्मणांचे पूर्वज, कोकणस्थ ब्राह्मणांचे तर ब्राह्मण्यच संशयास्पद आहे ना, आपणांस कोणी ईजिप्शन म्हणतो, तर कोणी व्हायकिंग म्हणतो, अरे आपलें ब्राह्मण्यच जर कांहीं लोकांच्या दृष्टीने इतकें संशयास्पद तर सारस्वत ब्राह्मणांसारख्या अत्यंत उच्च जातीनें आपणांस बरोबरीचे लेखून आपल्याशी लग्न लावण्यास सुरवात केली तर आपण त्यांचे आभार मानावयास नकोत काय? आपण खरेखुरे ब्राह्मण आहोंत असे जरी समजलों तरी सारस्वत ब्राह्मण तर सर्वांच ब्राह्मणांची मायजात आहे. तर मायजातीनें तिच्यांतून निघालेल्या इतर पोट जातींस परत घेतलें असेंच होईल. अर्थात या मित्रानें तर डॉ. सरजामे शेणव्याच्या मुलीशीं लग्न करून आतां आपली जातच शेणव्यांपेक्षां हलकी आहे म्हणून ते म्हणतात, असें लोकांस सांगून डॉ. सरजामे किती बिघडले आहेत हे आपल्या ब्राह्मणी चाळींतल्या मडळींनां सांगण्यास सुरवात केली.

डॉ. आणि मिसेस सरंजामे हीं दोघेजण मुंबईस असतां बहुतेक सर्व दिवस मयूरीचींच पाहुणे म्हणून रहात होती. मयूरीची देखील सरंजामे यांचे अनेक ब्राह्मण आप्त आणि मित्र यांच्याशीं ओळख झाली. मयूरीनें दोघांस एक सार्वजनिक जेवण दिले. जे ब्राह्मण स्नेही सरंजाम्यांनां 'शेणव्या' च्या मुलीशीं लग्न लावलें म्हणून दोष देत होते ते देखील जेवणाला आले होते. कां की, त्यांस हा भोजन प्रसंग बड्या मंडळींत ओळख होण्याचा प्रसंग वाटला असावा.

डॉ. आणि मिसेस सरंजामे यांनीं आपल्या प्रवासांत असतांना एक दोन दिवस लाहोर येथेंहि काढले. तेव्हां त्यांस असे दिसून आलें कीं स्वतंत्रतेचे गोड गीत गाणारे लाला गजपतराय यांनीं आपल्या बायकोस आणि सुनेस जवळ जवळ अगदी पड्यांत ठेवले आहे.

लीला व सरजामे अमेरिकेंत परत गेलीं तेव्हां त्यांच्या मनांत हिंदुस्थानाविषयीं प्रेम होतें पण येथें राहूं नये हीच भावना वागत होती. तथापि अमेरिकेंत आपलें गृह समजणारा हिंदुस्थानचा मृत्युलोक ही आपली कर्मभूमि समजणारा वर्ग अमेरिकेत तयार झाला पाहिजे ही भावना त्यांस उत्पन्न झाली होती. लीला म्हणाली कीं असा संयोजक वर्ग निर्माण झाल्याशिवाय आपल्या अमेरिकेत वस्ती करण्याचे समर्थन होत नाहीं; सरंजाम्यांनां

लीलेच्या मनांत ही भावना जागृत झाल्यामुळे जो आनंद झाला त्याची खरी कल्पना डॉ. गोगटे, किंवा गंगाधरपंत यांनांच येईल. गोगटे म्हणाले परागंदा वसाहतीनें हिंदुस्थानांत उडल्यातरी खेपा केल्या पाहिजेत.

मयूरी त्यावेळेस आपली मालमत्ता विक्रीत होती. ती लीलेस म्हणाली कदाचित मी तुमच्या बरोबरच अमेरिकेंत येईन. पण तसें तिला करतां आलें नाही. तरी ती पुढे अमेरिकेस वर्ष संपण्यापूर्वीच गेली पण तेथे देखील ती सासऱ्याकडे पाहुणीच होती. तिच्या आणि रघूच्या स्वतत्र संसारास त्यावेळेस सुरवातच झाली नाही. इस्टेट आज विकावी, उद्यां विकावी अशा तऱ्हेने तिनें कांहीं विकली पण बरीच विकावयाची राहिली त्यामुळे तिला हिंदुस्थानांत परत जाणें भाग होतें.त्याप्रमाणे ती गेली. पण पुढे भाव उतरला म्हणून विकली नाहीं त्यामुळे तिचा सध्यांचा आयुष्यक्रम तरी वर्षांतून सात आठ महिने हिदुस्थानांत तर कांहीं महिने अमेरिकेत असाच आहे. रघुनंदन आणि मत्तमयूरीच्या आयुष्यक्रमास संयुक्तता व स्थिरता कशीं व केव्हां येतील ती येवोत.

---

## प्रकरण २५ वें.

## रघुनंदनाचे स्थित्यंतर.

१९२० नोव्हेंबरच्या महिन्यांत रघुनंदन अमेरिकेंत दाखल झाला. मयूरीला या वेळेस तो बरोबर घेऊन आला नाहीं याचे कारण मयूरीला आपला पुष्कळ असलेला व्याप आवरण्यांतच कांहीं वेळ घालविणें अवश्य होतें रघूला अमेरिकेला जाणे अवश्य होतें, आणि त्यास अमेरिकेस परत जाऊं देणें हें मयूरीच्या जिवावर आलें होतें. लग्नासाठी उत्सुक असलेली व नंतर लग्न झालेली स्त्री; त्यांत भर तारुण्याचा तिचा तो काल आणि त्यांतल्या यांत स्वातंत्र्यामुळें स्त्रीप्रेमास जे स्वयंप्रेरणेचे आणि त्यामुळें जास्त आवेशाचे निराळे स्वरूप येते त्या तऱ्हेच्या प्रेमानें रसरसलेली. तिला रघुनंदनाचें जाणें फारच अप्रिय झालें. तथापि त्याला जाऊं देण्याशिवाय गत्यंतर नव्हते. कांहीं नवरा नालायख निघूं नये व नालायख निघूं नये यासाठीं कामास नेहेमीं जुंपलेला असला पाहिजे ही दूरदृष्टि देखील तिच्याठायीं होती. वडीलपणाची भावना तिच्या मनांत नेहेमीं जागृत असे, आणि यूरोपीअन कहाण्यांतल्या यक्षिणीप्रमाणें नवऱ्याचे हित पहाण्यासाठी त्याच्या अहर्निश सान्निध्यांत आपण असावें असें तीस वाटत होतें तिच्या मनांत नवऱ्याचे अनेक तऱ्हेने लाड करावयाचे होते पण त्याला फारशी सवड झाली नाही. रघुनदन जेव्हां जायाला निघाला तेव्हां तिने त्याला प्रमिलेची गोष्ट सांगितली, आणि बभ्रुवाहन मोठा होईपर्यंत प्रमिलेची आणि अर्जुनाची भेट झाली नाहीं तसे आपल्या बाबतींत न होवो म्हणून सांगितले; तथापि ती पुन्हां म्हणाली कीं मी तरी हे कसें होऊं देईन. आजकालच्या दिवसांत प्रवास सोपा झाला आहे मध्ये वर्ष सहा महिने अमेरिकेला येऊन रहाणे कठीण नाही. तथापि जर मला माझी इस्टेट किफायतवार विकतां आली तर मी देखील विकून तिकडेच येईन. सध्या इस्टेटींचे भाव वाढत आहेत. कदाचित मी सर्व इस्टेट विकून एक दिवसांत मोकळी होइन. सध्यांच्या भावाप्रमाणे इस्टेटीची किंमत आज जवळ जवळ पन्नास लक्ष होईल. तशी जर किफायतवार विकतां आली तर मला तरी येथें राहून काय करायचे आहे.

रघुनदन अमेरिकेस जाण्यासाठीं जेव्हां मुंबईच्या बोटीवर चढला तेव्हां त्याच्या मनाची स्थिति काय बरें झाली असेल? त्याला बोटीवर चढल्यानंतर पुन्हा एकाकित्व प्राप्त झालें. आणि बोट जेव्हां किनारा सोडून समुद्रांत दूर गेली णआीरुमाल फडकविणारी मत्तमयूरीची मूर्ति

अदृश्य झाली तेव्हां त्यास क्षणभर आपण एका दीर्घ स्वप्नांतून जागे झाल्यासारखे झाले. आपण ज्या एका अप्सरेबरोबर अनेक क्रीडा केल्या, अनेक अपरिचित देखावे पाहिले, सृष्टिदेवतेचे अनेक विलास पाहिले, त्याप्रमाणें मनुष्य प्राण्याची आर्थिक दृष्ट्या अत्यंत दुर्गति पाहिली, ती सहचरी आतां अदृश्य झाली आहे, ती पुन्हां कधीं भेटेल काय ? असाहि विचार मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं. जीवर आपण अत्यंत प्रेम करीत होतों तिला सोडून आपणांस न्यूयॉर्कला परत एकटें येण्याचा प्रसंग उपस्थित झाला. त्याचा विवाहित काल जरी थोडाच होता तरी अनुनयाचा काल बराच मोठा असल्यामुळें तो आपली अविवाहित स्थिती फार लवकर विसरला. त्यास विवाहित स्थिति ही स्वाभाविक व स्त्रीविरहित स्थिती ही कशीशीच वाटूं लागली. व आतां आपणांस एकटया पुरुषासारखें आयुष्य घालवावें लागणार ! म्हणून दुःख वाटूं लागलें. आपली इच्छा व नावड या गोष्टींकडे मयूरी जी अत्यंत सूक्ष्मपणानें लक्ष देत होती त्याप्रमाणे आपल्या आवडी नावडीकडे कोण लक्ष देणार ? इत्यादि गोष्टी त्याच्या मनांत आल्याशिवाय राहिल्या नाहींत. एडन, सुएझ, जिनोआ इत्यादि ठिकाणांहून त्याचीं पत्रें मयुरीस गेलींच. बोटीवर मयूरी एक दिवसाआड बिनतारी संदेश पाठवीतच होती. मयूरीला काय, त्यांत पांच सात रुपये खर्च झाले तर त्याची बिशाद नाही. पण रघुनंदनास दर बंदरांतून तार करणे देखील जड जाई. तथापि प्रत्येक ठिकाणाहून तारा करण्याचे अभिवचन मयूरीनें घेतलें होतें, त्याप्रमाणें त्यास तारा कराव्या लागल्या. त्यानें मयूरीस जितक्या तारा केल्या तितक्या आपल्या वडिलांस देखील केल्या नाहींत. आपण मयूरीस बातमी वारंवार कळवितों तितकी वडिलांस देखील कळवीत नाहीं या एका गोष्टीवरून आपल्या आयुष्याचें कसें परिवर्तन झालें आहे हें त्याला कळल्याशिवाय राहिलें नाहीं. मयूरीनें त्यास पुष्कळच सूचना केल्या होत्या. त्यांमध्यें कांहीं तर बऱ्याच खर्चाच्या होत्या. मयूरीस दर तीन महिन्यांनीं नवीन काढलेला फोटोग्राफ पाहिजे होता, आणि दर तीन महिन्यांनीं रघुनंदनानें आपली वैद्यकीय तपासणी करून घेऊन रिपोर्ट पाठवावा इत्यादि गोष्टीसंबंधानें मयूरीनें नवऱ्यास बजावलें होतें, तसेंच नवऱ्याने सिगारेट्स फारशा ओढूं नये म्हणून रोज सिगारेट्स किती ओढल्या याची डायरी ठेवीत जा, इत्यादि गोष्टीसंबंधानें बजावलें होतें.

रघुनंदनास आपली स्त्रीविरहित स्थिति जरी कशीशीच वाटत होती तरी त्यास आपल्या अमेरिकन आयुष्यक्रमाशीं पुन्हां संघटित होण्यास फारसें जड गेलें नाहीं. तथापि आपण आपल्या बायकोच्या तोलाच्या मानानें आपणांस रहातां येईल इतके पैसे मिळविले पाहिजेत अशी आकांक्षा मुंबईस असतांनाच उत्पन्न झाली होती. तीमुळें रघूनंदनाच्या मनांतील स्वास्थ्य एक तऱ्हेनें गेलें. तो आपल्या आयुष्याकडे निराळ्या दृष्टीनें पाहूं लागला. त्यास आपण डॉ. सरंजामे यांच्यासारखें युनिव्हर्सिटी-प्रोफेसर लायनीला लागून अडकून पडावयाचे नाहीं तर जें आपण अर्थशास्त्र शिकलो तें स्वतःच्या फायद्याचें करून घेण्यासाठीं खटपट केली पाहिजे इत्यादि गोष्टी त्याच्या मनांत येऊं लागल्या. आपल्या आयुष्याला आतां आपण निराळें वळण लावलें पाहिजे. तें कसें लावावयाचें तें विचारपूर्वक ठरविलें पाहिजे असें त्यांस वाटूं लागलें. त्याला कोलंबियांत फेलोशिप होती, व पीएच्. डी. चा अभ्यासक्रमहि त्यानें चालू ठेवला होता. तो अभ्यासक्रम पुरा करीपर्यंत म्हणजे वर्षभर आपणांस विचार करावयास सवड आहे. पुढें प्रोफेसरची लाईन निश्चितपणें सोडली पाहिजे इत्यादि विचार मनांत चालू झाले. लीलेचें लग्न वगैरे झाल्यानंतर त्यास त्यासंबंधानें बराच विचार करतां आला. त्यानें पुष्कळ पैसे मिळविणाऱ्यांचीं

चरित्रें सूक्ष्म तऱ्हेनें पाहिलीं आणि पीएच्. डी. झाल्यानंतर युनिव्हर्सिटीशीं संबंध सोडून एका मोठया व्यापारी कंपनींत अनुभवासाठीं नोकरी धरली. तेथील अनुभवाचा परिणाम अजून दिसावयाचाच आहे.

---

## प्रकरण २६ वें.

## उपसंहार.

आयुष्यक्रमाच्या खऱ्या वृत्तांताची निदर्शक गोष्ट ज्याला लिहावयाची आहे ज्याला कथेचा प्रारंभ किंवा शेवट या गोष्टी केवळ स्वेच्छेच्या आहेत. समाजाचा आयुष्यक्रम हा कधीं संपतो असें नाहीं. जो एकाचा मृत्यू तोच दुसऱ्याच्या आयुष्यक्रमाचा आरंभ, हा वैयक्तिक विवर्त समाजाच्या आयुष्यांत चालूच आहे आणि कादंबरीकारांच्या संविधानकाचा आवडता शेवट जो विवाह तो तर संसाररूपी नाटकाचा आरंभ आहे. या प्रकारची परिस्थिति असल्यामुळे कादबरीकाराचें कथनस्वातंत्र्य खरोखर अमर्यादित आहे. कृत्रिम संविधानकाचें घोंगडें गळ्यांत अडकावून घेऊन कादंबरीकार ते स्वातंत्र्य विनाकारण गमावून बसतो. जेव्हां चालू असलेला आयुष्यक्रम मनोरंजक करण्याचें कौशल्य कथालेखकास नसतें, तेव्हां तो कृत्रिम संविधानक तयार करून कथा मनोरंजक करूं पहातो. त्याला प्रत्येक कथेस नायक नायिका जोडावी लागते. नायक नायिकांच्या ठायीं अद्भुत गुण कल्पावे लागतात, आणि नायिका नायकाचे अद्भुत गुण लक्षांत घेऊन त्यास वरते असे दाखवावें लागतें. आणि वस्तुस्थितीचा विपर्यास करावा लागतो. खरोखर पहातां विवाहाच्या पूर्वीचें जें तारुण्य असतें त्या तारुण्यांत नजरेस भरेल, किंवा कथाकारांस कथा समजवितां येईल अशी कर्तबगारी दाखवावयास तरुणास अवकाश कोठे असतो पण कादंबरीकारांनां खोडच अशी पडली असते कीं कादंबरींत कोणी एक नायक करावयाचा त्यास कांहीं विशेष गुण दाखवावयाचे आणि नंतर त्याचें आपण कल्पिलेल्या नायकेशीं लग्न लावावयाचें. जनन, शिक्षण, उपजीविकासंपादन, महत्त्वाकांक्षाजागृति, विवाह, उपजीविकेचे कार्य करीत असतां अनेक व्यक्तींशी येणारा संबंध यांच्या योगानें आयुष्यक्रम इतका गढला आहे कीं त्यांतील मनोरंजकता सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन करणाऱ्यास सहज दृष्टीस पडेल; तथापि केवळ तेवढयावर भिस्त न ठेवतां कादंबरीकार कृत्रिम कथानक तयार करतो. त्या कथानकास निश्चित प्रारंभ असतो, त्यांत कारस्थान असतें त्या कारस्थानामुळें नायक नायिकेच्या परस्परप्रेमांत अंतर उत्पन्न होते. तें कारस्थान उघडकीस येतें, त्या कारस्थानाच्या उघडकीमुळे नायक आणि नायिका यांच्यांत पुन्हां दिलजमाई होते. प्रेमांत अंतर उत्पन्न करण्यासाठी एकादा "दुष्टबुद्धि" उत्पन्न करावा लागतो. व येणेंप्रमाणें कथानकाची कृत्रिम कादंबरी म्हणजे जगाचें किंवा समाजाचे चित्र म्हणून म्हणावयाचें पण केवळ मनोरंजकतेसाठीं जगांत दिसत नाहीत इतकीं खोल कारस्थानें उभारावयाचीं असा प्रघातच पडला आहे. वाचकवर्ग किंवा टीकाकार वर्ग देखील या प्रकारच्या खोटया समाजचित्रांस इतका सोकावलेला असतो कीं "कारस्थान" किंवा अद्भुत गुणांनी भरलेले नायक व तसल्याच नायिका ज्यांत नसतील ती कादंबरी अपूर्ण वाटूं लागते. जगांतील साध्या आयुष्यक्रमाची मनोरंजकता ज्या कथालेखकास शोधून काढतां येत नाहीं अशा लेखकाची कादंबरीच ध्येयरूप धरून इतर कादंबऱ्या त्या दृष्टीनें तो तपासूं लागतो. कथेचा कथापणा कारस्थानामुळे उत्पन्न होत नसून अनेक माणसें एकत्र मिळून जो व्यवहार होतो त्यामुळें उत्पन्न होतो ही गोष्ट जरी लक्षांत

ठेवली तरी असत्य जगाचें वर्णन करण्याची अवश्यकता कादंबरीकारांस कधींच भासणार नाहीं.

लीला, रघुनंदन, मयूरी, सरंजामे, गोगटे, कामत, गजपतराय, गंगाधर, रुक्मिणी यांचा एकमेकांशीं संबंध आला त्यांचा वियोग झाला तरी सर्वांचा आयुष्यक्रम चालूच आहे.

यथा काष्ठंच काष्ठंच समेयातां महोदधौ
समेत्यच व्यपेयातां तद्वत् भूतसमागमः

हें विधान आयुष्यास किती बरें लागू पडतें. गोगटे सरंजामे यांचा संबंध इंदिराबाईमुळें जडला, त्यांचा कामत घराण्याशीं संबंध लीलेशीं लग्न झाल्यामुळें जडला, आणि कामत घराण्याचा संबंध डॉ. मत्तमयूरीशीं जडला. गंगाधरपंतांची प्रसगानुसार लीला आणि मत्तमयूरी यांच्यांशी ओळख झाली यामुळें जो कथाभाग उत्पन्न झाला त्याचें वर्णन आतांपर्यंत आलेंच आहे.

थोडक्यांत सांगावयाचे म्हटल्यास इ. स. १९१० पासून १९२० च्या अंतापर्यंतचा अमेरिकेंतील एका अत्यंत लहान सामाजिक विभागाचा आयुष्यक्रम या कथानकांत आला आहे. आणि त्यांतल्यात्यांत मुख्य कथाभाग १९२० सालचा आहे. बाबासाहेब कामत यांच्या आयुष्यक्रमांत एवढाच भाग कायतो मनोरंजक होता आणि दुसरा नव्हता असें थोडेंच म्हणतां येईल. प्रथमतः हा हिंदुस्थानचा मनुष्य असून या ऑफिसांत महत्त्व पावला म्हणून पीटर हार्वेच्या ऑफीसांतील इतर मंडळींनीं त्याचें उच्चाटण करण्याचा जो प्रयत्न केला तो वर्णन केला तर मनोरंजक होणार नाहीं काय? त्याचप्रमाणें लीला व विष्णुपंत यांचें लग्न झाल्यानंतर त्यांनां आपण न्यूयॉर्कमध्यें कोणी तरी महत्त्वाच्या व्यक्ती आहोंत म्हणून आज पांच वर्षें त्यांनीं जी धडपड चालविली तिचा वृत्तांत जगांत पुढें येऊं पहाणाऱ्या व्यक्तींस जसा बोधप्रद होईल तसाच सामान्य वाचकांस मनोरंजकहि होईल. डॉ. रघुनंदन कामत यांनीं खासगी नोकरी सोडल्यानंतर न्यूयॉर्कच्या चेंबर आफ कामर्समध्यें नोकरी पत्करून अमेरिकन व्यापाऱ्यांचें व योजकांचें लक्ष हिंदुस्थानाशीं व्यापार वाढावा व अमेरिकन भांडवल, अमेरिकन पद्धतीचे कारखाने हिंदुस्थानांत निघावे म्हणून जी खटपट केली, आणि त्याबरोबर अमेरिकन कान्सल म्हणून आपलीच नेमणूक मुंबईस व्हावी म्हणून धडपड केली ती मनोरंजक होणार नाहीं काय? त्याचप्रमाणें प्रो. गोगटे यांनीं सेटलर्स असोसिएशनच्या तर्फेनें हिंदुस्थानी लोकांस अमेरिकेंत चांगले दिवस यावे म्हणून जी खटपट केली ती येथें जर दिली तर तिच्या अवगमनानें हिंदुस्थानच्या बऱ्याच वाचकांस आनंद होणार नाहीं काय? या प्रत्येकाच्या व्यवहारक्रमांत अनेक स्त्रीपुरुषांशीं संबंध उत्पन्न होऊन वर्णन करण्याजोगीं स्थलें उत्पन्न झालीं आहेत. पण तीं सर्व येथें कशीं द्यावयाचीं? कथासूत्र येथेंच संपविलें तर काय बिघडलें?

---

